


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

# ५४

संपादक — के. नारायण काळे
बी.ए., एल्‌एल्.बी.

चैत्र १८६२

वर्ष १३ वें] एप्रिल १९४० [अंक २

अनुक्रमणिका

## २४ वें महाराष्ट्र साहित्य संमेलन, रत्नागिरी — प्रसिद्धि-पत्रक

म. सा. संमेलनाचें २४ वें अधिवेशन रत्नागिरी येथे ता. ४,५ व ६ मे रोजीं भरण्याचें निश्चित झालें असून, निरनिराळ्या शाखासमित्या नेमून पूर्वतयारीच्या कामास मोठ्या उत्साहाने सुरुवात झाली आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची घटना कानू ५६ अन्वये सम्मेलनांत मांडावयाचे ठराव सम्मेलन भरविणाऱ्या संस्थेकडे सम्मेलनापूर्वी निदान चार दिवस आधीं येणें जरूर आहे. तरी ज्या सभासदांना संमेलनापुढे मांडण्यासाठी ठराव पाठवावयाचे असतील त्यांनी ते सोमवार ता. २९ अेप्रील सन १९४० रोजीं अगर तत्पूर्वी आमचे कार्यालयांत पोहोचतील असे पाठवावे.

ज्या सभासदांना विषयनियामक मंडळांत जाण्याची अिच्छा असेल त्यांनी आपलीं नावें दिनाङ्क ३०।४।४० पर्यंत आम्हांस पोहोचतील अशा बेताने पाठवावीं म्हणजे स्वागतमंडळाच्या सभेंत निवडणूक करणें सोयीचें पडेल. घटनेनुसार स्वागतमंडळास फक्त पंचवीस सभासदच विषयनियामक मंडळांत निवडून देण्याचा अधिकार आहे.

त्याचप्रमाणे घटनानियम ५८ (आी) प्रमाणे प्रतिनिधींतून कांही सभासद विषयनियामक समितींत निवडून द्यावयाचे असतात. तरी ज्या प्रतिनिधींना विषयनियामक समितींत जाण्याची अिच्छा असेल त्यांनीहि दिनाङ्क ३०।४।४० पर्यंत आपला प्रतिनिधित्वाचा तक्ता भरून प्रतिनिधीची तीन रुपये वर्गणी पाठवावी.

खुल्या अधिवेशनाला सुरुवात शनिवार ता. ४ रोजीं सकाळीं व्हावयाची असल्यामुळे सभासदांनी शुक्रवार सायंकाळपावेतों येथे येअून पोहोचणें जरूर आहे. अर्थात् शुक्रवार अेक वेळ, शनिवार, रविवार व सोमवार या दिवशीं ज्यांना प्रतिनिधिनिवासांत अुतरावयाचें असेल त्यांची भोजन, चहा व स्नान वगैरेंची व्यवस्था संमेलन कार्यकारी मंडळातर्फे करण्यांत येअील, व त्याबद्दल प्रत्येकीं अेकंदर तीन रुपये खर्च येअील. तरी ज्यांना प्रतिनिधि-निवासांत अुतरणें असेल त्यांनी ता. २५।४।४० पर्यंत आमचे कार्यालयांत लेखी कळविलें पाहिजे.

चित्रकलाप्रदर्शनासाठी पाठवावयाचीं चित्रें संमेलनाच्या तारखेपूर्वी निदान अेक आठवडा तरी आधीं आलीं पाहिजेत. चित्रें स्वतःचीं अगर दुसऱ्याचीं असलीं तरी चालतील.

या संमेलनास जोडून अेक ग्रंथप्रदर्शन भरविण्याचें ठरलें आहे. या प्रदर्शनांत १९३९-४० मध्यें प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें मांडावयाचीं आहेत. तरी ग्रंथकारांनी अगर प्रकाशकांनी आपापल्या ग्रंथाची अेक अेक प्रत आमचे कार्यालयांत ता. २५।४।४० पूर्वी पोहोचेल अशा बेताने पाठवून आम्हांस या कार्यांत साहाय्य करावें अशी विनंती आहे.

मुंबअी येथे मराठी साहित्यसंघाचे अन्वये खटाव बिल्डिंग, गिरगांव, येथे तसेंच पुणें येथे केसरीकार्यालयांत व ठिकठिकाणीं केंद्रें अुघडलीं आहेत. तरी मराठी साहित्यप्रेमी बंधु-भगिनींनी सभासद होअून हें संमेलन यशस्वी करण्यास हातभार लावावा अशी विनंती आहे.

श्री. ग. देवरुखकर, कार्यवाह          वि. गो. शेट्ये, कार्याध्यक्ष

---

## जाहीर सूचना

कै. डॉ. माधव त्रिंबक पटवर्धन, अेम्.अे., पीअेच्.डी., (कवि माधव-ज्यूलियन), यांच्या लेखांसंबंधी व पुस्तकांसंबंधी पुनर्मुद्रण, भाषान्तर, अुतारे, रूपान्तर वगैरे सर्व प्रकारचे हक्क त्यांच्या पत्नी श्री. लीलाबाई माधव पटवर्धन यांनी स्वतःकरिता नि अज्ञान कुमार दिनकर माधव पटवर्धन व कुमारी सुधा माधव पटवर्धन यांच्याकरिता स्वतःकडे राखून ठेवले आहेत. यासंबंधी सर्व पत्रव्यवहार परस्पर त्यांच्याकडे खालील पत्त्यावर करावा.

श्री. लीलाबाअी पटवर्धन,
'निवान्त' बंगला, प्रभात रोड, डेक्कन जिमखाना, पुणें ४.

---

अनुक्रमणिका

# परिभाषाचर्चामंडळ

पत्रिकेच्या गेल्या अंकीं निर्देशिलेल्या कार्यकारी मंडळाच्या ठरावानुसार परिभाषाचर्चामंडळाची रीतसर स्थापना होअून मंडळाच्या तीन सभा अनुक्रमें ८, २२ फेब्रुवारी आणि १४ मार्च रोजीं झाल्या. पहिल्या दोन सभांच्या वेळीं अिंजिनियरिंग कॉलेजमधील प्रो. स. वि. आपटे यांनी श्री. वि. वि. रानडेकृत 'रेडिओ' या पुस्तकाच्या अनुषंगाने 'रेडिओ'विषयक माहिती पारिभाषिक शब्दांच्या द्वारा मांडली. तिसऱ्या, म्हणजे ता. १४ मार्चच्या सभेंत, प्रो. श्री. ल. आजरेकर यांनी चरकतीर्थ श्री. वक्षी यांच्या 'भिषग्विलास'मधील 'औद्भिद-विज्ञान' या लेखांत वापरलेल्या परिभाषेवरील आपले विचार मांडले. या विषयावरील चर्चा अद्याप पुढे चालावयाची आहे. तूर्त प्रो. आजरेकर यांनी सवडीनुसार अेखाद्या सभेंत व्याख्यानविषयाच्या द्वारा स्वसंमत परिभाषा गुंफून दाखवावी असें ठरलें आहे.

सभांतील चर्चेंत प्रो. डॉ. डी. डी. कर्वे, प्रो. श्री. ल. आजरेकर, प्रो. द. बा. लिमये, प्रो. मो. ल. चंद्रात्रेय, प्रो. रा. ना. जोशी, श्री. ह. पु. परांजपे (रि. अ. हॉर्टिकल्चरिस्ट), प्रो. स. वि. आपटे, श्री. वि. वि. रानडे, श्री. द. वि. आपटे, चरकतीर्थ श्री. वक्षी, डॉ. म. वि. आपटे अित्यादिकांनी प्रसंगोपात्त अुपस्थित राहून भाग घेतला.

प्रो. आपटे यांनी सुचविलेल्या 'रेडिओ'विषयक परिभाषेंतील कांही शब्दांचा अुपयोग याच अंकीं अेका लेखांत केला गेला आहे त्यावरून त्या शब्दांच्या युक्तायुक्ततेची कल्पना बांधतां येअील.

त्र्यं. गो. ढवळे.

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष १३ वें ] अनुक्रमणिका [ अंक २ रा



---

## जाहीर विनंती

मराठीवर होणाऱ्या प्रत्येक प्रकारच्या आक्रमणासंबंधी सर्व माहिती मिळविण्याचें व तत्संबंधी योग्यप्रकारें दखल घेऊन जरूर त्या मार्गांनी उपाययोजना करण्याचें काम महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या हातून होणें अवश्य आहे याबद्दल दुमत होणार नाही. परिषदेच्या कार्यकारी मंडळाने आता हें कार्य सतत व पद्धतशीरपणें करण्यास एका तज्ज्ञाची नेमणूक केली आहे. तरी त्या संबंधांतील शक्य ती तपशीलवार माहिती माहितगारांनी शक्य तर आपल्या सूचनांसह चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २, या पत्त्यावर आस्थापूर्वक पाठवावी अशी विनंती आहे. अशी माहिती साभार स्वीकारली जाईल.

— चिटणीस.

---

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## २४ व्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचे नियोजित अध्यक्ष

## प्रो. ना. सी. फडके यांचा संदेश



" .... शास्त्रीय शोधांनी केलेल्या क्रान्तीच्या आधुनिक काळांत, अेखाद्या समाजाने जगांतील घडामोडींपासून अलिप्त राहावयाचें ठरविलें, तरी तें शक्य नाही. भोवतालीं अुठलेल्या नवीन शास्त्रीय विचारांच्या व सिद्धान्तांच्या वावटळींनी प्रत्येक समाजाच्या रूढींचीं व संस्थांचीं कौलारें थोडीं तरी अुस्कटल्यावांचून राहणार नाहीत. या न्यायास अनुसरून, मराठी भाषा बोलणाऱ्या आपल्या महाराष्ट्रीय समाजाच्या जीवनाचा साचा, गेल्या पंचवीस वर्षांत झपाट्याने बदलत गेला आहे. सामाजिक जीवनाच्या अितर अंगांपासून, साहित्य अलग ठेवतां येअील, ही अपेक्षा आता कोणीं ठेवूं नये. साहित्याचे जे हेतू, प्राचीन काळच्या टीकाकारांनी सांगितले, तेवढेच मानण्याचा हट्ट वेडेपणाचा ठरेल. समाज तेजस्वी व्हावा, एतदर्थ आधुनिक कालांतल्या जीवनसंग्रामांत प्रभावी ठरेल, असें नवें, निर्भय, बुद्धिप्रामाण्यवादी तत्त्वज्ञान, समाजांतील प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या गळीं अुतरविण्याचें मोठें कार्य, साहित्याच्या द्वारेंच व्हावयाचें आहे. राजकारण, समाजसुधारणा, धर्मक्रान्ति, अित्यादींच्या अुग्र युद्धांपासून ज्यांना दूर राहावयाचें आहे, अशा साहित्यिकांचा आज अुपयोग नाही ! लेखकाची लेखणी वीराच्या खड्गाहूनहि अधिक समर्थ आहे, हें ओळखून मराठी साहित्यिक आपल्या शक्तींची पराकाष्ठा करतील, तरच हिंदुस्थानच्या अभ्युदयांत मराठी भाषेने योग्य ती कामगिरी बजावली, असें मोठ्या अभिमानाने सांगण्याचें भाग्य आमच्या पुत्रपौत्रांस आम्ही अुपलब्ध करून देअूं !

८-४-४० — ना. सी. फडके

अनुक्रमणिका

# चंद्रोदय-*

हा मंदराआड शशी अशी हे
  सतारका रात्र विराजताहे,
जैसी प्रिये! तूंचि सखी-समाजीं
  मी ऐकण्या त्वद्वच लोपतां जी!

प्रियंगुच्या पक्कफलासमान
  हीं इंदुबिंबें नभिं, तोयिं, दोन.
सुदूरवासी जणुं चक्रवाक-
  युग्मासि वेडावति, हीं विलोक!
त्वत्कर्णभूषेस्तव, इंदुचे जे
  हे कोवळे अंशु, सुरम्य तेजें-
सखेचसे बालयवांकुराचे,
  तोडूंहि येतील नखाग्रिं साचे!
करांगुलींनी जणुं केशपाशा,
  करीं धरोनी तिमिरासि तैशा,
निशामुखा चुंवि जणों शशांक,
  तैं पद्म-नेत्रें मिटलींत देख!
रक्तत्व चंद्र त्यजि सर्व, पाहीं,
  तो शुभ्रबिंबें झळके पुन्हाही;
जे कीं स्वभावेंचि विशुद्ध, त्यांना
  ती कालदुष्टा विकृती टिकेना.
शशिप्रभा उन्नत जागिं शोभे,
  निशातमा आश्रय नीच लाभे,
गुणान्वितां, दोषयुतां, समस्तां
  स्वभावयोग्या स्थिति दे विधाता!

नतोन्नतत्वें गिरिच्या विशेष
  तमासवें शुभ्र विधुप्रकाश
भासे, जणों भूति बहुप्रकारीं
  मत्तद्विपा लाविलि शोभणारी!
इंदुप्रभेचा रस फार प्यालें,
  आता जया पान असह्य झालें
आवृन्त, त्यां हो कुमुदीं विकास,
  करी त्वरें मुक्तमिलिंदघोष!
तैं कल्पवृक्षीं लटके दुकूल,
  ज्योत्स्नाचि भासे जणुं जें समूल,
जेव्हा प्रिये! हालवि त्यासि वारा,
  तेव्हा लपे तो बघ भास सारा!
हे वृक्षपर्णांतुनि खालि आले,
  भूमीवरी शुभ्रसुमत्व ल्याले
ज्योत्स्नांश, ते गे! उचलोनि केशीं
  बांधूं तुझ्या येतिल की, सुकेशि!
सकंपबिंबा नभिं योगतारा,
  जियेसवें इंदु करी विहारा,
वराचिया मीलनिं कंप पावे
  नवा वधू, तेविंच ती स्वभावें!

तूं देखसी जैं शशिबिंब ऐसें,
  गालीं तुझ्या तत्प्रतिमा विलासे;
जे गौर कीं पक्व शरासमान
  ज्योत्स्ना गमे उद्गत हो तिथून!

---

* कविकुलगुरु 'कालिदास'कृत कुमारसंभव या महाकाव्याच्या डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे, एम्. बी. बी. एस्., यांनी केलेल्या "सुश्लोककुमार"नामक अनुवादातील सर्ग ८ मधील श्लोक ५९ तें ७४; श्लोक ६०, ६४, ६७ व ६८ वगळून.

# "महाराष्ट्रांतील कर्त्या सुधारकांचे अग्रणी"
# राजारामशास्त्री भागवत

[लेखिका — कु. दुर्गा भागवत, अेम्. अे.]

सुमारे चाळीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत जी विद्वानांची पिढी झाली, तिच्यांत राजाराम रामकृष्ण अुर्फ राजारामशास्त्री भागवत यांचा दर्जा फार श्रेष्ठ आहे; किंबहुना व्यासंग, ज्ञान आणि कल्पकता ह्या तिहींची कसोटी लावून पाहिली, तर पुष्कळ प्रसंगीं त्यांना अग्रेसरत्वाचा मान द्यावा लागेल. शास्त्रीबोवांचा कुठलाहि लेख घ्या, तो नावीन्याने आणि ओजाने भरलेला दिसून येअील. अव्वल दर्जाच्या विद्वानालाहि आश्चर्याने स्तिमित करील व विचारांस प्रवृत्त करील, असें कांही ना कांही तरी त्यांच्या लेखांत आढळून आलें नाही, असें व्हावयाचेंच नाही. परंतु मराठीच्या ह्या निःसीम साहित्यसेवकाची त्यांच्या पश्चात् जी आबाळ विद्वानांच्या हातून आणि सामान्य जनतेकडून, कांहीशी जाणूनबुजून व कांहीशी कांही अपरिहार्य कारणांमुळे झाली, तशी दुसऱ्या कोणत्याहि लेखकाची झाली नाही. अेवढेंच काय पण १९३८ सालीं मुंबअीस जें मराठी साहित्यसंमेलन झालें, त्यांत देखील स्वागताध्यक्षांनी मुंबअींतील 'अेकूण अेक' साहित्यसेवकाचा गौरवपूर्ण अुल्लेख केला— पण त्यांत अेक नांव मात्र अजिबात गाळण्यांत आलें— अर्थात् तें नांव राजारामशास्त्री भागवतांचें होतें! नाही म्हणावयाला ज्ञानकोशकार मात्र शास्त्रीबोवांना विसरले नाहीत. चार ओळींत कां होईना, पण त्यांनी शास्त्रीबोवांच्या संशोधनात्मक लिखाणाचा गौरवपूर्ण अुल्लेख करून, त्यांतील गुणदोष दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. शास्त्रीबोवांच्या मृत्यूनंतर वर्षदीडवर्षाच्या अवधींत, श्री. शंकर बाळकृष्ण देव, सरदार माधव हणमंत घोरपडे, आणि श्री. वामन वासुदेव नवरंगे ह्यांनी लिहिलेलीं त्रोटक चरित्रें, अनुक्रमें विविधज्ञानविस्तार, ज्ञानप्रकाश, आणि अिंडियन् सोशल् रिफॉर्मर् ह्यांमध्ये आलीं होतीं. ह्या तिन्ही चरित्रांत व्यक्तिदर्शन बरें साधलें आहे. क्वचित् प्रसंगीं त्यांच्या सामाजिक कार्याबद्दल व तदनुषंगिक लिखाणाबद्दल देखील थोडी चर्चा आहे. पण शास्त्रीबोवांचें खरें वैशिष्ट्य ज्या त्यांच्या अैतिहासिक व वैदिक विषयांवरील अुद्बोधक लिखाणांत दिसून येतें, त्याबद्दल ओझरती सुद्धा चर्चा कुठे झालेली नाही. वरील तिन्ही लेखकांना त्यांच्या संशोधनाबद्दल आदर असून सुद्धा, त्या विषयाचा त्यांचा व्यासंग नसल्यामुळे त्याबद्दल कांहीच लिहिणें शक्य झालें नाही व त्यामुळे तीं सर्व चरित्रें अपुरीं वाटतात. ह्याशिवाय गोविंदाग्रजांनी 'भागवतांची घराच हिंमत' म्हणून शास्त्रीबोवांच्या निर्भय वृत्तीची जाणीव महाराष्ट्रीय जनतेस करून दिली आहे. कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीहि आपले 'सुदाम्याचे पोहे' ह्या 'महाराष्ट्रांतील कर्त्या सुधारकांच्या अग्रणी'स अर्पण केले आहेत. त्याचप्रमाणे श्री. भा. वि. वरेरकरांनी 'विधवाकुमारी' आणि 'गोदू गोखले' ह्या कादंबऱ्यांत शास्त्रीबोवांचें ओझरतें पण सुंदर स्वभावचित्र रेखाटलें आहे. झालीं! एवढींच काय तीं मराठी साहित्यांत रुजू झालेलीं शास्त्रीबोवांचीं स्मृतिचिन्हें! अरवीं सर्व-

साधारण जनतेंत शास्त्रीबोवा हे अेक, 'बायकांच्या मुंजी करा म्हणणारे विक्षिप्त सुधारक होते,' असाच समज सगळीकडे पसरलेला दिसतो.

शास्त्रीबोवांचा जन्म कोंकणांत कशेळी (जि.रत्नागिरी, ता.राजापूर) गांवांत १८५१ सालीं झाला. शास्त्रीबोवांचे वडील रा. रामकृष्ण हरि भागवत हे नोकरीनिमित्त मुंबअीस राहत असत. अर्थात् शास्त्रीबोवांचें सर्व शिक्षण मुंबअीसच झालें. लहानपणापासून शास्त्रीबोवांची स्मरणशक्ति फार तरतरित असे. आणि कुठलीहि गोष्ट चौकसपणें, अगदी मूळापासून समजून घेतल्याखेरीज त्यांना चैन पडत नसे. सांगितलें तें अैकलें व अैकलें तें मानलें, असें त्यांस मुळीच पसंत नसे. सत्यप्रियता व जिज्ञासा, हे आदर्श विद्यार्थ्यास भूषणावह असणारे गुण, त्यांच्यामध्यें पाहिल्यापासून होते. ह्या गुणांखेरीज बाळपणाचे दुसरेहि कांही संस्कार त्यांच्या अंगीं कायमचे खिळून राहिले होते. ते म्हणजे थोडासा अेककल्लीपणा व करीन ती पूर्व हा बाणा. शास्त्रीबोवा वडिलांचे अेकुलते अेक चिरंजीव व आअी अगदी लहानपणीं वारलेली, यामुळे अर्थातच लाडांत वाढल्यामुळे त्यांचा स्वभाव लहरी व अेककल्ली बनला होता. त्याचप्रमाणे लहानपणीं ते फार हूड होते. 'राजा हा मी मेल्या-वर तरी नीट वागणार आहे का!' असें त्यांच्या वडिलांनी नेहमी वैतागाने म्हणावें. पण अर्था-तच वाढत्या वयाबरोबर व अुद्योगाबरोबर त्यांचा हा हूडपणा आपोआपच कमी झाला. पुढें त्याचें पर्यवसान दृढनिश्चय व बाणेदार वृत्तींत झालें. पण स्वतःचें मत प्रतिपादन करण्याची रीत मात्र— विशेषेंकरून व्याख्यान देतांना— पूर्वीचीच, जरा चिडखोर राहिल्यामुळे, त्यांनी जीं कांही अमोल व सुंदर तत्त्वें, वेळोवेळीं अत्यंत निरपेक्षित भावाने प्रतिपादिन केलीं, त्यांचा विपर्यास होत गेला; आणि प्रतिपक्षांपैकी बहुतेकांना त्यांची विद्वत्ता अजमावण्याची पात्रता अंगीं नसल्याने व त्यांचीं सुधारकी मतें पसंत नसल्याने, त्यांच्याकडून त्यांच्या विक्षिप्तपणावरच तेवढे वेळोवेळीं कोरडे ओढले गेले.

शास्त्रीबोवा प्रवेशपरीक्षा अेल्फिन्स्टन् हायस्कूल्मधून १८६७ सालीं अुत्तीर्ण झाले व त्यांनी ग्रँट् मेडिकल् कॉलेज्मधे प्रवेश केला. ह्या वेळीं डॉक्टर लोक फार थोडे होते व जे होते त्यांस साहजिकच खूप प्राप्ति व समाजांत मोठा मान मिळत असे. अर्थातच शास्त्रीबोवांच्या वडिलांना आपल्या मुलाबद्दल त्या वेळीं किती आशा वाटत असेल हें सांगावयास नकोच! पण दैव-गति निराळीच होती. तीन वर्षें मेडिकल कॉलेजमधे काढूनहि, शास्त्रीबोवांना त्या धंद्याविषयी आपुलकी वाटली नाही. डॉक्टर होअून खूप पैसा मिळवण्याचा मोह, किंवा भूतदयेने प्रेरित होअून रुग्णशुश्रूषा करण्याची आवड, शास्त्रीबोवांच्या मनाला शिवली नाही. त्यांच्या ठिकाणीं भूतदया होती, पण ती वेगळ्या तऱ्हेची. ती पुढे अगदी निराळ्याच रीतीने कशी विकास पावली, हें त्यांच्या चरित्राच्या अुत्तरार्धावरून चांगलें दिसून येतें. शस्त्रविद्येचा तर त्यांस मनस्वी कंटाळा. ती शिकण्याकरता प्रेतांची चिरफाड करावी लागे, त्याची शास्त्रीबोवांना अितकी किळस आली, की त्यांनी वैद्यकी हा आपला धंदा नव्हे, अशी मनाशीं खूणगांठ बांधून, मेडिकल् कॉलेज्ला राम राम ठोकला! त्या वेळीं त्यांची पुष्कळांनी समजूत केली; पण व्यर्थ. त्यांनी केला तो निश्चय कायमचाच. डॉक्टरचा पेशा सोडून शिक्षकाचा गरिबीचा धंदा स्वीकारल्याबद्दल, त्यांना कधीहि वैषम्य वाटल्याचें दिसून आलें नाही. ह्याच सुमारास त्यांचे वडील वारले.

मेडिकल् कॉलेज् सोडल्यानंतर शास्त्रीबोवांनी आपल्या आवडत्या विषयाचा— संस्कृत-चा- अभ्यास अेकाग्रतेने अेका विद्वान शास्त्रीबोवांच्या हाताखाली सुरू केला व तीन वर्षांत त्या विषयांत त्यांनी प्रावीण्य मिळवलें. येथपासूनच शास्त्रीबोवांच्या बौद्धिक जीवितक्रमास सुरवात झाली, असें म्हणावयास हरकत नाही.

१८७७ सालापासून त्यांनी रॉबर्ट मनी स्कूलमध्ये शिक्षकाचें काम करण्यास सुरवात केली व तेव्हापासूनच विद्यार्थ्यांस विचारप्रवण करण्यासाठी कांहीतरी केलें पाहिजे, असें त्यांस वाटूं लागलें. विशेषतः स्वधर्म, स्वभाषा व अितिहास, ह्यांविषयी शिक्षित वर्गांतहि जें औदासीन्य व अज्ञान त्यांना आढळून आलें तें पाहून त्यांनी ह्या तिन्ही विषयांचा सांगोपांग अभ्यास करण्याचा व स्वतःला जें आवडलें, जें सत्य म्हणून वाटलें, तें कोणाचीहि पर्वा न करतां अगदी बाळबोध मराठींत लिहून काढण्याचा, चंग बांधला. त्यांची ज्ञानार्जनाची व ज्ञानदानाची हौस कांही विलक्षणच होती. स्वतःला जें कांही येत असेल, तें कुणालाहि विनामूल्य, जरासुद्धा चोरून न ठेवतां शिकवण्याची त्यांच्यासारखी आवड क्वचितच आढळून येते. अेवढेंच नव्हे, तर अगदी अक्षरशत्रूला देखील साक्षरतेचे पहिले धडे देण्यांत आपल्या विद्वत्तेचा अपव्यय होतो, असें त्यांना कधी वाटलें नाही. त्याचप्रमाणे अुपनिषदें, तुकाराम व मोरोपंताचे वेंचे देखील त्यांनी आपण होअून किती जणांना तरी शिकवले असतील. ह्या बाबतींत कै. बाळशास्त्री जांभेकरांबद्दल त्यांनी जे अुद्गार काढले आहेत, ते त्यांस स्वतःस तंतोतंत लागू पडतात. ते असे— 'विद्यादेवीचा तो निःसीम भक्त होता. विद्यादेवीच्या निरंतर व आस्थापूर्वक अुपासनेने निष्पन्न होणारी सद्वृत्ति शास्त्रीबोवांमध्ये पूर्णपणें झळकत होती. ज्ञानप्राप्तीची अनिवार तृष्णा त्यांची कधींच तृप्त झाली नाही. बुद्धीची ज्ञानजन्य विशालता त्यांच्या ठायीं पूर्णपणें वसत होती. ज्याप्रमाणे त्यांचा विद्याव्यासंग कधी खळला नाही, त्याप्रमाणे विद्यादान देण्याच्या कामीं अपूर्व अुत्साहबुद्धि त्यांची कधी खळली नाही.'

१८७७ सालीं त्यांनी मुंबअीच्या सेंट् झेवियर् कॉलेजांत संस्कृतच्या अध्यापकाची जागा स्वीकारली. त्या वेळीं कॉलेजांत स्वार्थत्यागी वृत्तीचे विद्वान् जर्मन् प्रोफेसर बरेच होते. त्यांची साधी राहणी व त्यागी वृत्ति ह्यांचा शास्त्रीबोवांच्या मनावर फार परिणाम झाला. असें म्हणतात, की कांही वर्षांनी जेव्हा त्यांच्या पगारांत वाढ करावी, असें प्रिन्सिपॉल्ने सुचवलें; तेव्हा त्यांनी मिळतें त्यापेक्षा जास्त वेतनाची आपल्यास मुळीच जरूर नाही, असें सांगितलें व मरेपर्यंत त्याच वेतनावर काम केलें. त्यांचा व्यासंग, निःस्पृहपणा व करारी बाणा, ह्यांच्या योगाने सर्व अध्यापकवर्गांत त्यांना फार मान असे. विद्यार्थिवर्गहि त्यांना फार वचकून असे. संस्कृतचेच नव्हेत, तर अितर सर्व विद्यार्थिदेखील त्यांच्यापुढे अदबीने वागत. कॉलेजच्या सर्व विद्यार्थ्यांकडून व अध्यापकवर्गाकडून, अेकजात, केवळ निर्मल चारित्र्य व विद्वत्ता ह्यांच्या जोरावर मान मिळवणारे, शास्त्रीबोवांसारखे अध्यापक फार विरळा.

कॉलेजांत शास्त्रीबोवांच्या वर्गांत कधीहि गडबड, गोंधळ नसे. नित्याच्या व विद्यापीठाने नेमलेल्या अभ्यासक्रमाखेरीज, त्या त्या विषयाचें ज्ञान विद्यार्थ्यांना व्हावें म्हणून ते फार झटत त्यांचें वाचन अफाट, स्मरणशक्ति तीव्र व ग्राहकशक्ति पण विपुल असल्यामुळे, कवळ. नेमलेल्या पुस्तकांतच वुचकळ्या मारीत बसण्याने बुद्धीची कुचंबणा कशी होते, ह्याचा त्यांना अनुभव होता व म्हणून स्वतःची बुद्धि नित्य नवें ज्ञान मिळवून परजून ठेवण्यांत ते जितके तत्पर असत, तितकाच स्वतःच्या विद्यार्थ्यांच्या– मग ते विद्यार्थी शाळेंतील कोवळ्या बुद्धीचीं मुलें असोत, कीं कॉलेजांतील प्रौढ तरुण असोत– बुद्धीला तरतरी आणून त्यांची ज्ञानलालसा वाढविण्याचा त्यांचा अखंड प्रयत्न असे. हें त्यांच्या आयुष्याचें ध्येय होतें. तें गांठण्यासाठी त्यांनी अपरंपार कष्ट केले. हें ध्येय गांठण्याचा त्यांनी दोन तऱ्हांनी प्रयत्न केला. अेक अयशस्वी व दुसरा यशस्वी झाला. त्यांपैकी पहिला प्रयत्न म्हणजे अैतिहासिक व धार्मिक विषयांवर ते वर्गांत व्याख्यान देत. पण अेक तर वक्तृत्व त्यांना असावें तितकें साध्य नव्हतें; व दुसरें म्हणजे

पुष्कळ वेळां ते आपल्या अज्ञान विद्यार्थ्यांस अितक्या गहन विद्यारण्यांत घेऊन जात, की त्या बिचाऱ्यांस त्यासंबंधाने विचार करणें तर दूरच राहिलें, पण हें सर्व प्रवचन कशाबद्दल आहे, हेंहि कळेनासें होअी. अुत्साहाच्या भरांत शास्त्रीबोवांच्या हें लक्षांत राहत नसे; व त्यांचें ज्ञान-सत्र तसेंच कांही वेळ चालू राही. थोड्या वेळाने, ते आपण सांगितलेलें विद्यार्थ्यांना कितपत कळलें आहे, त्याची चांचणी करण्याकरता मधून मधून प्रश्न विचारीत. अर्थातच अुत्तर देण्या-शिवाय गत्यंतर नसल्याने, अेखादा विद्यार्थी साहजिकच कांही तरी तारे तोडी; व मग शास्त्री-बोवांच्या संतापाचा पारा पण झटकन चढून, ते तारस्वराने फिरून व्याख्यानाला सुरवात करीत. पण ह्या वेळीं मात्र सारा रंग पालटे. त्या मठ्ठ विद्यार्थ्यांच्या डोक्यांत प्रकाश पडावा, म्हणून शास्त्रीबोवा आपलें म्हणणें अगदी अस्खलित व सोप्या भाषेंत अेकामागून अेक मांडीत, व तें विद्यार्थ्यांस कळलें आहे कीं नाही, तें पाहत. ह्या वेळीं त्यांचें अध्यापनाचें सुप्त कौशल्य, अगदी न कळत प्रकट होअी. ह्या वेळीं मात्र, ते काय म्हणतात, तें कोणाला समजलें नाही, असें होत नसे. केवळ परीक्षेकरता अभ्यास करावयाचा म्हणून करावयाचा, अशा वृत्तीच्या विद्यार्थ्यांना मात्र ही अेक शिक्षा वाटे. शिकविण्याची त्यांची दुसरी तऱ्हा, म्हणजे क्रमिक व अितरहि पाठ ते सुलभ लेखनाच्या द्वारें शिकवीत, ही होय. अुदाहरणार्थ त्यांचीं शिवाजी, संभाजी, राजाराम, अहिल्याबाअी होळकरीण अित्यादि छोटीं छोटीं अैतिहासिक चरित्रें, मराठी भाषेचें व्याकरण, संस्कृत भाषेचें व्याकरण, वामनी व मोरोपंती वेंचे अित्यादि चिमुकलीं पुस्तकें. हीं पुस्तकें अत्यंत सोप्या भाषेंत, पण फार विवेचक बुद्धीने लिहिलेलीं असून, शिकवणाराला व शिकणारालाहि सहजसाध्य होतील, अशीं आहेत. हीं पुस्तकें लिहितांना, शास्त्रीबोवांना विद्यार्थ्यांच्या अड-चणींची व अुणीवांची, पूर्णपणें जाणीव असे. विशेषतः व्याकरणासारखा रूक्ष व कठिण विषय सुद्धा, अितक्या सोप्या भाषेंत व भरपूर माहितीसकट हाताळलेला, अितर ठिकाणीं क्वचितच पाहावयास मिळेल. आपली हीं छोटीं छोटीं पुस्तकें शास्त्रीबोवा मुक्त हस्ताने विद्यार्थ्यांना वाटीत. नोट्स् विकून त्यांच्यावर अिमले अुभे करण्याची कला, त्यांना मुळीच अवगत नव्हती.

झेवियर् कॉलेज्‌मध्ये त्यांनी सतत तीस वर्षें निरलसपणें काम केलें. ह्या तीस वर्षांत त्यांनी अेकदाहि रजा घेतली नाही; हें त्यांच्या कर्तव्यबुद्धीचें व निकोप प्रकृतीचें अुत्तम निदर्शक आहे. अध्यापकाचें काम करीत असतांनाच ते कालवश झाले; आणि मरेपर्यंत अध्य-यन व अध्यापन पुन्या दमाने व हौसेने करण्याची त्यांची मनीषा पुरी झाली.

शास्त्रीबोवा वर्णाने बरेच सावळे असून त्यांची शरीरयष्टि भव्य होती. परंतु खांदे वाक-वून चालण्याच्या त्यांच्या सवयीमुळे, त्यांच्या शरीरांत बांधेसूदपणा दिसत नसे. त्यांची चर्या भव्य व अुग्र असल्यामुळे, पाहणाऱ्याला त्यांच्याविषयी अेकदम वचक वाटे. त्यांची राहणी साधी व पोशाख साधा पण विशिष्ट तऱ्हेचा असे. 'त्यांचा तो रुमाल, बंद मोकळे सोडलेला अंगरखा, विचारमग्न असल्याची ती साधुचर्या, ते मान वेळीत आणि खांदे अुडवीत व हात वर करीत चालणें, हीं किती अेक वर्षें त्यांच्या परिचित लोकांच्या लक्षांत राहातील.' असे 'बालबोधा'ने अुद्गार काढले आहेत, ते खरोखरच योग्य आहेत. त्याचप्रमाणे 'सुबोधपत्रिके'त देखील असें म्हटलें आहे, की 'त्यांच्या मृत्यूमुळे झालेलें नुकसान भरून येणें शक्य नाही. कारण त्यांचें सर्वच कांही विशेष होतें. त्यांची भाषा, त्यांचे विचार, त्यांची बोलण्याची ढब, त्यांची आपले विचार प्रदर्शित करण्याची रीत, त्यांचा पोशाख,– फार काय त्यांची चाल – सर्व कांही विशेष होतें.'

त्यांचा स्वभाव अबोल आणि तापट होता. त्यांतल्या त्यांत ते प्रसिद्धिविमुख असल्या-

मुळे, त्यांचें मित्रमंडळ फार थोडें होतें. परंतु वरून रूक्ष दिसणारे शास्त्रीबोवा, अंतर्यामी फार प्रेमळ व साध्या वृत्तीचे होते, ही गोष्ट त्यांच्या स्नेहाचा व सहवासाचा लाभ ज्यांना घडला होता, त्यांनी अनेकवार बोलून दाखविली आहे. कै. शंकर बाळकृष्ण देव, कै. वा. वा. नवरंगे व सरदार घोरपडे, या तिघांनीहि आपल्या चरित्रांत शास्त्रीबोवांच्या निष्कपट व प्रेमळ वृत्तीची ग्वाही दिलेली आहे. त्यांचा स्वभाव निर्मत्सर होता. शत्रूच्या देखील भाग्याचा त्यांना कधी हेवा वाटला नाही. वैषम्याचें बीज त्यांच्या स्वभावांतच नसल्यामुळे, ते अंतर्यामीं संतुष्ट असत.

त्यांच्या गंभीर स्वभावामुळे, त्याचप्रमाणे त्यांची राहणी अंतर्बाह्य अेकच स्वरूपाची असल्यामुळे, त्यांचें खाजगी जीवन किंवा विचार, त्यांच्या अगदी निकटच्या आप्तांना सुद्धा कधी पूर्णपणें कळले नाहीत. शास्त्रीबोवा स्वतःच्या बाबतींत मूकवृत्ति धारण करून असत; व सर्व वेळ उद्योगांत निमग्न राहत; हेंहि ह्या त्यांच्या अलिप्तपणाचें अेक कारण असूं शकेल.

त्यांचें लेखन अफाट व अुद्योग अविरत असून देखील, त्यांचें जीवन विशेष घडामोडींनी भरलेलें नव्हतें. त्यामुळे सांगण्यासारखे प्रसंग त्यांच्या आयुष्यांत फार थोडे आले. ते जातिवंत विद्यार्थी होते; व विद्यार्थ्याप्रमाणेच त्यांचा आयुष्यक्रम शेवटपर्यंत अगदी साधा व व्यवहारापासून जरा अलिप्त असा राहिला. शास्त्रीबोवांच्या आयुष्यांत बिकट असे प्रसंग फार थोडे. पैशाची त्यांनी कधी पर्वा केली नाही. तरीपण दारिद्र्य अगर वाण अशी त्यांना कधीच भासली नाही. त्यांच्या आयुष्यांत जे कांही बिकट प्रसंग आले, ते सर्व आप्तांच्या मृत्यूचेच होते. त्यापैकी त्यांस सर्वांत मोठा धक्का, १९०३ सालीं, त्यांच्या अेकुलत्या अेक मुलीच्या मरणाचा बसला. तिच्यावर त्यांची फार आशा होती. दुसरा तितकाच मोठा धक्का, १९०७ सालीं पुत्रासमान मानलेल्या चुलतभावाच्या मृत्यूचा बसला. ह्यानंतर अेकाच वर्षांत म्हणजे १९०८ सालीं ते कालवश झाले.

शास्त्रीबोवांस प्रसिद्धीची लालसा मुळीच नसे. कॉलेजांत देखील, कुणावर 'छाप मारण्याचा' ओझरता प्रयत्न सुद्धा त्यांनी केला नाही. कॉलेजांत कांही झालें की फोटो काढण्याची वहिवाट असते; पण शास्त्रीबोवांना त्याचा तिटकारा असे. अुभ्या अेकतीस वर्षांत केवळ अेकदाच व तोही प्रिन्सिपॉल्च्या तीन वर्षांच्या आग्रहानंतर, ग्रुप्मध्ये आपला फोटो त्यांनी काढूं दिला. त्यांच्या मृत्यूनंतर टाईम्सने ह्या गोष्टीचा मुद्दाम अुल्लेख केला होता.

मुंबअी विद्यापीठाशीं त्यांचा निकटचा संबंध होता. विद्यापीठांत त्यांना १९०२ सालीं 'विल्सन् फायलॉलॉजिकल् लेक्चरर्' म्हणून नेमलें होतें. हीं त्यांचीं व्याख्यानें फार प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणे ते कित्येक वर्षें अिंटर्चे संस्कृतचे परीक्षक होते. परीक्षेची प्रश्नपत्रिका केवळ विद्यार्थ्यानें किती पोपटपंची केली आहे, तें पाहण्याचें साधन नसून त्याला स्वतः होअून चौकसपणाने कितपत विचार करतां येतो, त्याचें क्रमिक पुस्तकांबाहेरचें ज्ञान कितपत आहे, तें अजमावण्याचें मुख्य साधन आहे, असें त्यांचें मत होतें. अर्थात् अशा प्रकारची प्रश्नपत्रिका काढली, म्हणजे साहजिकच घोकंपट्टीला आळा बसून, विद्यार्थ्याचें ज्ञानक्षेत्र आपोआपच वाढत जाअील, अशा विचाराने त्यांनी निराळ्या वळणाची, विद्यार्थ्यांच्या टीकात्मक वृत्तीला अुत्तेजन मिळेल अशा तऱ्हेचीं, प्रश्नपत्रिका काढण्यास सुरवात केली. तिचें परिणत स्वरूप आज दृष्टीस पडत आहे.

'अुमेदवारांची साडेसाती' हा बी.अे.च्या विद्यार्थ्यांच्या अडचणी लक्षांत घेअून लिहिलेला त्यांचा लेख, फार महत्त्वाचा व अुद्बोधक आहे. बी.अे.च्या कार्यक्रमांत अितिहास व भाषाविषय– नुसतें संस्कृतच नव्हे तर प्राकृत देखील– ह्यांवर अधिक भर द्यावा, कारण ते विषय विद्यार्थ्यांच्या

संस्कृतीस अधिक पोषक आहेत, असें त्यांनी प्रतिपादिलें आहे, तें योग्य आहे; पण त्याबरोबरच अर्थशास्त्र व भौतिकशास्त्र यांबद्दल त्यांनी जो कटाक्ष दाखवला आहे, तो अर्थातच आजकाल कुणास पसंत पडण्यासारखा नाही.

'आमची देशी भाषा विद्यापीठीं शोभण्यासारखी आहे कीं नाहीं' ह्या त्यांच्या लेखाने देखील त्या वेळीं मुंबअीच्या विद्वद्वर्गांत फार खळबळ अुडवून दिली होती. कै. डॉ. श्रीधरपंत भांडारकर ह्यांनी देशी भाषेचा विद्यापीठाच्या कार्यक्रमांत अिन्कार केला होता. त्याला आव्हान म्हणून, शास्त्रीबोवांनी प्रार्थनासमाजांत जाहीर व्याख्यान देअून सदर लेख प्रसिद्ध केला. ह्यावरून त्यांना मायभाषेचा किती अभिमान होता, हें सहज कळून येण्यासारखें आहे.

केवळ दुसऱ्याच्या संस्थेंत पगारी शिक्षक म्हणून काम करणें, शास्त्रीबोवांना प्रशस्त वाटत नव्हतें. दुय्यम शिक्षणाकडे त्यांचें अधिक लक्ष्य असे. बाळपण व तारुण्य ह्यांच्या मध्यावस्थेंत मुलांच्या मनावर होणारे संस्कार बरेच चिरस्थायी असतात. क्रमिक अभ्यासक्रम संभाळून देखील, अुत्तम चारित्र्यवान् आणि मनापासून ज्ञान मिळविण्याची खटपट करणारे विद्यार्थी तयार करून दाखवायचे, ह्या अुद्देशाने त्यांनी स्वतःची अेक शाळा काढण्याचें ठरविलें. शास्त्रीबोवांच्या डोक्यांत अेकदा अेखादी कल्पना आली, की तिला मूर्त स्वरूप येण्यास विशेष अवधि लागत नसे. ते व कै. नारायण व्यंकाजी खोत, ह्या दोघांनी मिळून १८८४ मध्ये 'बॉंबे हायस्कूल्' नांवाची संस्था काढली; पण थोडेच दिवसांनंतर ह्या दोन चालकांचें पटेनासें होअून, शास्त्रीबोवांनी त्या संस्थेशीं आपला संबंध कायमचा तोडून टाकला. त्यानंतर फिरून खटपट करून, १८८६ मध्ये त्यांनी 'मराठा हायस्कूल्' नांवाची शाळा, सरकारी मदतीची अपेक्षा न करतां, स्वतःच्या हिंमतीवर चालू केली. शास्त्रीबोवा जरी नेमस्तपक्षाचे होते, तरी सरकारी नोकरी, किंवा शाळेला मदत घेणें, त्यांना मुळीच पसंत नव्हतें. सरकारी मदत घेतल्यास शाळा सर्वस्वीं दुसऱ्याच्या तंत्राने चालवावी लागेल, व आपल्याला पाहिजे त्या तऱ्हेचे प्रयोग आपल्याला करून पाहण्यास मुळीच सवड सापडणार नाही, हें ते ओळखून होते. शिवाय स्वतःच्या कर्तृत्वावर त्यांचा भरवसा होता. त्याप्रमाणे त्यांनी स्वतःसारखेच निःस्पृह पण अुत्साही असे शिक्षक मदतीस घेतले व शाळा चालू केली. त्यांच्या त्या वेळच्या शिक्षकवर्गांत, प्रो. धोंडो केशव कर्वे हे अेक होते. ह्या शाळेसाठीं शास्त्रीबोवांनी अविश्रान्त मेहनत घेतली. अितिहास, व्याकरण व चरित्रें ह्या विषयांवर त्यांनी स्वतः पुस्तकें तयार केलीं; व त्या योगाने विद्यार्थ्यांच्या बुद्धिविकासाला अितर शालेय पुस्तकांपेक्षा अधिक मदत होते, हें सप्रमाण सिद्ध करून दिलें. थोड्याच अवधींत ही शाळा अितकी नांवारूपाला आली, की ती बरींच वर्षे अेल्फिन्स्टन् हायस्कूल्सारख्या जुन्या नामांकित संस्थेची प्रतिस्पर्धी समजण्यांत येत होती. शास्त्रीबोवांनी त्या वेळीं तयार केलेल्या विद्यार्थ्यांपैकी बरेचजण पुढे प्रसिद्धीस आले. रँग्लर् परांजपे हे त्यांपैकीच होत. शास्त्रीबोवांच्या मतें, शाळेच्या अभ्यासक्रमांत धार्मिक शिक्षणाचा अंतर्भाव होणें जरूर होतें; व त्याप्रमाणे त्यांनी शाळेंत तुकाराम, अेकनाथ अित्यादि मराठी संतांच्या पुण्यतिथि दरवर्षी साजऱ्या करण्याचा अभिनव उपक्रम सुरू केला. त्यांचीं छोटीं चरित्रें लिहून, तीं आपल्या विद्यार्थ्यांना ते शिकवूं लागले; आणि त्यांच्या काव्याची गोडी व भागवती धर्माचीं तत्त्वें, ते मुलांना समजावून देअूं लागले. ह्या त्यांच्या अुपक्रमाबद्दल त्यांच्या प्रतिपक्षांतील लोकांनीहि त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन केलें.

आतापर्यंत शास्त्रीबोवांच्या शैक्षणिक कार्याचेंच काय तें वर्णन आलें आहे. ह्या त्यांच्या कार्याविषयी सर्वांचें अेकमत व तेंहि आदरपूर्वक असेंच आहे. आता त्यांच्या आयुष्यांतील दुसऱ्या

दोलनांकडे आपणांस वळावयाचें आहे. तें म्हणजे शास्त्रीबोवांचें सामाजिक कार्य. ह्या बाबतींत त्यांच्याविषयी, अगदी परस्परविरुद्ध व तितक्याच तीव्र स्वरूपाचीं दोन मतें आढळून येतात. 'सुधारकां'त, विशेषतः ब्राह्मणेतरांत, त्यांच्याविषयी निरतिशय आदर दिसतो, उलट जहालमतवादी व सामाजिक सुधारणेस विशेष अनुकूल नसलेल्या केसरीकंपूने, त्यांची वारंवार टर उडवण्याचा व ब्राह्मणमंडळींत त्यांचें वजन पडूं न देण्याचा, अटोकाट प्रयत्न केलेला पाहावयास सांपडतो. शास्त्रीबोवा जरी ब्राह्मणेतरांचे कैवारी होते, तरी त्यांचा कोणत्याहि क्षेत्रांत गट असा नव्हता. त्यामुळे त्यांच्यावर आक्षेप घेणारे अनेक, व उत्तर देणारे ते एकटेच, असें बहुतेक होई. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पेशवाईतल्या एकांड्या शिलेदारासारखी त्यांची अवस्था होती. म्हणूनच ते वारल्यानंतर प्रतिपक्षाचे बोल बराच काळपर्यंत जनतेच्या मनावर बिंबले गेले; व शास्त्रीबोवा लोकमताची पर्वा न करणारे, कीर्तीस तुच्छ लेखणारे असे होते, म्हणून त्यांचा कंपू असा राहिला नाही. त्यांच्या मरणानंतर, त्यांची बाजू जशीच्या तशी लोकांपुढे मांडणारा, कोणी प्रभावशाली शिष्य किंवा मित्र त्यांना नव्हता; आणि त्यामुळे त्यांच्या कार्याचें विस्मरण जनतेस फार लवकर पडलें.

शास्त्रीबोवांच्या सामाजिक कार्याचा, व त्यापेक्षाहि त्यांच्या मतांचा, आढावा घेणें सोपें काम नाही. विशेषतः त्यांच्या सार्वजनिक आयुष्यांत आणीबाणीचे प्रसंग फारच थोडे आले; त्यामुळे त्यांचीं मतें, तीं ज्यांच्या द्वारां प्रसिद्ध झालीं तीं साधनें, आणि त्यामुळे समाजांत उत्पन्न झालेली सहानुभूति किंवा विरोध, ह्यांच्यावरूनच बऱ्याच गोष्टी अजमावाव्या लागतात. विशेषतः कांही बाबतींत शास्त्रीबोवांचें खरें मत काय आहे तेंच कळत नाही, किंवा त्यांच्या विधानांत विरोधाभास वाटतो; तर कांही वेळां चक्क त्यांच्या मतांत जमीनअस्मानाचा फरक पडलेला आढळून येतो. उदाहरणार्थ स्त्रियांच्या दर्जाबद्दल त्यांचें खरें मत अजमावण्यास बरेच प्रयास पडतात. त्याचप्रमाणे पुनर्विवाहाबद्दल त्यांचीं मतें अगदी परस्परविरोधी अशीं आहेत. धर्माच्या बाबतींत पण तीच तऱ्हा. त्यामुळे चिकित्सक बुद्धीने ह्या सर्वांची छाननी करावयाची झाल्यास, एकेक प्रश्न कोड्यासारखा उलगडून हातावेगळा केल्याखेरीज, गत्यंतर राहत नाही.

शास्त्रीबोवांनी सामाजिक चळवळींकडे लक्ष्य पुरविण्यास सुरवात केली, तो काळ संक्रमणाचा होता. राजकीय आंदोलनांना ह्याच वेळीं अधिक मूर्त स्वरूप येऊं लागलें होतें. पण राजकारणाचीं मुळें समाजकारणाइतकीं खोल गेलेलीं नव्हतीं. विशेषतः समाजसुधारणेची खरीखरी कळकळ बाळगणारी बहुतेक मंडळी नेमस्त मताची, सरकारी नोकरींत शिरलेली, किंवा सरकारशीं सहानुभूति बाळगणारी, अशी होती. ह्या मंडळींत साधारण साहेब लोकांबद्दल विशेष आदर असे. इंग्रजी भाषा हीच काय ती खरी भाषा, व देशी भाषा कुचकामाच्या, अशीहि त्या काळच्या बऱ्याच सुशिक्षित व सुधारणावादी तरुणांची समजूत होती. परंतु ह्या वेळेस ही सर्व मंडळी सरसकट पाश्चिमात्य राहणीकडे, विशेषतः धर्माकडे, जी साहजिक झुकली असती, ती न झुकण्यास दोन तीन कारणें झालीं. तीं म्हणजे प्रार्थनासमाजाची स्थापना व भरभराट; आणि राजकीय जागृतीची सुरवात. प्रार्थनासमाजाच्या संस्थापकांत न्यायमूर्ति रानडे, भांडारकर, परमानंद, भागवत इत्यादि मंडळी प्रमुख होती. आणि त्यांनी खिस्ती व भागवतधर्मांची सांगड घालून, नवीन तऱ्हेने, मूर्तिपूजाविरहित, उपासना करण्यास सुरवात केली. सामाजिक सुधारणा, हें ह्या पक्षाचें मुख्य ध्येय होतें. ह्या सुधारणेचीं सूत्रें (१) बालविवाहप्रतिबंध, (२) विधवाविवाह, (४) स्त्रीशिक्षण, (४) जातिभेदाचें उच्चाटण, व (५) शिक्षणाचा प्रसार, ह्यांवर मुख्यत्वें अवलंबून होतीं.

शास्त्रीबोवांचीं मतें प्रारंभीं जुन्या वळणांचीं होतीं; परंतु जसजसें त्यांचें वाचन वाढूं लागलें, आणि त्यांचा संस्कृत ग्रंथांचा परिचय जास्त होऊं लागला, तसतशी त्यांची विवेचक बुद्धि जागृत होऊं लागली; आणि त्याबरोबरच सुधारक चळवळींकडे त्यांचें चित्त जास्त ओढ घेऊं लागलें. ह्या त्यांच्या स्थित्यंतराला व त्यांच्या लेखनाला अकदमच प्रारंभ झाला. त्यामुळे त्यापूर्वीची त्यांची मनोभूमिका फारच थोड्या जणांस माहित आहे. शास्त्रीबोवांचें मन सुधारणेकडे वळण्यास, व तें तेथे कायमचें स्थिर होण्यास, दुसराहि अक घरगुती संबंध कारणीभूत झाला. तो म्हणजे त्यांचे चुलते कै. भास्कर हरि भागवत, ह्यांचा सहवास होय. कै. भास्करराव भागवत हे मुंबअीचे त्या काळाचे अक अमोल पण कर्ते व प्रमुख सुधारक होते. प्रार्थनासमाजाच्या आद्य संस्थापकांपैकी ते अक असून, त्यांच्यामुळेच शास्त्रीबोवांचा न्यायमूर्ति रानड्यांशीं अधिक निकटचा संबंध जुळून आला. रानड्यांविषयी शास्त्रीबोवांना आदर असे. मराठी भाषा बघावी तर रानड्यांची, समाजसुधारणेची कळकळ रानड्यांची, व राजकीय मतें हीं रानड्यांचीं, असें ते म्हणत. 'रानडे कंपू'बद्दल त्यांना फार आदर व अभिमान वाटत असे. परंतु खरें पाहिलें असतां, शास्त्रीबोवांच्या व रानडे-प्रभृति प्रार्थनासमाजाच्या मंडळींच्या, सामाजिक व धार्मिक दृष्टिकोणांत कितीतरी फरक आहे. रानड्यांना ते गुरुस्थानीं मानीत असले, तरी प्रार्थनासमाजाचीं बरींच तत्त्वें त्यांना मान्य नसत, व तें ते स्पष्टपणें बोलून दाखवीत. प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांशीं दोन बाबतींत त्यांचा मुख्यत्वें मतभेद होता. पहिला धार्मिक बाबतींत; समाज कोणताहि ग्रंथ अगर वचन, प्रमाण म्हणून मानावयास तयार नव्हता. त्याचप्रमाणे समाजाची सहानुभूति, तुकाराम वगैरे कांही संत सोडले, तर बहुतेक पाश्चिमात्य वळणाकडे झुकलेली असे. शास्त्रीबोवांस हें पसंत नव्हतें. त्यांची वैदिक धर्मावर, विशेषतः अुपनिषदांवर, अचल श्रद्धा असे. गायत्रीमंत्र व पर्यायाने सूर्योपासना, आत्मिक बळ वाढविण्यास कारणीभूत होते; असा त्यांचा अखेरपर्यंत भरंवसा होता. दुसरें म्हणजे वैदिक संस्कृतीवर विश्वास असल्याने, अुपनयन, विवाह अित्यादि संस्कार, केवळ वैदिक मंत्रांनीच यथायोग्य करतां येतात, असें त्यांचें मत होतें. अर्थातच पाश्चिमात्यांच्या अनुकरणाबद्दल त्यांना तिटकारा असे. प्रार्थनासमाजाच्या धोरणावर टीका करतांना, अकदा ते असें म्हणाले, की 'जर प्रार्थनासमाजाचें मंदिर खरोखर सार्वजनिक मराठ्यांचें व्हावें अशी तुमची अिच्छा असली, तर ब्रह्मद्वेषाचीं शिंगें काढून टाका. अस्सल मराठ्यांचा धर्म प्रार्थनासमाजांत सुरू करा. रामाचें किंवा विठोबाचें नांव गाळून टाकणें, व मराठ्यांच्या देवतांची टर करून मूर्तिपूजा पाप समजणें, ह्यांत निदान आम्हांस तरी कांही शहाणपण दिसत नाही.' तीच गोष्ट विधवाविवाहाची. विधवाविवाहाला प्रतिकूल असें अक पुस्तक त्यांनी १८८६ मध्यें प्रसिद्ध केलें; तेव्हापासून प्रार्थनासमाजांतील कित्येक जणांच्या सहानुभूतीला ते मुकले. तरी पण प्रार्थनासमाजाचें व त्यांचें नातें शेवटपर्यंत सलोख्याचें होतें. 'सुबोधपत्रिके'त त्यांचे कित्येक लेख आले आहेत.

स्त्रीशिक्षणाबद्दल शास्त्रीबोवांस फार सहानुभूति असे. बौद्धिक दालनांत स्त्री-पुरुष असा भेद करणें अनुचित आहे, असें त्यांचें मत होतें. आपल्या नात्यांतील कित्येक विधवांस, स्वतःपुरतें लिहितांवाचतां यावें, म्हणून त्यांनी त्यांना शिकविलें. तसेंच घरांतल्या मुली, सुना ह्यांनाहि ते नेमाने मराठी-संस्कृत वगैरे शिकवीत. परंतु शिक्षण घेअून पुरुषांशीं स्पर्धा करण्याच्या दृष्टीने, स्त्रीने आर्थिक क्षेत्रांत प्रवेश करावा, हें त्यांस तितकेंसें पसंत नसे. विधवा स्त्रियांनी, किंवा ध्येयवादी कुमारिकांनी, समाजहितार्थ संस्थेंत काम करावयास त्यांची आडकाठी नसे. संयमशील, पतिव्रता व विद्येच्या द्वारें धर्माचें तत्त्व ओळखणारी आर्य स्त्री, शास्त्री-

बोवांना आदर्शवत् वाटे. गार्गी, मैत्रेयी, सीता, सावित्री वगैरे स्त्रियांबद्दल त्यांस निरतिशय आदर वाटे; आणि स्त्रियांत शिक्षणाचा फैलाव झाल्याखेरीज सीतासावित्रीसारख्या स्त्रिया निपजणार नाहीत, अशी त्यांची भावना होती. मोरोपंतांच्या नलोपाख्यानावर 'पुणे वैभवां'त त्यांनी अेक विवेचक लेखमाला सुरू केली होती. त्यांत नलाने त्याग केल्यानंतर दमयंतीची जी स्थिति झाली, तिचें करुण वर्णन मोरोपंतांनी केलें आहे, तें शास्त्रीबोवांना अत्यंत आवडे. पतिव्रतेचा आदर्श असावा तर दमयंतीसारखा. स्वयंवरांत स्वतः पति पसंत करण्याची, अितकेंच काय पण नलाने सोडल्यानंतर दुसरें लग्न करण्याची, पूर्ण मुभा असून देखील दमयंतीने सुखाची पर्वा न करतां, पतीच्या बाबतींत जी त्यागी वृत्ति व अेकनिष्ठता दाखविली आहे, ती स्त्रियांनी कित्ता गिरविण्याजोगी आहे, असें शास्त्रीबोवांचें म्हणणें होतें. ह्याच वेळीं त्यांनी थोड्या शिक्षणाने चढून जाणाऱ्या, व पाश्चात्य देखाव्यावर भुलून सुखाच्या मागे धावणाऱ्या, आधुनिक स्त्रियांवर ताशेरे झाडले आहेत. नटूनथटून राहणाऱ्या सुखासीन स्त्रियांबद्दल, शास्त्रीबोवांस विलक्षण तिटकारा वाटे. त्याचप्रमाणे प्रेमचेष्टांत गर्क होणाऱ्या तरुणींबद्दल त्यांचें मत फार वाअीट असे. कालिदासाच्या सर्वच नायिका (नायक पण) त्यांना छचोर व तिरस्करणीय वाटत. संधि मिळाली की पुरे, शकुंतलेवर त्यांनी झोड उठवली नाही, असें झालेंच नाही. ध्येय व कर्तव्य ह्यांपुढे शृंगारसुख अगदी हीन मोलाचें आहे, अशी त्यांची भावना होती, व म्हणूनच पुनर्लग्नाबद्दल, मग तें पुरुषाचें असो वा स्त्रीचें असो, त्यांचें अत्यंत प्रतिकूल मत होतें. स्वतःची पत्नी असून वामसंबंध करणारा पुरुष, अगर काडीमोड करून पुन्हा संसार करणारी स्त्री, पशु-तुल्य होत, असें ते वारंवार प्रतिपादीत. संस्कृत ग्रंथांच्या अध्ययनाने त्यांच्या ह्या मतांस अधिकच पुष्टि मिळाली, व त्या ग्रंथांच्या आधारावर त्यांनी विधवाविवाह अशास्त्र आहे असें प्रसिद्ध केलें. तें बहुतेक पुनर्विवाहाचे कैवारी डॉ. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांना अुत्तर असावें. ह्या त्यांच्या लेखाने, सुधारक मंडळींत बरीच खळबळ व अनेक वादविवाद झाले. परंतु वादविवादांत काय किंवा लेखांत काय, शास्त्रीबोवांनी आपलेंच म्हणणें खरें आहे, असें धोरण ठेवलें; व ते ह्या बाबतींत अधिकच जहाल मताचे बनले. जातिभेदाप्रमाणेच पुनर्विवाहाचा प्रश्न देखील त्या वेळीं बरींच वर्षें चिघळत राहिला होता. त्यामुळे अेक फायदा झाला, की विचारी माणसांस प्रत्यक्ष अुदाहरणें पाहून, पुनर्विवाहाविषयी विचारांतीं अनुकूल किंवा प्रतिकूल मत ठरविण्यास, भरपूर सवड मिळाली. शास्त्रीबोवांच्या बाबतींतहि तसेंच झालें. १८८६ च्या वादळानंतर, कांही वर्षें त्यांनी ह्या विषयावर महत्त्वाचें लेखन, किंवा जाहीर भाषण वगैरे केलें नव्हतें. १९०१ सालापासून पुन्हा त्यांचें लक्ष ह्या प्रश्नाकडे वळलें. पण ह्या काळांतील त्यांचे लेख संदिग्ध आहेत. अुदाहरणार्थ 'अेक विधवागृह हवें आहे,' हा त्यांचा 'सुबोध पत्रिकें'तील लेख फार महत्त्वाचा आहे. ह्यांत विधवांच्या शिक्षणासाठी, व वाटल्यास त्यांचे विवाह सुलभ रीतीने जमून येण्यासाठी, प्रत्येक जातीने पुण्यामुंबअीसारख्या शहरांत विधवागृहाची स्थापना करावी, व त्या त्या समाजांतील पुढाऱ्यांनी ह्या बाबतींत अधिक लक्ष पुरवावें, असें म्हटलें आहे. परंतु त्या लेखांतील 'मांडवशोभा' ह्या अेका शब्दाने, हा लेख पुनर्विवाहाची टर करण्याच्या अुद्देशाने लिहिला आहे, कीं खऱ्याखुऱ्या कळवळ्याने लिहिला आहे, हें समजत नाही. संस्कृत शब्दांची हकालपट्टी करून, त्या जागीं अस्सल मराठी वळणाचे शब्द वापरण्याचे, शास्त्रीबोवांचे जे हमखास प्रयत्न ह्या काळांत चालू होते, त्यांमुळे देखील त्यांनी 'मांडवशोभा' हा शब्द वापरला असावा. कारण वरपासून खालपर्यंत छद्मी व अुपरोधिक लिहिण्यापेक्षा, जें लिहावयाचें तें अेकदम, अेक घाव की दोन तुकडे असें लिहिणें, त्यांस अधिक पसंत असे; व पुढे दोनचार वर्षांच्या

अवधींत त्यांच्या मतांत जें परिवर्तन झालें, त्यावरून वरील लेख अुपरोधिक नसावा, असें वाटतें. १९०३ सालीं 'सुधारकां'त, 'विवाह व लग्न' आणि 'विधवाविवाह' म्हणून जे त्यांचे दोन लेख आहेत, त्यांवरून विवाहाचे वैदिक मंत्र कुमारिकेच्या लग्नालाच अुद्देशून म्हटले आहेत, विधवेच्या नव्हेत, असें त्यांनी प्रतिपादन केलें आहे; तरी पण विधवाविवाहाला श्रुतींत आधार आहे, असें त्यांनी अुदाहरणें देअून दाखविलें आहे. अर्थात् विधवाविवाह त्यांना जरी अजून पूर्णपणें मान्य नव्हता, तरी त्यांची त्या बाबतींतली वृत्ति, बरीच सहिष्णु झाली होती, असें वाटतें. १९०५ सालीं मात्र ग्रंथांच्या खोल अभ्यासाने व सामाजिक निरीक्षणाने, त्यांच्या पूर्वीच्या मतांत पूर्ण पालट झाला; व त्यांनी पुण्यांत अेक विद्वत्ताप्रचुर व अतिशय सुंदर व्याख्यान दिलें. त्यांत त्यांनी विधवाविवाह सशास्त्र आहे, अितकेंच नव्हे तर विधवांस शिक्षणाची, किंवा वाटल्यास विवाहाची, सवलत मिळण्यासाठी विधवागृहाची आवश्यकता आहे, असें अत्यंत कळकळीने प्रतिपादन केलें. नारदस्मृतीच्या आधाराने विधवाविवाह सशास्त्र, अितकेंच नव्हे तर योग्य, आहे असें सांगून ते म्हणाले, की अेकदां लग्न झालेलींचें पुन्हा लग्न करतांना निषेध करणें, हें पाखंड आहे; ब्राह्मण म्हणविणारांनी तें झुगारून द्यावें; आणि मनापासून विधवाविवाहाचा प्रचार करावा. हें व्याख्यान जसेंच्या तसें 'ज्ञानप्रकाशां'त छापून आलें होतें. पण दुर्दैवाने बऱ्याचशा सुधारक मंडळींचें त्याकडे जावें तसें लक्ष गेलें नाहीं; आणि त्यामुळे शास्त्रीबोवा पुनर्विवाहास प्रतिकूल होते, हा त्यांच्याविषयींचा गैरसमज अद्यापि कायम आहे.

स्त्रियांच्याविषयी शास्त्रीबोवांस फार आदर असे. संसारांत व धर्माच्या बाबतींत, स्त्री-पुरुषांच्या दर्जात विषमता असावी, हें त्यांना बिलकूल पसंत नव्हतें; आणि म्हणूनच आत्मिक विकासाकरता अुपनयनाची पुरुषाअितकीच स्त्रीला पण जरूर आहे, तो तिचा हक्क आहे, असें ते वारंवार प्रतिपादन करीत. ह्या बाबतींत त्यांना खूपच विरोध सहन करावा लागला. आपल्या मुलीची ते मुंज करणार होते; पण तिच्या अकालनिधनाने त्यांचा बेत सफल झाला नाही. स्त्रियांच्या बाबतींत वपनासारखे जे अत्याचार व अितर गांजणूक होत असे, त्याबद्दल त्यांना मोठी चीड येअी; पण अितकें मात्र खरें, कीं अेकंदर स्त्रियांच्या प्रश्नाला, आगरकर व कर्वे, ह्यांच्याअितकें महत्त्व त्यांनी दिलें नाही.

ब्राह्मणेतरांचा प्रश्न शास्त्रीबोवांना फार जिव्हाळ्याचा वाटे. त्यांच्या समाजांतील अज्ञान, दारिद्र्य, व वरिष्ठ जातींकडून होणारी त्यांची अुपेक्षा, ह्यांबद्दल त्यांस चीड येअी. कै. ज्योतिबा फुले यांच्या मृत्यूनंतर, ब्राह्मणेतरांच्या चळवळीचीं सूत्रें हालवून, त्या समाजांत जागृति करण्याचें काम जर कोणीं अत्यंत निःस्पृहपणें केलें असेल, तर तें शास्त्रीबोवांनीच. फार काय पण 'ब्राह्मणेतर' हा शब्द देखील त्यांनीच प्रथम रूढ केला.

जातिभेदावर त्यांचा मोठा कटाक्ष असे; परंतु वैदिक वर्णाश्रमधर्मावर त्यांचा विश्वास होता. 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं' हें गीतेंतलें वचन सार्थ आहे, असें त्यांनी 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं' ह्या आपल्या लेखांत म्हटलें आहे. मूळचे वर्ण व हल्लीच्या जाती अेक नव्हत, असें त्यांचें म्हणणें होतें. गुण व कर्म ह्यांच्यावर वर्ण अुभारले होते. जात ही केवळ जन्मावर अवलंबून असते, व त्यामुळे अुचनीच भेद बळावून गुणांचें चीज होत नाही, असें ते म्हणत. त्यांतल्या त्यांत अस्पृश्यतेवर तर त्यांचा मोठा दांत असे. वेदांत अस्पृश्यतेला काडीमात्र आधार नाही. बौद्ध व जैन धर्मानंतर पौराणिक काळांत खरा ब्राह्मणी किंवा वैदिक धर्म लोपून, बौद्ध व जैन धर्मावर आधारलेला, हल्लीचा 'भिक्षुकी' भटी किंवा 'हिंदु धर्म वा अधर्म' हा अुदयास आला, व ह्याच विषवृक्षाचीं कडू फळें आज आमच्या समाजास भोंवत आहेत, असें त्यांचें मत होतें.

मूळचे ब्राह्मण, अुपनिषदांतील व महाभारतकालीन ऋषि, ज्ञानाचे भोक्ते, सत्यप्रिय आणि निरिच्छ होते. ते खरे ब्राह्मण. पौराणिक काळांतील नांवाचे ब्राह्मण केवळ पुजारी, ज्ञानीपणाचें सोंग आणणारे, लोभी आणि मंद बुद्धीचे होते. स्वतःच्या स्वार्थासाठी त्यांनी 'स्नान सुतका' सारख्या खुळचट कल्पना लोकांत पसरवून दिल्या; आणि त्यामुळे सर्वत्र धर्मभोळेपणाचें वेडें पीक माजलें, असें त्यांनी नेहमी म्हणावें. क्षत्रियांबद्दल ते असें म्हणत, की त्यांची पायरी ब्राह्मणांच्या वरची आहे. ह्या आपल्या म्हणण्यास ते जनक, शांतनु वगैरे राजांचीं उदाहरणें देत.

ह्या बाबतींत त्यांचें दुसरें असें अेक मत असे, की महाराष्ट्रांत ब्राह्मणांपासून तों महारां-पर्यंतचे लोक, अेकाच खाणीचे आहेत. महाराष्ट्राचे मूळचे रहिवासी कोळी, गवळी, महार अित्यादि 'कृष्णवर्णी' लोक हेच होते. ह्याच कोळी व गवळी लोकांतून व्यास, गोपालकृष्ण व अर्जुनास गीता सांगणारा कृष्ण, हे महापुरुष अुदयास आले. ह्याबद्दल बहुतेक सुशिक्षित व आशिक्षित लोकांचा त्यांच्यावर कटाक्ष असे. अुदाहरणार्थ 'वार्ताहरां'त, 'भुकेलेल्या भटाने' ह्याबद्दल जे अुद्गार काढले आहेत, ते मजेचे आहेत. महाराष्ट्रधर्मावर १८९९ साली, शास्त्रीबोवांचे व्याख्यान झालें; त्यावर टीका करतांना प्रथम त्यांच्या सोडावॉटर व अिराणी सरबत पिण्याच्या सवयीवर, आणि पर्यायाने त्यांच्या ब्राह्मणत्वावर, शिंतोडे अुडवून 'भुकेलेला भट' म्हणतो,—"राजा-रामपंतांची छाती भक्कम व कंठही ठणठणीत – ब्राह्मण पायां पडणारा कृष्ण, हा आमच्या राजा-रामपंतांनी गवळ्याचा बच्चा ठरवला, व्यास कोळिणीचा बच्चा ठरवला, आणि अर्जुन दोन बापांचा बच्चा, म्हणजे व्यभिचारापासून झालेला ठरविला. राजारामपंतांचें सगळेंच बोलणें व करणें अुफराटें. गोलंकार झाला म्हणजे वर्णसंकर बंद पडला, गोलंकार जर चालला नाही, तर वर्णसंकर चालला, ही राजारामपंतांची सरणी. न्यायमूर्ति रानड्यांनी कान फुंकले, आणि राजा-रामपंतांस हें वळण लागलें, अशी शंका येते." संशोधनात्मक लिखाण भुकेलेल्या भटासारख्या खोलांत शिरण्याची कुवत नसलेल्या, किंवा 'बाबावाक्यं प्रमाणं' म्हणणाऱ्या विद्वानांच्या देखील हातीं पडल्यास, त्याची काय अवस्था होते, ह्याचें हें अुत्तम अुदाहरण आहे. ह्या अशाच प्रकारच्या लिखाणाबद्दल, त्यांस वर सांगितलेल्या टीकारांकडून 'उपजत खरडा,' ही पदवी मिळाली होती.

अर्थातच ह्या त्यांच्या मतांबद्दल सर्वसाधारण ब्राह्मणसमाजांत, विशेषतः पुण्याच्या 'केसरी' ब्राह्मणमंडळांत, त्यांच्याविषयी फार रोष असे. आर्यसंस्कृतीच्या शास्त्रीबोवांनी चिंधड्या उडवल्या आहेत, असें त्यांचें म्हणणें होतें. दुर्दैवाने शास्त्रीबोवांना विरोध करणाऱ्या ह्या साऱ्या मंडळींत, विष्णुशास्त्री चिपळूणकरांसकट, अेकहीजण त्यांच्याइतका व्यासंगी किंवा स्वतंत्र बुद्धीने विचार करणारा नव्हता. पक्षभेदाचे वारे त्या वेळीं फार जोराने वाहत होते, व म्हणून शास्त्री-बोवांचें जात, पक्ष ह्यांच्याबाहेरचें सुद्धा जें केवळ संशोधनात्मक वेंचक लिखाण आहे, त्याची समतोल छाननी त्यांच्या समकालीन एकाही महाराष्ट्रीय विद्वानाकडून झाली नाही.

१९०८ सालीं, मृत्यूपूर्वी कांही दिवस, ब्राह्मणेतरांत जागृति करून त्यांची संघटना करण्या-साठी, त्यांनी वऱ्हाडांत दौरा काढला होता. त्या वेळेस मराठासमाजाने त्यांचें आदरपूर्वक स्वागत केलें. त्यांच्याअितका सन्मान दुसऱ्या कोणत्याहि ब्राह्मण पुढाऱ्याचा अजून ब्राह्मणे-तरांकडून झालेला नाही. शास्त्रीबोवा खरे ज्ञानी व त्यागी ब्राह्मण आहेत, अशी त्या वेळच्या सर्व ब्राह्मणेतर पत्रांनी, अेकमुखाने ग्वाही दिली होती. जातिभेदाला आपण मुळीच जुमानीत नाहीं, हें दाखवण्यासाठी, ते ठाकुरद्वारला रस्त्यांत उभे राहून, अिराण्याचा चहा व पाव खात, महारा-कडे फराळ करीत, "हातांत पैसा ठेवून झाडूवाल्याला 'तूं हा माझ्या हातावरून अुचलून ने'

असें म्हणत. अेकनाथषष्ठीच्या दिवशीं ते महारांच्या मुलांना स्वतः खाअू वाटीत व पुस्तकें देत. त्यांच्या लेखनाने नसेल त्याच्या शतपट, जुन्या मंडळींचें ह्या प्रकाराने पित्त खवळे; व तें पाहून शास्त्रीबोवांना संतोष होअी.

शास्त्रीबोवांचीं धर्माबद्दलचीं कांही मतें, पूर्वींच ओझरतीं येऊन गेलीं आहेत; पण त्यांचें थोडें अधिक स्पष्टीकरण होणें, जरूर आहे. आधुनिक हिंदुधर्माची ते नेहमी टिंगल करीत; त्याला ते चक्क अधर्म मानीत. 'कैसरकडून सुलतानाकडे' ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत, 'हिंदुधर्म विवेचका'च्या अनेक लेखांत, 'Is Hinduism a Religion', 'ब्राह्मणी धर्म व भटी धर्म', 'कोणत्या कर्मकांडाशीं ब्राह्मणांचा अभा दावा' अित्यादि लेखांत, केवळ पुराणग्रंथ व रूढी आधारभूत मानणाऱ्या ह्या नकली धर्माची, त्यांनी खूपच रेवडी अुडवली आहे. वैदिक धर्म हाच खरा ब्राह्मणांचा धर्म; त्यांत भेद, लोभ, असत्य व अज्ञान ह्यांना थारा नाहीं, असें ते मानीत. गायत्रीमंत्र हा स्त्रीला व पुरुषाला, त्याचप्रमाणें ब्राह्मणाला व शूद्राला, मिळण्याचा सारखाच अधिकार आहे, असें त्यांचें मत होतें; व म्हणून व्रात्यस्तोमावर स्वतंत्र लेख लिहून, अुपनयनाचा संस्कार जातिभेदातीत आहे, असें त्यांनी प्रतिपादन केलें. शास्त्रीबोवांची अीश्वरावर अचल श्रद्धा असे. हा त्यांच्यामध्यें व आगरकरांमध्यें मोठा फरक होता. आगरकर देवधर्म कांही मानीत नसत, तर शास्त्रीबोवांना धार्मिक शिक्षण अत्यंत महत्त्वाचें वाटे; व नास्तिकांचा त्यांना मोठा राग येअी. आगरकर निरीश्वरवादी असून देखील, त्यांनी आपल्या मुलांच्या मुंजी जुन्या पद्धतीने थाटामाटांत केल्या, म्हणून त्यांच्या प्रतिपक्षाने त्यांच्यावर टीकेची झोड उठवली होती. परंतु शास्त्रीबोवांच्या बाबतींत तशी संधि, त्यांच्या टीकाकारांस कधी सांपडली नाही. 'म्हटलें तें केलें', हें त्यांचें ब्रीद होतें. ब्राह्मणांच्या पोटजातींची अेकी विवाहाने केली पाहिजे, असें त्यांचें मत होतें; व महाराष्ट्रांत असे विवाह भागवतघराण्यांतच प्रथम घडून आले. तसेंच लग्नांत व मुंजींत वैदिक विधींपेक्षा अितर खटरफटर गोष्टींनाच अधिक महत्त्व देण्यांत येतें, व त्यामुळे वायफळ खर्च व त्रास मात्र होतो, तो वांचाविण्यासाठीं त्यांनी वैदिक वाङ्मयाचें व गृह्यसूत्रांचें परिशीलन करून, केवळ आवश्यक तेवढेच वैदिक मंत्र व विधि निवडून, 'विवाह व उपनयन-सार्थ प्रयोग' हें छोटेंसें पुस्तक तयार केलें; व त्याप्रमाणे केवळ दोनतीन तासांत लग्न व मुंज, व तींहि अगदी कमी खर्चात, अुरकतां येतील अशी खात्री करून, त्याप्रमाणे दोनहि विधि त्यांनी आपल्याच घरीं सातारला प्रथम केले. त्या वेळीं पुन्हा अेकदा मोठी खळबळ झाली, व शास्त्रीबोवांना बहिष्काराचा धाक घालण्यांत आला. परंतु शास्त्रीबोवांनी त्याला मुळीच जुमानलें नाहीं. शास्त्रीबोवांच्या मृत्यूनंतर, आज तीस वर्षांनी, तोच वैदिक विधि अधिक संक्षिप्त व सुधारलेल्या पद्धतींत, महाराष्ट्रांत सर्वत्र रूढ झाला आहे; पण ज्याने ही प्रथा प्रथम आस्तित्वांत आणली, त्याचें नांवहि कुणाच्या लक्षांत नाहीं!

वैदिक धर्माअितकेंच, शास्त्रीबोवांना महाराष्ट्र धर्माबद्दल किंवा भागवतधर्माबद्दल प्रेम वाटे. भक्तीचा जिवंत ओलावा त्यांना फार आवडे. महाराष्ट्रधर्माची मुहूर्तमेढ 'मराठमंडळां'तील संतांनी रोविली. मुकुंदराय त्याचे आद्यजनक, ज्ञानदेव संस्थापक आणि अेकनाथ, रामदास, तुकाराम त्याचे प्रचारक, असें त्यांनी म्हटलें आहे. भक्तिमार्गांत जातिभेद, लिंगभेद ह्यांना थारा नाहीं. संस्कृतविद्येची शेखी नाही. प्राकृत भाषेचा अुत्कर्ष व सामान्य जनतेच्या मनाचें प्रतिबिंब संतांच्या वाङ्मयांत दिसून येतें, असें शास्त्रीबोवांचें मत होतें.

हिंदुधर्माप्रमाणेंच बौद्ध व जैन धर्माबद्दल शास्त्रीबोवांचें मत चांगलें नव्हतें, हें त्यांच्या

'बौद्धधर्मही काळोखच' ह्या लेखावरून चांगलें कळून येतें. त्यांनी कुराण व बायबल ह्यांचाहि चांगला अभ्यास केला होता. बायबल् त्यांना आवडे. पुष्कळ वेळां गीता, ज्ञानेश्वरी ह्यांबरोबर बायबल्चेहि पाठ ते आपल्या श्रोत्यांना अैकवीत. ह्या बाबतींत अेकदा मोठी मौज झाली. ती अशी. १९०३ सालची मेची पंधरा तारीख. शास्त्रीबोवांचें व्याख्यान होतें. व्याख्यानांत शास्त्रीबोवांनी ग्रहणांतल्या सुतकविटाळ असल्या खुळचट समजुतीस मुळीच आधार नाही, ग्रहण हा अेक नैसर्गिक देखावा आहे, असें प्रतिपादन केलें; व ब्राह्मण भिक्षुकांवर खूप तोंडसुख घेतलें. त्याबरोबर शास्त्रीबोवांचे अेक प्रतिस्पर्धी, प्रो. जिनसीवाले, अुठून म्हणाले कीं ही धार्मिक रूढी आहे, व ती 'पोपच्या शब्दा'अितकीच आम्हांस वंद्य आहे. झालें. पोप ह्या शब्दाने शास्त्री-बोवांच्या डोक्यांत निराळीच कल्पना आली. दुसरे दिवशीं बायबल् घेअून ते व्याख्यानाच्या जागीं गेले, व त्यांनी तें शिकविण्यास सुरवात केली. श्रोत्यांत विरोधकच जास्त असल्यामुळे, 'बायबल् नको' म्हणून गिल्ला झाला. शास्त्रीबोवांनी मतें घेतलीं; तेव्हा बायबल्च्या विरुद्ध बरेच हात वर झाले. 'डुकरापुढे मोतीं' असें पुटपुटत, शास्त्रीबोवा व्यासपीठावरून खाली अुतरले. ते अुद्गार प्रो. जिनसीवाल्यांनी अैकले; व 'आम्ही डुकर' 'आम्ही डुकर' म्हणून ओरडत त्यांनी काठी आपटली. त्याबरोबर शास्त्रीबोवांना स्फुरण चढलें; व ते, 'बायबल् नको म्हणून गडबड करणारी मंडळी अर्थातच तशी' असें म्हणाले. झालें; त्याबरोबर सभेंत गोंधळ व गडबड ह्यांना पारावार राहिला नाही. कांही दिवस जिनसीवाले तर सारखे संतापांतच होते. शेवटीं अेका स्नेह्याने ह्या पोरकट भांडणांत कांही अर्थ नाही, असें सांगून शास्त्रीबोवांना आपलें म्हणणें मागे घ्यावयास लावलें; व मग जिनसीवाले शान्त झाले. परंतु ह्यानंतरहि शास्त्रीबोवांचें बायबल्बद्दल व सभेंतल्या श्रोत्यांबद्दल मत होतें तेंच राहिलें.

अीश्वर व ध्येय ह्या बाबतींत शास्त्रीबोवांचें जें मत होतें, तें त्यांच्याच शब्दांत सांगितलेलें बरें. तें असें. 'जशी मानवी सृष्टीच्या खालीं पाशवी सृष्टि आहे, तशी मानवी सृष्टीच्या वर दैवी सृष्टि आहे. मानवी सृष्टि जशी शरीरधारी व संकुचितचित्तधारी आहे, तशी दैवी सृष्टि नाहीं. दैवी सृष्टि आहे ती वायुमय व स्वेच्छाविहारी आहे. याप्रमाणें दैवी सृष्टि जरी कांहीं गुणांनीं विशिष्ट आहे, तरी सर्वज्ञ नाहीं. जशी मानवी सृष्टि अल्पज्ञ आहे, तशी दैवी सृष्टीही अल्पज्ञच आहे. तरी मानवी सृष्टीच्या ज्ञानापेक्षां दैवी सृष्टीचें ज्ञान निःसंशय अधिक आहे. मानवी व दैवी सृष्टि देवास शरण जाते. देव करुणेचा सागर व परार्थ झिजणारा आहे. सर्वज्ञ आहे.'

ध्येयासंबंधी ते म्हणतात– 'स्वार्थावर लाथ मारून, विविध लोकांच्या बोलण्याकडेस यत्किंचितहि लक्ष न पोंचवतां, केवळ परार्थासाठीं देह झिजविणें, ही अिहलोकांतील सद्गतीची पराकाष्ठा होय.'

तसेंच अेकनाथाच्या चरित्रांत ते म्हणतात– 'भ्यायचें कोणास किंवा पर्वा कोणाची करावयाची ? तर अेका देवास किंवा देवाची. ... मनांत चांगलें वाटतें, पण जनांत बरें न दिसल्यामुळें हातून होत नाहीं, असें साक्षात् सांगणारा, किंवा स्वतःच्या सार्वत्रिक वृत्तीवरून लोकांच्या मनांत भरविणारा पुरुष, लौकिकदृष्ट्या कितीही अुच्चपद पावलेला असला, किंवा कितीही श्रेष्ठ जातींत त्याचा जन्म झालेला असून, अुक्तीमधें जेव्हां तेव्हां देवाचें नांव झळकव-णारा असला, तरी तो निःसंशय देवावर भरंवसा ठेवणारा नव्हे.'

ह्या त्यांच्या अुक्तीवरून, शास्त्रीबोवांच्या निर्भयतेचें आणि स्पष्टवक्तेपणाचें बीज कशांत होतें, तें सहज कळून येतें. त्याचप्रमाणे अंधश्रद्धा नव्हे, तर डोळस, व पारखून आपलीशी केलेली धर्मभावना, ही शास्त्रीबोवांच्या नैतिक बळाचें कारण होती, हें सहज दिसून येतें.

मूर्तिपूजेच्या बहिष्काराबद्दल, त्यांनी जरी प्रार्थनासमाजावर तोंडसुख घेतलें असलें, तरी ते स्वत: त्या मार्गांत फारसे नसत. गायत्रीचा जपच त्यांना अधिक मोलवान वाटे.

पैशाच्या आशेने लिहिलेलें लिखाण फुकट होय. ज्ञानाच्या लोभाने, व विद्यादानाच्या हौसेने, केलेलें वाङ्मय चिरस्थायी होतें, असें शास्त्रीबोवांचें मत होतें. अशा निःस्पृह माणसाची लेखणी, तरवारीपेक्षा तिखट व विजेसारखी अनिरुद्ध असावी, ह्यांत कांही नवल नाही. लिहितांना ते अगोदर विचार करून, ठरवून, लिहीत नसत. त्यांच्या डोक्यांत नेहमी नाना तर्‍हेचे प्रश्न घोळत असावयाचे, व ज्या वेळीं जी कल्पना मनांत येईल, ती झरकन लिहून मोकळें व्हावयाचें, असा त्यांचा शिरस्ता असे. बहुतेक लेखन कागदांच्या कपट्यांवर, व तेंहि वर विषयाचें नांव वगैरे, अगर पुष्कळ वेळां अनुक्रमहि, न घालतां लिहिलेलें असावयाचें; व पुष्कळ वेळां ते तुकडे तसेच छापखान्यांत जावयाचे. शास्त्रीबोवांना ते फिरून वाचून जुळवून लिहून काढायला फुरसत नसे. त्यामुळे त्यांच्या मोठ्या लेखांत विसंगति आणि पुनरावृत्ति पुष्कळ वेळां आढळते. ह्याशिवाय स्वतःचीं कांही मतें, अुदाहरणार्थ, पौराणिक काळांत अुत्पन्न झालेली व अद्याप वाङ्मयांत टिकून राहिलेली भिक्षुकि वृत्ति, अित्यादि प्रसंग पडेल तेथे घालून देण्याची त्यांची सवय असल्यामुळे, त्यांचे लेख वाचकांस कांहीसे कंटाळवाणे वाटतात.

राजारामशास्त्री भागवत ह्यांच्या लेखनाचा पसारा फार अफाट आहे. त्यांचें लेखन फार भराभर व पस्तीस वर्षें अखंड चालू होतें. तसेंच त्यांचें वाचन फार विस्तृत असल्यामुळे, व कल्पनाशक्ति आणि धारणा तीव्र असल्यामुळे, त्यांचे लेखनाचे विषय विविध असत. वैदिक वाङ्मयापासून तों थेट सोवळ्याओवळ्याच्या थोताण्डापर्यंत, वाटेल त्या गहन किंवा अगदी क्षुल्लक दिसणाऱ्या विषयांवरहि, ते सारख्याच गंभीरपणाने व ठासून लिहित असत. अर्थात् लहानापासून थोरापर्यंत कोणींहि वाचावें, व अर्थातच त्यावर आपल्या कुवतीप्रमाणे बरीवाअीट टीका करावी, असें त्यांच्या लेखनाच्या बाबतींत होअी; आणि लोकविलक्षण मतें हें त्यांचें वैशिष्ट्य असल्यामुळे, बराच काळपर्यंत लोकांची करमणूक त्यांच्या लेखांनी केली, हेंहि खरें. परंतु त्यांचे जे खरे गंभीर व विचारप्रवर्तक लेख आहेत, त्यांचें मर्म फारच थोड्यांस कळलें; किंवा फारच थोड्या जणांनी वाचून समजून घेण्याचा प्रयत्न केला; असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाही.

त्यांचे लेख गंभीर स्वरूपाचे व भरीव असत; पण ते लिहितांना त्यांची विद्वानाच्या किंवा संशोधकाच्या भूमिकेशीं जुळणारी तटस्थ वृत्ति नसे, तर त्यामागे आनंदाची, त्वेषाची किंवा अभिमानाची भावना, ठळकपणें दिसून येत असे. मराठ्यांच्या प्राचीन अितिहाससंबधाने किंवा प्राकृत व मराठी भाषेसंबधी लिहितांना, त्यांना अभिमानाचें भरतें येत असे. पुराणें आणि कालिदासादिक रंगेल कवींचीं काव्यें, यांच्याबद्दल ते अत्यंत त्वेषाने आणि तुच्छतेने लिहीत. व्युत्पत्तीसारखा रूक्ष, पण त्यांच्या अत्यंत आवडीचा विषय, ते नाजूकपणें हाताळीत; आणि सामाजिक अन्याय आणि खुळचट चाली, ह्यांच्यावर टीका करतांना ते अुपहासाचें शस्त्र मुक्त हस्ताने चालवीत. वैदिक वाङ्मयाची छाननी मात्र, ते पुष्कळ वेळां स्वतःच्या भावना अेकीकडे सारून, आपली सारी कल्पकता खर्च करून लिहीत. त्यांच्या बुद्धीची चमक आणि कुशाग्रता, ह्या लेखांत जशी दिसून येते, तशी अितर ठिकाणीं, अितक्या अुत्कटपणें, आढळून येत नाही. हे लेख वाचतांना, वाचकालाहि बुद्धीची चांगलीच कसरत करावी लागते. शास्त्रीबोवांच्या लिखाणाचा हा संशोधनात्मक भाग फार महत्त्वाचा आहे.

# परीक्षणें



## जीवनप्रकाश

पंडित सातवळेकर यांच्या 'जीवनप्रकाश' या ग्रंथामध्ये अेकोनविंशति लेखांचा संग्रह केला आहे. ग्रंथकारांनीच आपल्या लेखांचे चार वर्ग पाडले आहेत. पहिले चार लेख कला-विषयक म्हणजे चित्रकलाविषयक असून दुसरे पांच लेख संस्कृतिविषयक आहेत. तिसऱ्या तीन लेखांचा समावेश वैदिक या सदरांत केला असून त्याच्यापुढील चार लेखांत पंडितजींनी पौराणिक कथांतून अैतिहासिक तत्त्व शोधून काढण्याचा प्रयत्न केला आहे. राजकीय व सामाजिक या मथळ्यांखाली तीन लेख अंतर्भूत केले असले तरी त्यांतील शेवटले दोन लेख सामाजिक स्वरूपाच्या विषयांचा अूहापोह करणारे आहेत. अर्धनग्न फकिराचा विजय हा या सदरांतील अेकच लेख ग्रंथकाराकडून राजकीय स्वरूपाचा म्हणून गणला गेला आहे.

२. पंडित सातवळेकर हे अेक परिणामकारक वक्ते म्हणून महाराष्ट्रांत समजले जातात. वक्तृत्व हा त्यांचा विशिष्ट गुण होय. त्यामुळे वक्तृत्वाला आवश्यक असणाऱ्या पडगुणांची छाया त्यांच्या लेखांवर पडलेली स्पष्टपणें दिसण्यासारखी आहे.

३. पहिल्या चार लेखांना 'कलाविषयक' या विशेषणाने जरी अलंकृत केलें असलें तरी ते प्रामुख्याने चित्रकलाविषयक आहेत, हें ग्रंथकारासहि मान्य होअील. चित्रकलेवर मराठींत आजपर्यंत फारसें कोणीं लिहिलें नाही या दृष्टीने ह्या ग्रंथाचें जें कांही महत्त्व आहे तें चित्र-कलेवरील लेखांत विशेषतः आढळून येण्यासारखें आहे. ह्या चार लेखांतील सर्व विवेचन पंडित सातवळेकर यांनी ज्ञानकोशाच्या अेकाच लेखांत केलेलें वाचकांस सांपडेल. याशिवाय श्रीयुत दाभाडे ह्यांचें भारतीय चित्रकला हें अेक या विषयावरील पुस्तक वाचनीय असें आहे. श्री. दाभाडे यांचें विवचन विस्तृत असल्यामुळे व प्रसंगविशिष्ट नसल्यामुळे भारतीय चित्रकलेचें आकलन साकल्याने होण्यास वाचकांस तें उपयुक्त होण्यासारखें आहे.

४. चित्रकला हा अेक ललितकलांचा भाग आहे. गायन-वादन, नृत्य-नाटक, चित्र-रेखन व शिल्पकर्म यांचा समावेश ललितकलांमध्ये करण्यांत येतो. ललित म्हणजे सुंदर; आणि ललितकला म्हणजे सौंदर्यजनक कला होय. सौंदर्य हा या कलांचा आत्मा व आल्हादनिष्पत्ति हें यांचें कार्य. तथापि संगीत आणि चित्ररेखन यांमधील भेद लक्षांत ठेवणें अगत्याचें आहे. वास्तव चित्रकला व ध्येयात्मक चित्रकला हा जो वाद चित्रकलेसंबंधीं अुत्पन्न होतो तो संगीत-विषयांत निर्माण करतां येअील असें वाटत नाही; तसेंच, चित्र अैतिहासिक असू शकेल तसा संगीताचा अेखादा अैतिहासिक प्रकार असल्याचें कोणास माहीत नाही. काव्य आणि चित्र-कला यांत जितकें साम्य आहे तितकें गायन आणि चित्रकला ह्यांत आढळणार नाही. चित्रकलेचे गुणावगुण मापतांना या भेदाकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. चित्रकला ही वास्तववादी असावी कीं ध्येयवादी असावी असा प्रश्न कित्येक वेळां विचारण्यांत येतो. परंतु हा प्रश्न असमंजसपणाचा आहे असेंच म्हणावें लागतें. जिला कांहीसें चुकीने ध्येयवादी चित्रकला असें संबोधण्याचा परिपाठ आहे ती वास्तविक चित्रकलेहून अधिक

मोलाची आहे अितकें प्रतिपादन करतां येअील. आणि तसें करणें निःसंशय सयुक्तिक होअील. वस्तुलेखन हें अेक अितिहासाचें अंग आहे; पाहिजे तर असल्या चित्ररेखनाचा अंतर्भाव कले-मध्ये आम्ही करीत नाहीं असा आग्रह अेखाद्या कलावन्ताने धरला तर तो अप्रयोजक ठरणार नाही. नुसतें पद्य म्हणजे काव्य नव्हे; गद्यांतहि काव्य असतें. त्याप्रमाणे कोणत्याहि प्राण्याचें अथवा पदार्थाचें चित्र रेखाटणें म्हणजे चित्रकला नव्हे असें म्हणणें केव्हाहि अयुक्तिक समजलें जाणार नाही. परंतु जोंपर्यंत अशा प्रकारच्या चित्रांना चित्रकलेच्या मांडीवर बसूं देण्यांत येत आहे तोंपर्यंत तरी चित्रकला वास्तववादी असावी कीं ध्येयवादी असावी असा प्रश्न अुपस्थित करणें आमच्या मतें अप्रयोजकपणाचें आहे.

५. ज्या प्राण्याचें अथवा पदार्थाचें चित्र काढावयाचें तें त्या प्राण्याप्रमाणेच अगर पदार्थाप्रमाणेच हुबेहूब असलें पाहिजे हा चित्रकारामध्यें पहिला गुण असावा लागतो. ह्यामध्येंहि मनुष्य आणि निर्जीव पदार्थ यांचीं चित्रें काढण्यांत महदंतर असतें हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. भावदर्शनाची अडचण निर्जीव पदार्थासंबंधाने अुत्पन्न होत नाहीं; परंतु कोणताहि सजीव प्राणी, विशेषतः मनुष्यप्राणी, हा कोणत्याहि अवस्थेंत कोणत्या तरी भावनामय स्थितींत असतो. तो कधी क्रुद्ध असेल, कधीं अुल्लसित वृत्तींत असेल, कधी भीतीने ग्रस्त असेल, कधी चिंतेने व्यग्र असेल, कधी शान्त वृत्तींत लीन झालेला आढळेल असे हे सर्व भाव त्याच्या चर्ये-वर अुमटलेले चित्रांत आले पाहिजेत. ह्यालाच भावदर्शन असें म्हणतां येअील. नुसत्या शरिराचें चित्रण हें वस्तुदर्शन होय. भावदर्शन हें अमूर्ताचें असल्यामुळे त्याचें चित्रण पहिल्याअितकें सुसाध्य नसणार हें अुघड आहे. हे भाव शरीराश्रित, विशेषतः मुखाश्रित, असल्यामुळे अेका दृष्टीने ते वास्तव आहेत असेंहि म्हणतां येण्यासारखें आहे. कारण भाव जसे प्रत्यक्ष दिसतील तसेच्या तसेच ते चित्रकारांनी आपल्या चित्रांत दाखविले पाहिजेत. या बाबतींत त्यांच्या कल्पनेला अवसर नसतो. अहंपणाचा दिमाख, अुपासकाचा भाविकपणा, सहृदय माणसाची वत्सलता अित्यादि भावनांना मूर्त स्वरूप देणें बिकट आहे यांत संशय नाहीं. ह्या भावदर्शनाच्या बाबतींत हिंदी व पाश्चात्य चित्रकार ह्यांमधें कोण श्रेष्ठ आहे याचें निःसंदिग्ध अुत्तर ग्रंथ-कारांनी देण्याचें टाळलें असा आम्हांस संशय येतो. ह्यासंबंधानें अखेरचा निर्णय देणें हा त्यांचाच अधिकार आहे, आमचा नाहीं. परंतु वर वर पाहणारांस आमच्या चित्रकारांस हें काम अद्यापि साधलें नाही असेंच वाटतें.

६. नमुन्याबरहुकूम चित्र काढण्याची आपण कितीहि हेटाळणी केली तरी अभ्यासकाला तेवढें साधण्याकरितांहि परिश्रम करणें अगत्याचें आहे. तरुण व निरोगी माणसाचें चित्र काढणें हें थोडें सुलभ असलें तरी शरिराच्या त्वचेवर सुरकुत्या पडलेल्या वृद्धाचें तितकें सुलभ नाही. आपल्या डोळ्यांना जितकें दिसतें तेवढेंच चित्रांत आणतां येतें. केवळ स्पर्शाने समजणाऱ्या विषयाचें चित्र काढतां येत नाही. मनुष्याच्या चर्येवर तो व्याधीने पिडलेला आहे असें दाखवितां येअील, कारण ती चर्या दृगोचर असते; परंतु मनुष्याला ताप आलेला चित्रांत दाखविणें अशक्य आहे. यावरून चित्रकलेच्या मर्यादा ठरवितां येण्यासारख्या आहेत. डोळ्यापुढे वस्तु ठेवून तदनुसार चित्र काढणें ही अभ्यासकाची पहिली पायरी होय. सृष्टीचा बहारीचा देखावा पाहिला की चित्रकाराने आपला कुंचला काढलाच समजावें; परंतु हाहि अेक प्रकारचा फोटोच होय. त्यांत चित्रकाराच्या कल्पनेला स्थान नाही. आपल्याकडे देखाव्याचीं चित्रें काढण्याची प्रथा पूर्वी नव्हती; तथापि ढगांच्या देखाव्याचीं चित्रें काढलेलीं आढळतात. यानंतर स्मरणाने चित्र काढण्याचा दुसरा पाठ तो घेतो. या अभ्यासकाला सूक्ष्म निरीक्षणशक्तीची आवश्यकता असते.

नाही तर माडाच्या झाडाचें चित्र काढतांना पोफळीच्या झावळ्या निघावयाच्या. सारांश वस्तु-चित्रामधे प्रत्यक्ष चित्रण, नंतर स्मृतिचित्रण आणि प्राण्यांच्या संबंधाने भावनिदर्शन ही तीन पायऱ्यांची शिडी अभ्यासकाला चढून जावी लागते.

७. यानंतर चित्रकाराने कल्पनाचित्राचा अभ्यास केला पाहिजे. ज्याला ग्रंथकारांनी ध्येयवादी चित्रकला असें म्हटलें आहे त्यालाच आम्ही कल्पनाचित्रांची कला असें नांव देऊं. अीश्वराच्या सृष्टीप्रमाणे मनुष्यालाहि आपल्या कल्पनेप्रमाणे नवीन व रमणीय सृष्टि निर्माण करतां येते. ग्रंथकारांनीच दिलेलें अुदाहरण देअून हें विशद करतां येईल. गौरीशंकरासारखा अुंच पर्वत आणि त्याच्या समोर अेक शिंगें अुभारलेली गोगलगाय या दोघांचेंच नुसतें चित्र काढलें असतां त्याची पायरी वस्तुचित्रापलीकडे लागणार नाही.* परंतु पंडितजींनी म्हटल्याप्रमाणे कवीप्रमाणे चित्रकाराला, म्हणजे चित्रकाराच्या डोळ्यांना नव्हे तर त्याच्या बुद्धीला, निराळाच प्रकार भासमान होतो. तो ह्या दृश्याचा अर्थ निराळा लावतो. अथवा त्याला गौरीशंकर व शिंगें अुभारलेली गोगलगाय पाहून अत्यंत रम्य व अुद्बोधक विचार सुचतात. ही गोगलगाय गौरीशंकरासारख्या पर्वताशीं स्पर्धा करीत आहे, क्षुद्र जीवाला अशक्य अशा मोठेपणाची हाव सुटली आहे आणि हा मोठेपणा मिळविण्याची पराकाष्टा हा क्षुद्र जीव करीत आहे. परंतु गौरीशंकर पर्वताला त्याची यत्किंचितहि दिक्कत वाटत नाही. तो ह्या क्षुद्र जीवाची गम्मत बघत आहे अशी कल्पना सुचून त्या गोगलगायीचा व पर्वताचा आविर्भाव चित्रांत रंगविला जातो. अशा चित्रांत दाखविला गेलेला गौरीशंकर व गोगलगाय हीं मूळचीं नसून चित्रकाराच्या कल्पनाशक्तींतून निर्माण झालीं आहेत, आणि दृश्यापेक्षा अदृश्य, मूर्तापेक्षा अमूर्त, स्थूलापेक्षा सूक्ष्म हीं नेहमीच मोहक व अुद्बोधक असल्यामुळे त्यांची योग्यता अधिक असणें स्वाभाविक आहे. अशा ठिकाणीं चित्रकार सृष्टीचें अनुकरण करीत नाही, तो प्रतिसृष्टि निर्माण करतो, आणि अशा रीतीने तो या कल्पनासृष्टीचा अीश्वरच बनतो. दास होण्यापेक्षा अीश्वर होणें हें केव्हाहि श्रेष्ठच म्हटलें पाहिजे. जें नाही तें अुत्पन्न करणें हाच कवीचा किंवा चित्रकाराचा श्रेष्ठ गुण समजला पाहिजे. अेखाद्या कृतीचे दूरचे परिणाम ज्याला दिसतात त्याला जर आपण बुद्धिमान म्हणून समजतों तर केवळ कल्पनेने घटना निर्माण करणाऱ्यास त्याच्याहूनहि अधिक बुद्धिमान समजणें अपरिहार्य आहे. गौरीशंकराचें अुदाहरण जें ग्रंथकारांनी दिलें आहे त्याच्या अुलटहि प्रकार ध्वनित करतां येअील. गोगलगायीने कितीहि आव आणला तरी गौरीशंकराचा मोठेपणा किंचितहि ढासळण्याचा संभव नसून गौरीशंकर मूर्खासारखा मत्सराने ग्रस्त होत आहे, व ह्यावरून बाह्यतः मोठीं समजलीं जाणारीं माणसें वस्तुतः किती हलक्या मनाचीं असतात हें चित्राने लोकांच्या मनावर बिंबवितां येअील. श्रीमन्त यजमानीण व तिची दासी अथवा मोलकरीण यांचें चित्र काढतांना सामान्य नियमाला अनुसरून सुंदर वस्त्रांनी लपेटलेली व अलंकारांनी मढवलेली अशी यजमानीण दाखविली जाते आणि फाटक्या व मलीन वस्त्राची, फुटका मणीहि अंगावर नसलेली अशी दासी दाखविली जाते. परंतु अशा देखाव्याच्या अैवजीं अुदात्त विचाराचा अंकुर फोडणारी कल्पना चित्रकाराला सुचल्यास तो दासीच्या अंगावरच अलंकारांचा भार घालून यजमानिणीला साधी पण तेजस्वी अशी रंगवील. मी अलंकारांचा भार वाहणारी नाहीं, दासीप्रमाणे मी अलंकारांचीहि मालकीण आहें त्यामुळे अलंकार माझ्या शरिरावर नसून दासीच्या शरिरावर असण्यानेच माझा खरा धनीपणा अधिक

* उत्तुंग पर्वत व लहान गोगलगाय ह्यांस दृष्टीच्या केंद्रांत कसें आणतां येईल तें समजत नाही.

व्यक्त होईल, असे विचार असणाऱ्या स्त्रीचें हें चित्र उदात्त व रमणीय दिसेल. या श्रीमंतीण बाईप्रमाणेच राजाचें चित्र काढणें इष्ट आहे. मस्तकावर रत्नखचित मुकुट, गळ्यांत मोत्यांचा कंठा, मुकुट नसेल तर उष्णीषावर तुरा वगैरे अलंकारांनी सजलेला राजा न काढतां साध्या पोषाखांत असलेला परंतु ओजस्वी राजा चितारला असतां त्याचें राजेपण त्याला अधिक साजेल यांत संशय नाही. आणि असा राजा समृद्ध, सुखी व आनंदी प्रजेमध्ये बसलेला चितारला असतां तें चित्र राजाचा मोठेपणा सिद्ध करून सामान्य जनतेलाहि उद्बोधक झाल्याविना राहणार नाही.

८. मोठेपणा दाखविण्याचा एक प्रकार ग्रंथकारांनी वर्णिलेला आहे. रेखा व रंग यांच्या कमीजास्तपणाने चित्र उठावदार व स्पष्ट दिसतें. आणि अशा रीतीने मोठेपणा व्यक्त करितां येतो. परंतु हा मोठेपणाचा प्रकार सापेक्ष असल्यामुळे त्या व्यक्तीच्या भोंवती इतर माणसांचीहि चित्रें काढावीं लागतात. इतरेजनांना अस्पष्टता आणून प्रमुख व्यक्तीला विशेष स्पष्टपणाने दाखवावें लागतें. एकच व्यक्ति असल्यास चेहऱ्यापुरताच हा स्पष्टपणाचा उपयोग करतां येतो. यावरून एकाच व्यक्तीचा मोठेपणा स्वतंत्र रीतीनें दाखविणे जरा अवघड आहे असेंच म्हणावें लागतें.

९. ह्याप्रमाणे मोठेपणा दाखविण्याची कृति जरी काढली असली तरी मनुष्याच्या अंगीं वसत असलेले गुण मूर्त स्वरूपांत आणण्याची क्रिया अद्यापि साध्य झालेली दिसत नाही. भग्नदंत व कृशतनु गांधींच्या अंगीं वसत असलेले महनीय गुण, कोट्यवधी लोकांवर त्यांनी पाडलेली छाप व मुकुटधारी राजांनाहि हेवा वाटावा असा त्यांना मिळणारा मान चित्रांत प्रदर्शित करण्याची कला पाश्चात्यांना अद्यापि साधली नाही असें पंडितजींचें म्हणणें आहे. परंतु भारतीयांनी ती कला हस्तगत केली आहे हें त्यांचें विधान मनाला पटण्यासारखें नाही. धार्मिक देवतांची अथवा विभूतींचीं जीं चित्रें काढतात तीं सांकेतिक स्वरूपाचीं असतात, असें म्हणण्याचा त्यांचा रोख दिसतो. भक्ताला आपल्या आराध्य विभूतीचा कुरूपपणा दिसतच नाही, आणि म्हणून तो आपल्या उपास्य देवतेचें चित्र कुरूप असें कधीच रंगवणार नाही. हें उदाहरण त्यांच्या सिद्धान्ताला किती उपकारक आहे हें आम्हांस समजत नाही. आमच्या मतें भक्ताला जें दिसतें तें कल्पनाचित्रांत मोडतें. कल्पनाशब्दाला इंग्रजी प्रतिशब्द Interpretation हा देतां येईल. बुद्धाची मूर्ति ही ऐतिहासिक नसून सांकेतिक स्वरूपाची आहे असें त्यांचें मत असल्याचें दिसतें. परंतु या संकेताचे त्यांनीं नियम दिले नसल्यामुळे याचा जास्त ऊहापोह करणें निरर्थक आहे. कदाचित् काव्यांतील संकेतांना उद्देशून पंडितजींचें वरील म्हणणें असेल. सुंदर नेत्र म्हणजे कमलाप्रमाणे असा संस्कृत कवींचा संकेत हिंदी चित्रकारांनी उचललेला आहे कीं काय हें आम्हांस ठाऊक नाही. परंतु तसें असल्यास हिंदी चित्रकारांचें वैशिष्ट्य समजलें पाहिजे. रावणाचा कपटी व मायावी स्वभाव, त्याला दहा तोंडें लावून दाखविण्यांत येतो हें खरें असलें तरी तो संकेत होऊं शकत नाही. एकदां एक व दुसऱ्यांदा दुसरें असें बोलणाऱ्याला दुतोंड्या ही संज्ञा जनता बहाल करते, त्याप्रमाणे दशमुख ही संज्ञा त्याच्या टीकाकारांनी दिल्यानंतर चित्रकारांनी दहा तोंडें दाखविलेला रावण चितारावा हें स्वाभाविक आहे. ज्याला आत्मिक, आध्यात्मिक अथवा अतींद्रिय या विशेषणांनी ग्रंथकारांनीं गौरविलें आहे. त्या सर्वांचा अंतर्भाव कल्पनाचित्रांत होऊं शकेल असें आम्हांस वाटतें.

१०. सपाट भिंतीवर, पाटीवर अथवा कागदावर चित्र काढतांना खोली, उंची व अंतर हीं दाखविणें भाग असतें. दूरचा पदार्थ लहान दिसतो व त्याचा रंगहि निळा असल्याचा

भास होतो, ही गोष्ट भारतीय चित्रकारांच्या ध्यानीं न आल्यामुळे दूरचे पदार्थ लहान दाखविणें अथवा लांब असलेले डोंगर निळ्या रंगांत दाखविणें त्यांच्या हातून होत नाही असा आरोप हिन्दी चित्रकारांवर केला जातो, आणि तो पंडितजींनीहि नाकबूल केला नाही. अर्थात् हा दोष प्राचीन चित्रांतून आढळतो हें अुघड आहे. आता कदाचित् असें म्हणतां येअील की हिंदी चित्रकार वस्तुचित्र काढीत नाही; तो कल्पनाचित्र काढतो, त्यामुळे त्यास दृक्प्रत्ययाचे नियम पाळण्याचें कारण नाही.

११. सांप्रत हिंदुस्थानांत पहिल्या नंबरचा चित्रकार फारसा नाही हें पंडितजींचें निरुत्साहक विधान वाचून कोणालाहि खेद झाल्याशिवाय राहणार नाही. पण त्याहिपेक्षा प्राचीन चित्रकलासुद्धा सजावटी चित्रकलेचा अेक भाग आहे असें त्यांनी अजंठा, रजपूत, वेरूळ, मोगल, बंगाली अित्यादि चित्रपद्धतींविषयी आपलें काय मत आहे, या विचारलेल्या प्रश्नाचें दिलेलें अुत्तर वाचून भारतीय चित्रकलेविषयीचा अभिमान गलित झाल्यावांचून राहणार नाही.

१२. समाजाच्या जीवनाशीं चित्रकलेचा कितपत संबंध असतो या प्रश्नाचें अुत्तर पंडितजी असें देतात की ही कला जर समाजांत मुरली जाअील तर समाज अधिक सुसंस्कृत होअील. ते आणखी असेंहि म्हणतात की, प्रत्येक कलेचा मानवी जीवनाशीं संबंध आहे. आमच्या मतें शब्दांचे अर्थ जर बरोबर समजले असतील तर पंडितजींचें वरील अुत्तर थोडें अतिव्याप्त आहे. मनाला आनंद देण्यापलीकडे गायनकला जीवनाशीं अन्य तऱ्हेने संबद्ध होअूं शकेल असें आम्हांस वाटत नाही. चित्रकला मात्र ध्येयाच्या प्रचाराच्या कामीं अुपयोगांत आणणें शक्य आहे. हजारो शब्दांचा अर्थ केवळ चित्रावरून क्षणार्धांत पाहणाराच्या मनांत भरतो. वर्तमानपत्रांत नुसते फोटो देतात ते पुष्कळ प्रसंगीं अर्थहीन असतात. ज्या प्रसंगाकरिता व्यक्तीचा फोटो देण्यांत येतो, त्या प्रसंगाचें मर्म वाचकांना पटविण्याकरिता प्रसंगविशिष्ट असाच फोटो देण्यांत आला पाहिजे. काँग्रेसवर जुलूम, छळ, दुष्टपणा अित्यादिकांचा आरोप करणारा जिना मोठ्या गुर्मीने लिहितो अगर बोलतो आहे असें जर त्याच्या चर्येवरून वाचकांस दिसलें नाही, तर प्रत्येक वेळीं तोच तोच फोटो प्रसिद्ध करण्यांत वर्तमानपत्रकार काय साधतात कोण जाणे! फोटो प्रसिद्ध करण्याच्या अैवजीं प्रसंगाला साजेशीं चित्रें काढून तीं देण्याने अधिक कार्यभाग साधण्यासारखा आहे. अशा प्रकारचीं चित्रें फारच थोड्या मासिकांतून अगर वर्तमानपत्रांतून येत असतात. व्यंगचित्रें याहून निराळीं हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे. चित्रें हा अेक भाषेचा प्रकार आहे आणि कित्येक प्रसंगीं भाषेपेक्षाहि अधिक परिणामकारक कार्य चित्रांकडून होत असतें.

१२ अ. युरोपिअन चित्रकला वास्तववादाभिमानी आहे ह्याचें कारण असें की प्राचीन ग्रीक लोकांनी मनुष्याचे देव बनविले तर खिस्ती राष्ट्रांनी देवाचा मनुष्य केला. म्हणून मनुष्याभोंवतीं त्यांची कला वावरलेली दिसते. हिंदूंचें तसें नाही. सर्व जग पूर्णत्वाने अेकात्मक आहे ही त्यांची कल्पना. गीतेंतील विश्वदर्शन हें त्या कल्पनेचें व्यक्त स्वरूप. हजारों बाहूंचा, हजारो पायांचा, हजारो डोक्यांचा, खात असलेला, निद्रिस्त, अुभा असलेला, बसलेला असा विक्राळ पुरुष आम्ही कल्पितों. ह्या कल्पनेचा परिणाम आमच्या चित्राकृतींवर झालेला दिसतो. मुसलमानांत तर मनुष्याचें अथवा देवाचें चित्र काढणें हें धर्माने निषिद्ध मानलें आहे. आमच्या चित्रकलेचा पाया भावना नसून अेक विशिष्ट तत्त्वज्ञान आहे असें वाटतें.

१३. पंडितजींनी संस्कृतिविषयक पांच निबंध लिहिले आहेत. अर्थात् ते आर्यसंस्कृतीला अनुलक्षून आहेत हें सांगावयास नको. वस्तुतः संस्कृति हा अर्वाचीन शब्द असून तो

परंतु निबंधरूपी लेखांत असा प्रकार योग्य ठरणार नाही. अुदाहरणार्थ 'सहनाववतु सह नौ-भुनक्तु (पृ. ९८) या शान्तिमंत्रांतील नौ या शब्दाचा अर्थ पंडितजींनी मोठा गमतीदार केला आहे. 'नौ' म्हणजे दोन प्रकारचे लोक, आणि ते म्हणजे मागासलेले व पुढारलेले, सुशिक्षित व अशिक्षित, श्रीमन्त व दरिद्री, अधिकारी व अनधिकारी, कारखानदार व मजूर वगैरे वगैरे. या द्वंद्वांतील सर्व लोकांनी सुखाने राहावें हें ध्येय ब्रह्मचर्याश्रमांतील विद्यार्थ्यांच्या पुढे ठेविलें जात असे हा निष्कर्ष अुपर्युक्त मंत्रावरून पंडितजींनी काढला आहे. नौ शब्दाचा असा अर्थ करण्याला आधार पंडितजींनी दिलेला नाही. असा अर्थ व अत्यनुमान काढूं लागल्यास वाटेल तें कोणत्याहि गोष्टीने सिद्ध करतां येअील. "वर्णाश्रमामध्ये वैयक्तिक अुत्कर्षास पूर्ण वाव आहे." (पृ. १०२) असें सांगतांना शूद्रांचें विस्मरण पंडितजींस झालें असावें असें वाटतें.

१६. प्रचंड शक्तीचा आवेश या लेखामध्ये पंडितजींनी वाणीचें सामर्थ्य वर्णिलें आहे. आमच्या मतें हाहि लेख व्याख्यानाच्या स्वरूपाचा आहे. परंतु ज्या मनूच्या श्लोकावर हा सबंध लेख आधारलेला आहे तो श्लोक त्यांच्या पुढील विवेचनास अनुपकारक होण्यासारखा आहे अशी आम्हांस भीति वाटते. मनूचा हा श्लोक अत्यंत महत्त्वाचा असून त्यांत त्याने पापपुण्याची मीमांसा केली आहे. तो श्लोक असा—

"न मांसभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने ।
प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला ।।"

मांसभक्षण, मद्यपान व मैथुन ह्या तीन प्रवृत्ति मनुष्यप्राण्याला सहज असल्यामुळे त्याच्या हातून पापहि घडत नाही व पुण्यहि घडत नाही. परंतु या प्रवृत्तींच्या विरुद्ध म्हणजे अनैसर्गिक क्रिया करण्यास जेव्हा मनुष्य प्रवृत्त होतो तेव्हा तो हीन वृत्तीचा अथवा पापी समजावा. स्वाभाविक पाशवी वृत्ति नष्ट करून त्या ठिकाणीं सद्वृत्तींचें जतन करण्याचा प्रयत्न करण्यांत मात्र पुण्याची प्राप्ति होते. कालिदासाने वर्णन केल्याप्रमाणे सज्जनांची स्वाभाविक वृत्ति सत् स्वरूपाची असते. अुदाहरणार्थ, सामान्य माणसाची प्रवृत्ति मद्यपानाकडे असते व तदनुसार त्याची वागणुकहि होते. साधक दशेंतील मनुष्याची वृत्ति ह्याप्रमाणेंच असली तरी तो त्या वृत्तीचें नियंत्रण करून आपलें आचरण वृत्त्यनुसार होअूं देत नाही. अशा स्थितींतला मनुष्य नराचा नारायण होअूं शकतो. स्त्रीविषयक मनुष्याची वासना जरी स्वाभाविक असली तरी स्वस्त्रीतरविषयक वासना ही अस्वाभाविक होण्याअितकी मनुष्याची वृत्ति बनली पाहिजे. ह्यांतच नीतीचें अथवा पुण्याचें बीज असतें. सारांश, मनु म्हणतो जें नैसर्गिक असतें तें मनुष्य अभ्यासाने आपल्यापुरतें अनैसर्गिक करूं शकतो. वस्तुतः मनुष्यसमाजांत सत्प्रवृत्ति हीच नैसर्गिक असणें अवश्य आहे. शत्रुत्व ही पाशवी वृत्ति समजली तर मित्रत्व ही मानवी वृत्ति समजली पाहिजे. अशा वृत्तीच्या पायरीला मनुष्य पोचला आहे असा कित्येकांचा विश्वासहि आहे. दुष्टपणाने अथवा लोभाने जगामध्ये अत्याचार केले जातात आणि तेच मनुष्याच्या डोळ्यांत भरतात. ह्याच अत्याचारांना अितिहासलेखक राष्ट्राचा अितिहास म्हणून समजतात. आणि विद्यार्थ्यांना हाच अितिहास शिकविला जातो. परंतु दया, प्रेम, स्नेह अित्यादि मानवी वृत्तींनी समाजाचें मोठें कार्य केलें आहे. तथापि हें कार्य सावकाश व प्रच्छन्न रूपाने होत असल्यामुळे तें दृष्टीआड होतें. ह्या भूमिकेवरून जगाचा अितिहास लिहिल्यास निराळेंच चित्र समाजापुढे अुभें राहील. ह्या दृष्टीचा अितिहासलेखक प्रथम जगाचाच अितिहास लिहिण्यास आरंभ करील कारण ह्या ठिकाणीं त्याला मानव्याचा विचार करावयाचा असतो. संकुचित मनुष्यसमूह पुढे ठेवून अितिहासलेखकाचें कार्य करतां येणें शक्य नाही. म्हणून

आमच्या समजुतीप्रमाणे खरी संस्कृति ही संस्कारांत सांपडण्यासारखी नसून वर वर्णन केलेल्या मानवी वृत्तींत आहे.

१७. ह्याच दृष्टीने 'सांस्कृतिक सारस्वत' हा लेख वाचला असतां त्याची अुपयुक्तता कळणार आहे. सांस्कृतिक सारस्वतांत ज्या गोष्टींचा अंतर्भाव झाला पाहिजे त्या नअू गोष्टी पंडितजींनी संक्षेपाने सांगितल्या आहेत (पृ.६२,६३). त्यांच्याबद्दल कोणासहि आक्षेप घेतां येणार नाही. परंतु प्रश्न अितकाच कीं, कोणत्या लोकांच्या सांस्कृतिक सारस्वतांत ह्या गोष्टी बसू शकणार नाहीत ! विचार केला असतां कोणालाहि हें पटेल की, अेखादी विशिष्ट संस्कृति अेखाद्या विशिष्ट मनुष्यगटांत निर्माण झाली असली तरी तिच्यावर सर्व मानवजातीचा हक्क असतो, व सर्व जगांत तिचा प्रसार झाल्याशिवाय राहत नाही. म्हणून विशिष्ट संस्कृतीचा अभिमान धरणें व तिलाच चिकटून राहणें हितकर होणार नाही. संस्कृति अथवा संस्कृतीबद्दलच्या कल्पना बदलत असतात हें पंडितजींस मान्य असावें असें त्यांनी जुनींपुराणीं मतें म्हणून ज्यांचा निर्देश केला आहे त्यांवरून स्पष्ट दिसतें. गणिका, वारस्त्री व वेश्या हे तीनहि शब्द वस्तुतः अेकाच अर्थाचे असावेत असा आमचा तर्क आहे. अमरकोशकारहि तसेंच समजतो. वारस्त्री या शब्दावरून मुदतबंदी विवाहाची चाल पूर्वी होती असें अनुमान पंडितजींनी काढलें आहे तें बरोबर नाही. वार म्हणजे समूह, दिवस नव्हे. समुदायांच्या स्त्रियांना गणिका, वारस्त्री, वेश्या हीं नांवें असावीत. गंगेच्या स्तोत्रांतील "वारस्त्रीमिश्रमरमरुतावीजितो भूमिपालः" ह्यांतील वारस्त्री शब्दाचा अर्थ वेश्या आहे. गणिका व वारस्त्री या वेश्या नव्हेत (पृ. ६९) असें म्हणण्यास पंडितजींनी आधार दिला नाही, आणि आम्हांलाहि असा आधार कोठे सांपडला नाही. सूत्रकारांनी अगर स्मृतिकारांनी समूहविवाह मानलेला नाही. कौटिल्याने स्मृतिकारांचेच विवाहाचे आठ प्रकार सांगितले आहेत (अ.५९). गणिका ही वेश्येहून निराळी नव्हती असेंच कौटिल्य मानतो (अ. ४८). विश म्हणजे जनता, आणि जनतेच्या अुपयोगी पडणारी ती वेश्या. अशा वेश्येमध्ये आणि वारस्त्री व गणिका यांमध्ये भेद करण्यास कोणतेंहि कारण दिसत नाही. गणिका व वारस्त्री हे शब्द रूढ असले तरी गणविवाह व वारविवाह हे शब्द स्मार्त, पौराणिक अथवा अैतिहासिक वाङ्मयांत आम्हांस आढळले नाहीत. ह्यासंबंधाने पुष्कळ लिहिण्यासारखें आहे परंतु विस्तारातिशयाच्या भीतीने आवरतें घेणें भाग आहे. भाषणाच्या भरांत व हिंदुत्वाच्या अभिमानाने पंडितजींनी काढलेलीं अनुमानें व त्यांचें केलेलें समर्थन हीं जरी विवेकी मनाला पटण्यासारखीं नसलीं तरी त्यांनी मधून मधून अुच्चारलेलीं वाक्यें त्यांच्या विवेकजागृतीचीं साक्ष देणारीं आहेत. अुदाहरणार्थ "हिंदु कधीहि जुन्याच पद्धतींस चिकटून राहिले नाहीत. जेवढें अुपयोगी असेल तेवढें आत्मसात् करावें व हानिकारक असेल तें सोडून द्यावें असें करीतच हिंदूंची संस्कृति बनत आलेली आहे" (पृ.६१).

१८. धी, श्री, व स्त्री हा क्रम कोणत्या ग्रंथांत पंडितजींना सांपडला याचा निर्देश पंडितजींनी केल्या नसल्यामुळे त्याच्या आधारावर रचलेली इमारत अथवा केलेलें भाष्य विशेष विचारांत घेतां येणार नाही हें सांगावयास नको. हें कांहीहि असो. समाजाला हितकर तेंच साहित्य ही लेखनकलेंत वासुदेवराव आपट्यांनी अुल्लेखिलेली साहित्याची व्याख्या पंडितजींनी दिली आहे तिचा स्वीकार केला म्हणजे समाजाला अमुक प्रकारचें सारस्वत हितावह होअील कीं नाही अेवढाच मतभेदाचा विषय होअील.

१९. यानंतर पंडितजींनी हाताळलेल्या वैदिक वाङ्मयाचा परामर्श घेणें जरूर आहे. वेदामध्यें सुरूप हा शब्द आल्यामुळे सौंदर्याची कल्पना वैदिक ऋषींना होती असें पंडितजी

आपणांस सांगतात. अेका शब्दावरून सिद्धान्त बनविणें धोक्याचें असतें. वेदांत सौंदर्याची कल्पना नाही असें म्हणणारे आक्षेपक सुंदर चेहेरा व कुरूप चेहेरा ओळखण्याचें ज्ञान वैदिक आर्यांस नव्हतें असें समजत असतील असें आम्हांस वाटत नाही. त्याचप्रमाणे वेदकालीं लेखनकला होती असें ते ज्या आधारावर प्रतिपादन करतात तो आधार गवताच्या काडीप्रमाणे तेव्हाच मोडून जाण्यासारखा आहे. ह्यावरून वेदकालीन लेखनकला नव्हतीच असें सुचविण्याचा आमचा उद्देश नाहीं हें सांगणे जरूर आहे. वाणी प्रत्यक्ष पाहत असतांहि (पश्यन्न ददर्श वाचम्) या वैदिक वचनाचा लाक्षणिक अर्थहि कित्येक करतात हें विसरतां कामा नये.

२०. पंडितजींचे बाकीचे बहुतेक लेख प्रचारकी पद्धतीचे असल्यामुळे त्यांचें कांटेकोर विवेचन करणें पंडितजींना अन्यायाचें होअील. अुदाहरणार्थ वामनावतारावरील लेखांत पुत्रांच्या नाशाबद्दल अदितीला वाअीट वाटलें असतांना अखिल आर्यमातांचा जळफळाट झाला असें प्रतिपादणें अथवा माझ्या स्थानापासून मला हाकून लावलें असा आक्रोश देवमाता करीत असतां त्याचा अर्थ देवराष्ट्रांतील सर्व चांगल्या जागा व अधिकाराच्या जागा दैत्यांनी बळकावल्या होत्या असें सांगणें योग्य होणार नाही. अशा ओढाताणींत हायग्रीव असुराला देववीर मानणें (पृ.१६२) अथवा देव आणि आर्य यांना परस्परशत्रु बनविणें असे प्रकार घडत असतात (पृ. १६६).

२१. पंडितजींना सांस्कृतिक सारस्वताखेरीज दुसरें सारस्वत नको. ह्यामुळे जुन्या सारस्वताची नवीन तऱ्हेची मांडणी करणें किंवा नवीन उपपत्ति सुचविणें एवढेंच काम होतकरू लेखकांनी करीत बसावें हा त्यांचा सल्ला नवीन पिढीस तर राहोच परंतु जुन्या पिढीलाहि मानवण्यासारखा नाही. गीतारहस्याचें अुदाहरण त्यांनी आपल्या मतास पोषक असें दिलें आहे.

२२. ह्या पुस्तकांतील शेवटले दोन लेख 'जातिभेद' व 'कुटुंबसंस्था' हे सामाजिक स्वरूपाचे आहेत. आम्हांला असा संशय येतो की, पंडितजींनी सदरहु लेख घाअीघाअीने लिहिले असावेत. हिंदूंमध्यें जातिभेद नाहीत जातिव्यवस्था आहे असें पंडितजी सांगतात. परंतु या दोहोंमध्यें कोणता फरक आहे तें मात्र सांगण्यास विसरतात, आणि पुनः कोणत्याहि ठिकाणचा जातिभेद नष्ट होणें केव्हाहि शक्य नाही (पृ.२३७) असेंहि बजावतात. ह्याचा अुघड अर्थ असा होतो की, युरोप-अमेरिकेमध्येंहि जातिभेद आहेत असें पंडितजींचें मत दिसतें. अर्थात् विविधता अुर्फ भेद आणि जातिभेद हीं अेकच आहेत अशी समजूत पंडितजींनी करून घेतली आहे. परंतु जगांतील विविधता कोणींच अमान्य केलेली नाही व त्याबद्दल तक्रारहि नाही. आम्हांला असें वाटतें की, आक्षेपकांचें म्हणणें पंडितजींच्या ध्यानांत आलें नाही.

२३. वरील लेखांप्रमाणेच कुटुंबसंस्थेवरील लेखांबद्दलहि म्हणतां येअील. पतिपत्नींचें कुटुंब, किंवा पति-पत्नी आणि अज्ञान मुलें ह्यांचें कुटुंब, किंवा पति-पत्नी आणि सज्ञान मुलें ह्यांचें कुटुंब, किंवा विवाहित भावांचें कुटुंब, किंवा विवाहित चुलतभावांचें कुटुंब, यापैकी कोणत्या कुटुंबाला अुद्देशून पंडितजींनी विवेचन केलें आहे तें चांगलेंसें लक्षांत येत नाही. त्यामुळे ह्या दोन लेखांसंबंधाने मत प्रदर्शित करणें कठीण झालें आहे. निदान आम्हांला तरी ह्या दोन्ही लेखांचा बोध नीट झाला नाही हें प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे.

पुस्तकाला श्रीमंत बाळासाहेब पंत ह्यांची प्रस्तावना आहे. ती सहृदयताभिव्यक्तीमुळे अत्यंत वाचनीय झाली आहे.

ना. गो. चापेकर

## नादनिनाद

[लेखक– श्री. द. र. कवठेकर; प्रकाशक– कॉन्टिनेंटल बुक सर्व्हिस, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य दीड रुपया.]

अेक नवोदित लेखक म्हणून श्री. कवठेकर यांचा महाराष्ट्राला आता परिचय झालेलाच आहे. नि त्यांच्या 'नाद निनादा'ने त्यांच्या पूर्वसंपादित यशांत महत्त्वाची भर टाकली आहे. या लघुकथासंग्रहांत अेकंदर अकरा गोष्टी आहेत आणि सर्वच आपापल्या परीने चांगल्या असल्याने अेखाद दुसरीकडेच विशेषेंकरून बोट दाखवायाला जागाच नाही. शिवाय विषयवैचित्र्यहि भरपूर. अेकींत अेका बिचाऱ्या लेखकमहाशयाची पाहुण्याने (अन् पाहुणा तरी कोण ! बायकोचा चुलतभाऊ ! त्यामुळे बोलायची चोरी) केलेली कुचंबणा, दुसरींत भांगेच्या नशेमुळे काळ्या, ठेंगू, बसक्या नाकाच्या, बटबटीत डोळ्यांच्या निशेशीं करावा लागलेला जबरीविवाह, तिसरींत नव्या ज्वानींत बायको नि पोरेंबाळें यांच्या नादांत गुरफटून, पितृतुल्य वडील भाऊ नि देवतातुल्य आअी, यांची केलेली आबाळ आठवून पश्चात्तापदग्ध झालेलें अंतःकरण, तर चवथींत जिच्याशीं शाश्वत प्रेमाच्या गोष्टी केल्या ती सौंदर्यशालिनी पत्नी, दुःसाध्य रोगाने पीडित अशी आसन्नमरणावस्थेंत मृत्युशय्येवर तळमळत असतांना, स्वतःच्या नि मुलाच्या आरोग्यासाठी, जिवितासाठी, स्वतःला नि मुलाला तिजपासून दूर, तिच्या आर्जवयुक्त, व्याकुळ, आर्त (पृ.१३२) ओष्ठांपासून दूर दूर, ठेवूं पाहणाऱ्या पुरुषी मनाचीं आंदोलनें ! किती वेगवेगळे देखावे ! पण प्रत्येकांत अढून दिसणारा तोच कलागुण, आणि तीच वर्णनाची वास्तवपूर्ण आर्तता.

'गालावरचा मुका', 'आअी असती तर', 'मी भिकारी !' या गोष्टी या बाबतींत विशेष अुल्लेखनीय होत. १३० व्या पृष्ठावरील संत्र्याच्या फोडीचा प्रसंग हृदय पिळवटून टाकणारा आहे; लगेच १३२ वरील अंबूताअीला हुंदका न आवरतां आल्याने, त्यांनी लुगड्याचा बोळा तोंडांत कोंबला आणि मुका घेण्याकरता अरविंदला पुढे केलें, पण...अखेर 'चित्रणीच्या दाताने'च बिचाऱ्या आईने त्याचा निसटता मुका– नि तोहि गालावरचा– घेतला, तो प्रसंगहि फार हळुवार हाताने रंगविला आहे पृ. ९४।९५ पृष्ठांवरील बिचारा काळासावळा सदू आनंदाच्या आअीलाच 'आअी' म्हणून हाक मारतो, 'ती गोड लहर अननुभूत वाटून' तीन तीनदा पुटपुटणारा –'आऽअीऽ' म्हणून त्यांच्या ओच्यांत तोंड खुपसणारा सदू– वत्सल भावनेच्या अुद्रेक दाखविणाऱ्या मराठी वाङ्मयांतील अुत्कृष्ट वर्णनांपैकी एक म्हणूनच त्याचा अुल्लेख करावा लागेल. 'नीरांजना'च्या गोष्टींत ती अशिक्षित, काळीसांवळी, टाकलेली तरुण बायको, जेव्हा आपल्या द्वितीय विवाहित पतीजवळ 'आठ पंधरा दिवस मला ठेवून घ्यावी, तेवढ्यांत देवाला दया आली ... तर 'बाळाकडे पाहून मी सारं सहन करीन,' असें म्हणते, तेव्हा तिच्या काळ्यासावळ्या रूपाच्या आड दडलेली मानवी मनाची सुन्दरता नि निष्पापता, त्या कठोर, व्यवहारी पुरुषाला दिसते– उत्तम प्रसंग नि अतिशय थोडक्यांत मोजक्या, शब्दांत वर्णिलेला.

स्वभावविश्लेषण करतांना लेखकाने प्रत्यक्ष घटना नि तिचे आघातप्रत्याघातरूपाने पात्रांच्या मनावर व वागण्यावर झालेले परिणाम दर्शवूनच स्वभाववैशिष्ट्यें वर्णिलीं आहेत. शेवटची कथा 'मी भिकारी !' पाहा. 'श्री'चा मानीपणा, गरीबींतहि कष्टाचें पण सन्मानाचें जिणें जगण्याची धडपड, कष्ट अुपसणाऱ्या आअीला नि अजाण बहिणीला विस्मयचकित करून सोडण्याची त्या कोवळ्या मुलाची ती स्वाभाविक अिच्छा व म्हणूनच आअीपासून नोकरी लप-

वून ठेवण्याची पराकाष्ठा अित्यादि प्रसंगांमागून प्रसंग निवडून या मानघन गरीब 'श्री'चें स्वभाव चित्र लेखकाने परिपूर्ण चितारलें आहे. 'महार' या कथेंतहि असेंच. भिडस्तपणाचें मार्मिक चित्र आहे तें ! नि त्याचा कळस केला आहे 'भिडस्तरावांचें'च घड्याळ त्या तीस रुपये अुसने नेअून परत करण्याची गोष्ट काढूं न देणाऱ्या मित्राला पंचवीस रुपये रोख किंमतीला विकत द्यायला लावण्यांत ! 'तुम्ही तरी काय !' या गोष्टींत मात्र निव्वळ प्रसंगनिष्ठ स्वभावविकास नसून अेका लांबलचक कैफियतीच्या रूपाने तो केलेला आहे.

घरगुती वातावरणाचा लेखकाचा अनुभव जितका व्यापक तितकेंच त्याचें निरीक्षण सखोल आहे. गरीबी जितकी जाणवत नाही तितकें गरीबांना अितरांनी मदत देअून हिणवणें जाणवत असतें (पृ. १६९). 'आवळा देअून सहानुभूति दाखविणाऱ्या नातेवाअीकांनी यांना माझ्याचप्रमाणे जीवन देखील अत्यंत मानहानीचें करून सोडलें. ... दुसऱ्याला लाजवून आपली आत्मप्रतिष्ठा वाढविण्याची साऱ्यांची धडपड' (७८), गरीब आअीने साखरपाऱ्याच्या वड्या मुद्दाम आणल्या 'श्रीमंत' मुलाकडे– बावरें मातृहृदय ! पण त्याची त्या मुलाला काय ओळख ! त्याच्या मनांत विचार आला— 'आमच्या घरीं काय 'थोड्या' होत्या वड्या !... पण नाही. या म्हाताऱ्या माणसांची खोडच' (१३) अंबूताअीने सुधेजवळ अरविंदला आणलें– असेल, ती क्षयाने, संसर्गद रोगाने आजारी असेल, पण मुलाचे नि मातेचे ओठ चुंबनासाठी अधीर झाले असतांना त्यांना दूर ठेवायचें हा कुठचा न्याय ! माणसाघरचा न्याय असेल, देवाघरचा खात्रीने नाही ! आणि म्हणूनच ती आश्वासन देते...'देव कां पहात नाही !...अरविंदला कांहीसुद्धा व्हायचें नाही.' दोनच वाक्यें. पण स्त्रीहृदयाला किती शोभून दिसतात ! (१३३). आणि हें पाहा 'हिचा चुलता— माझा भाअू बडा पोलीस अधिकारी आहे, तरी (तरी !!!) हे लोक आम्हांला नांवें ठेवायला धजतातच !' (१५०), सबंध पोलीसखात्याची ही भावना–! मार्मिक निरीक्षणाबरोबरच भाषाशैलीहि सहज नि सुंदर. 'त्यांचीं नातीं म्हणजे कोळ्याच्या जाळ्यासारखीं' (७०). 'पुरोळ्याला अुरोठा म्हणूनच कीं काय तिचा हेवादावा अन् दुष्टावा करायला रामजींच्या नव्या कारभारणीची रंडकी झालेली पंधरा-सोळा वर्षांची मुलगी' ('लेक' म्हणायला हवें होतें नाही !) (११२), 'तुझें प्रेम म्हणजे तुझ्या जीवनांतील अेक प्रसंग, अेक घटना, अेक जीवितकथा रंगविण्यासाठी अुपयोजिलेलें साधेंसुधें अुपकथानक वाटतें तुला... तिचें प्रेम हें तिचें जीवितसर्वस्व—प्रेमाच्या मध्यबिंदूभोंवतीं तिच्या जीवितकथानकाचे धागे-दोरे घट्ट घट्ट विणलेले, मरेपर्यंत न तुटणारे' (१२५-२६).

कांही ठिकाणची अवास्तव लांबण कमी होती तर या कथा याहिपेक्षा अधिक सुंदर करतां येत्या. अुदाहरणार्थ, पाहिलीच कथा 'तिळाच्या वड्या'. अनुतप्त हृदयाचें आविष्करण करतांना पहिलीं १ ते ४ पृष्ठें सदाशिवरावाच्या तत्सम कथानकांसाठी अुगाचच खर्ची घातलेलीं दिसतात. स्वतःच्या आअीची स्मृति करून द्यायला म्हणून पार्श्वभूमीसारखा जरी याचा अुपयोग स्पष्टच असला तरी त्यांत प्रमाणबद्धता नाही. तसेंच तेथे आअीचें मन दुखविणारे म्हणून जे आठदहा छोटे छोटे प्रसंग निवडले आहेत ते चांगले असले तरी संख्येने फार वाटतात. सायकलचा धक्का लागणें, काथंडी लवंडणें नि अखेर पायरींतच पडून खोंक पडणें– फारच ताण पडतो वाचतांना भावनांवर. आणि करुणरसाला नि पोटच्या पोराच्या निर्घृणतेला सुद्धा लेखकाने थोड्या मर्यादा घालायला हव्या होत्या. पण– जसे ते जुन्याकाळचे 'खलनायक'! अतिशयोक्तीनेच त्यांचीं चरित्रें रंगविलेलीं. तसेंच कांहीसें भाअूच्या बाबतींत झालेंसें वाटतें. अलंकारांचा मुकुटमणि जो ध्वनि जी सूचकता ती अुरलीच नाही कोठे ! अेखाद्या दुकान-

दाराने सगळा चालू माल बाहेर मांडून ठेवावा, आणखी कांही वेगळ्या चीजा आंत कपाटांत असतील असें गिऱ्हाअिकाला वाटण्याचें ठेवूंच नये, तशी गत झाली येथे !

तसेंच कांही ठिकाणीं भाषा व कल्पनादोष. ३३ व्या पृष्ठावर कुनी, बबा, वक्ताला, पन्, तुमी, लअी, व्येस वगैरे 'ग्वार्टी'च्या संगतींत 'लअी आदर' आला तो कसा ? माना डोलवाय-ऐवजीं 'मुंड्या' डोलवायला लावण्यांत (७१) काय साधलें ? आमोदप्रमोदानंतर लगेच 'खवडाळी' (खोड्या) नि अंगच्छायेने दिल्लगी-या गंगाजमनी जोड्या (१२३) नेहमीच्याच आहेत. बाकी कविश्रेष्ठ मोरोपंतांपासून तों केशवसुतांपर्यंत हा संप्रदाय चालत आला आहे. आंत मंदिरांत गीतेवर प्रवचन नि बाहेर सिनेमाची दिलखेचक जाहिरात ! वडील बहीण आंबाडा बांधते नि फुलांची वेणी घालते, अन् धाकटी हेअर बॉब करून येते – मुंबअीच्या लोकलमध्ये ढुंगणाभोवती जेमतेम लज्जारक्षणापुरती लुंगी लावलेला मच्छीमार नि बूटमोज्यां-पासून कॉलर नेकटायपर्यंत जामानिमा केलेला साहेब खेटून बसतातच की ! अगदी शेवटच्या पृष्ठावर शेवटच्या परिच्छेदांत 'मी भिकारी' या लोकोक्तीचें पूर्णतया वैयर्थ्य दाखविलें तें दोन्ही अपत्यांच्या नांवापुढे 'रत्न' हा शब्द लावला असता तर अधिक हृद्य झालें नसतें का ? १६४ पृष्ठावर 'वडील वरून पहातात ... तें त्यांना दिसतं म्हणे' या ठिकाणीं 'म्हणे' हा शब्द दुष्ट वाटतो. त्या लहान पोराचा तर तो दृढ विश्वास नि तो त्याने पदोपदीं व्यक्तहि केला नाही का ? मग हें 'म्हणे' कशाला ? भावनेचा डळमळितपणा दाखविणारा हा शब्द शोभत नाही त्या बालसुलभ प्रसंगांत. अशीच आणखी अेके ठिकाणीं अेक कल्पना कमी केली तर सौन्दर्य वाढण्यासारखें आहे. पृ. १३७ वर, शेवटींच, 'शवावर फुलें अुधळावींत' अेवढेंच पुरें नि अर्थव्यक्ति करण्यास पुरेसें आहे. 'स्मारकें अुभारावींत' या दुसऱ्या कल्पनेमुळे स्वारस्य कमी होतें. 'तें प्रेमाचें, गाढ प्रणयाचें अितिवृत (so-called) शाश्वत प्रीतीचें शवच अुरलें होतें नि आता सुस्कारे सोडणें, अश्रु ढाळणें, हातात हात घेअून तो प्रेमाने कुरवाळणें, किंबहुना चुंबना-करतां अधरोष्ठ पुढे करणें हें सर्व शवावर फुलेंच होत'– मार्मिक कल्पना. पण यांत 'स्मारकें' कोठे येतात ? कथानकासंबंधी बोलायचें तर चवथ्या कथेंतील ती टाकलेली पहिली बायको 'समोरच्याच' घरांत राहायला आणून लेखकाने काय साधलें ? समोरच्याच घराचा फायदा घेअून अेखादी अनपेक्षित नयनभेट (!) दाखविली असती, तींतून अुत्पन्न झालेल्या गोंधळलेल्या मनःस्थितीच्या लाटांचीं आंदोलनें वर्णिलीं असतीं, त्या छेदबिंदूपासून कथेला निराळें वळण लावलें असतें, तर वेगळें. अेरवी लेखकाजवळ Deuex machina हजर असतो तो अल्लाअुद्दी-नाच्या दिव्याप्रमाणे वाटेल तें निर्माण अरूं शकतो, त्याची मात्र येथे आठवण होते– नव्हे, समोरचें घर घेअून मग नेत्रपल्लवी, करपल्लवी, अंगपल्लवी वगैरेंचा योग्य अुपयोग न केल्याचाच आरोप लेखकावर शाबीत करतां येअील.

गोष्टींना शीर्षकें देण्यांत, नांवें देण्यांतहि अेक दोन सूचना कराव्याशा वाटतात. मध्य-वर्ती प्रसंग वा कळसाला पोचलेली घटना, कथेंतील विषय, महत्त्वाचें पात्र किंवा स्थल अित्यादि अनेकांवरून नांव ठेवतां येतें हा सर्वसामान्य नियम आहे. पण त्यापैकी कोणतें स्वीकारावयाचें हा त्या त्या गोष्टीच्या महत्त्वावर अवलंबून असणारा प्रश्न आहे. प्रत्येकांत कांही-तरी तरतमभाव असतोच. या दृष्टीने 'महार', 'पदराखालची पोर' हे मथळे चिन्त्य आहेत. ... पण याचें विवेचन येथे अेवढेंच पुरे.

या सुंदर कथासंग्रहांत काय काय आहे तें अेथवर सांगितलें– नि तेवढेंच सांगावयाचें

होतें. नाही काय तो आजचा माझा विषयच नाही. पुनः अेकदा श्री. दत्त कवठेकरांच्या प्रभावी नि यशस्वी प्रतिभेचें अभिनंदन करून हें परीक्षण संपवितों.

चिं. य. काळे

---

## अुषा

[लेखक– 'कृष्णाकुमार', अेम्.अे.; प्रका.– श्री. ग. ना. अंबेकर, गोदावरी प्रेस, नांदेड.]

'मराठ-वाङ्मयांत' अुर्फ निजाम महाराष्ट्रांत प्रसिद्ध झालेल्या, या पहिल्या लघुकथासंग्रहाचें सगळ्या महाराष्ट्राने कौतुक करण्यासारखें आहे. श्री. कृष्णाकुमार, अेम. अे., यांनी नौकरी-चाकरी संभाळून, त्यांचा पहिल्यापासूनचा असलेला लेखनाचा नाद अजून चालू ठेवला आहे व त्यांच्याच कांही पुनर्मुद्रित व कांही नवीन अशा कथांचा संग्रह 'अुषा' स्वरूपांत पुढे आला आहे.

'अुषा' या संग्रहाविषयी पहिलें वैशिष्ट्य जर कोणतें असेल, तर त्यांतील विषयांची विविधता. शुद्ध तंत्र या दृष्टीने यांना परीक्षिलें, तर त्यांचा अनुक्रम फारसा वर लागणार नाही. कांही कथा तर कॉलेजांतून नुकतेंच बाहेर पडल्यावर हाताळलेल्या वाटतात, नि पुष्कळशा, विचारांचा नि कल्पनांचा ओघ दुर्दम्य झाल्याबरोबर लिहून हातावेगळ्या केल्याशा वाटतात. अजूनहि लेखकाला भावनांची बैठक आहे तीच कायम ठेवून, त्यांस कलापूर्ण स्वरूप देतां येअील. लघुकथेंत अवश्य असणारीं, समरप्रसंग, प्रमेय-प्रश्न, औत्सुक्य, विस्मय, वगैरे अंगें बहुधा यांत अभावरूपच आहेत; आणि ही विशेष हळहळ वाटण्यासारखी गोष्ट; कारण बाकी सर्व वातावरण लघुकथांना अत्यनुकूल असें आहे! 'प्रवृत्ति', 'शापित', 'डायलेमा', 'सुधारक', 'तीन्ही सांजा', या कथा वरील म्हणण्याची साक्ष देतील. 'अेक्स्पेरिमेंट' नि 'आठवण' या दोनच कथा तंत्रदृष्ट्या बऱ्या साधल्या आहेत म्हणायच्या. पण हा दोष वगळला तर संग्रहांतील बहुतेक कथा वाचनीय आहेत; सदोष तंत्र असूनहि अेक प्रकारची 'ओढ' लावण्याचें सामर्थ्य, कृष्णाकुमारांच्या लेखणींत नि विचारांत आहे.

'विचारांत' मुद्दामच म्हटलें. चावटपणाच्या सीमारेषेवर वावरणारी प्रणयप्रधानता मराठी लघुकथांत सर्वांच्या परिचयाची झाली आहे आजकाल. प्रस्तुत लेखकाने प्रणयास पार अव्हेरून टाकलें आहे असें नव्हे; पण जीवनाच्या अितर अंगांकडे दुर्लक्ष करण्याअितकी प्रणयाची धुंदी त्याच्या लेखणीवर खात्रीने चढलेली नाही. 'शापित' नि 'बट्टेबाज' या कथा वाङ्मयदृष्ट्या किती नवीन वातावरणाच्या पार्श्वभूमीवर अुभारल्या आहेत! लेखकाचा प्रिय मराठवाडा त्याला कसा दिसतो! कणखर, रानवट, सशक्त पण दरिद्री आणि अभिमानशून्य; आणि म्हणूनच तो तसा 'कां' हा प्रश्न त्याच्या डोक्यांत घोळतो. पडक्या देवळांत अंगाला अंग खेटून बसलेला तो म्हातारा आपली कर्मकथा त्यास अैकवितो. 'तहसिलींत करवाअी सुरू झाली, नि तेव्हांपासूनच आपत्तींना सुरवात झाली. मुकद्दम्यावर मुकद्दमे, कधीं तहसिलींत, कधीं मुन्सफींत, कधीं कबज्याचें भांडण, कधीं फौजदारी. पैशाला ओहोटी लागली. वकीलाला पैसे, साक्षी आणायला पैसे. अिनामाला पैसे व शिवाय देहाची झीज. तोहि कफल्लक बनला, तसाच मीहि. जमिनी गहाण, घरें गहाण, दोघेहि अन्नाला मोताद.' (पृ. २७). दैवतीच्या भावाची जीवाभावाची घरधनीण या दारिद्र्याला नि

अशांततेला कंटाळली. माहेरीं गेली. मारहाणीची नोटीस दिलीन् तिने अखबारांतून, नी दुसरी सोयरीक केलीन् तिनें... हाच तो 'अंतःकलहाचा शाप' लागलेला मराठवाडा. अशाच तन्हेचें पण निराळ्या अेका अवगुणाचें चित्र 'बट्टेबाज' या दश्यांत आहे. मात्र काळ्या ढगाची रुपेरी कड यांत दिसते. गोष्टीचें शेवटचें वाक्य लेखक किती अभिमानाने अुच्चारतो आहे! 'मजीद, हा मराठवाडा आहे बरें, तेलंगण नव्हे. येथें मानाजी आहेत तर संभाजीहि आहेत.' मानाजी म्हणजे बट्टेबाज, गरीब अडाणी शेतकऱ्यांच्या कुटुंबांची धूळधाण अुडवणारा, नि संभाजी म्हणजे...! पण तें सांगायलाच हवें का? जगांत 'अैकून घेणारे' पुष्कळच असतात, पण अेखादा संभाजी 'अैकून न घेणारा' निघतोच मराठवाड्यांत! नि हें मराठवाड्याचें वैभव लेखकाने त्या शेवटच्या लहानशाच वाक्यांत किती डौलाने दाखविलें आहे!

सामाजिक या शब्दाचा रूढ अर्थ आहे त्या अर्थाने सामाजिक कथा या संग्रहांत तीन-चार आहेत, आणि विषय विधवाविवाह हा आहे. अिंग्रजी मराठवाड्यांत आता हा विषय शिळा नि जुना झाला. पण या कथांवरूनच कयास बांधावयाचा, तर निजामी मराठवाड्यांत तो अजून नवाच दिसतो. 'डाक्टरांचा डायलेमा', 'सुधारक', 'मानवी' या सर्व गोष्टी तरुण विधवांच्या आपत्तींच्या नि समाजाकडून त्यांच्या संसाराच्या होत असलेल्या अुपेक्षेच्या आहेत. लेखकाची या प्रश्नाकडे पाहण्याची सहानुभूतीची दृष्टि त्यांतून प्रकट होते, पण मनाची पकड घेण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं; कारण योग्य त्या तंत्रदृष्टीचा अभाव. वस्तुतः स्त्रीसुलभ प्रणय-भावनांचा किती सुन्दर आविष्कार लेखक करूं शकतो तें त्याच्या 'अेक्सपेरिमेंट' या गोष्टींत आढळून येतें. पण तीच काळजी जर त्याने या अितर कथांमधून घेतली असती तर बरें झालें असतें.

'तीन्ही सांजा' आणि अखेरची कथा 'ध्येयशून्य' या दोन गोष्टी लेखकाचा आजूबाजूच्या संसाराकडे बारकाअीने बघण्याचा दृष्टिकोन दाखवितात. अेकींत वैयक्तिक महत्त्वाकांक्षा विफल झाल्यावर अहंमन्य– नव्हे दुसऱ्यांच्या व्यक्तित्वाची जाणीव न ठेवणारा, व विशेषतः स्त्रीसहचरा-पासून सहानुभूतीची किंवा मार्गदर्शकत्वाची अपेक्षा न बाळगूं अिच्छिणारा, मनुष्य कसा बदलून जातो तें दिसतें. दुसरींत लौकिक दृष्टीने सुखांत, चैनींत, समाधानांत, काळजीविरहित जीवन कंठणारा तीन चारशें रुपये पगार मिळणारा, बंगल्यांत अैटीने राहणारा, पेन्शनींत निघालेला माणूस ध्येय नसल्यामुळे किती असुखी होतो तें दिसतें. ही दृष्टि नवीनच नाहीं काय?

'अुषे'त निजामी मराठवाड्यांत आपण वावरत आहों हें पानापानावर समजून येतें. तिकडची अुष्ण हवा, भाग्यनगरी (हैदराबाद) नि हुसेनसागर, ती शिकायत, शिकमी, पांड्या, रफे मजाहमत, बट्टेबाज, या शब्दांची मालिका! पण त्यांतहि लेखकाची खोल निरीक्षण-शक्ति व तदनुसार वापरलेल्या नवनवीन अन्ययावत् अुपमा पाहण्यासारख्या वाटतात. भाषेंत मात्र बऱ्याच ठिकाणीं सफाअीदारपणाचा अभाव आहे. पहिल्याच गोष्टींत, 'निरोद्योगी' हा अशुद्ध शब्द दोनदां तसाच आला आहे. 'तिने आपले मोठे व काळे डोळे जास्त मोठे व काळे करीत म्हटलें'— शब्दयुगलाबरोबर वाहवत गेल्याचा परिणाम आहे हा! बायका बॅडमिंटन् व ब्रिजबरोबर हॉकीहि खेळतात का? अेके ठिकाणी 'प्रेय' प्रदेश दिसतो तर दुसरीकडे 'सागरांत' 'अरविंद' विकसतें! Features, Horror, (१५३) पिक्निक् हे अिंग्रजी शब्द कशाला घातले? वाङ्मयकृतींत ते शोभून दिसत नाहीत.

तरी पण अेकंदरींत कृष्णाकुमारांचें हें मराठवाड्याचें प्रादेशिक चित्र प्रेक्षणीयच आहे

चिं. य. काळे

---

# रद्दींतील रत्नें

## शाअीचा सोवळेपणा

"तुकारामाच्या गाथांच्या प्रती पुष्कळ खपतील; परंतु छापील प्रती घेण्यास लोकांचा अंदेशा आहे. कारण शाअींत कांहीं वर्ज्य पदार्थ आहेत, असें त्यांच्या मनानें घेतलें आहे. अक्षर मोठें सुवाच्य व शिळाछाप असावें व शाअीची खात्री द्यावी." (१८६७ सालांतील अेक पत्र)

## प्रोफेसरांकडून अपेक्षा

"अध्यापकांचें काम कांहीं दिवस देशांत फिरावयाचें असलें पाहिजे. तेवढ्यांत त्यांनीं या देशांतील भूमिगत द्रव्यांचा शोध लाविला पाहिजे; यंत्रकलेचा प्रसार केला पाहिजे; आमची भूमि जास्त अुत्पादक केली पाहिजे; भूगर्भज्ञानाची वृद्धि करून भूमीचे थर कसले कसले आहेत, त्याचें आकलन केलें पाहिजे; व तींत दुसरे पदार्थ काय काय आहेत, त्याचा शोध केला पाहिजे; ते पदार्थ बाहेर कसे काढावे व त्यांच्यापासून मनुष्याचें हित कसें होअील, हें पाहिलें पाहिजे; संस्कृत भाषेचा अभ्यास अन्य भाषांशीं तुलनात्मक पद्धतीने झाला पाहिजे; आमच्या ज्योतिःशास्त्रांत सुधारणा केली पाहिजे; त्यांत नवीन शोध करून त्यांचा फैलाव केला पाहिजे; आमच्या औषधिशास्त्रांत भर घातली पाहिजे; देशी विदेशी औषधाचा अनुभव घेअून तुलना केली पाहिजे; आमच्या विद्वान लोकांचा परस्परसंपर्क वाढला पाहिजे; त्यापासून अशी अिच्छा अुत्पन्न झाली पाहिजे कीं देशी औषधांत नवे शोध करून करून सुधारणा झाली पाहिजे; देशी शास्त्रांचें अुच्चाटण करून त्यांच्या जागीं विदेशी शास्त्रांची स्थापना करावयाची नाही; पण हल्लींचा कल त्या दिशेनें नाहीं. तक्षशास्त्र, शिल्पशास्त्र, वस्तुनिर्माणशास्त्र, अशीं शास्त्रें, कला, देशरीतिरिवाज, आमच्या भाषा, आमचे विचार ही सर्व शीघ्र गतीने नाहींशीं होत आहेत. त्यांच्या रिकाम्या झालेल्या जागा युरोपियन शास्त्रें अित्यादिकांनीं व्यापिल्या जात आहेत ! अरेरे माझ्या भोंवतीं केवढा वस्तुविपर्यास मी पहात आहें ! ! पोशाख, घरचीं भांडीं, वाडे, गाड्या, लेखनव्यवहार व भाषा हीं सर्व अिंग्रजीच होत आहेत ! !

म्हणून आमच्या अध्यापकांनीं फिरावें व बाहेरच्या लोकांस बोध करून ज्ञानदान करावें. नुसत्या राजधानीच्या ठिकाणीं त्यांचें काय आहे ? आमची संस्कृति, आमचे विचार, पुरातन वस्तूंच्या अवशेषांवरून कळण्यासारखा इतिहास, वैद्यकांतील व तशा दुसऱ्या शास्त्रांतील अुपयोगी शोध या संबंधीं लोकांस ज्ञान करून द्यावें. या दिशेनें ते जर श्रम करतील, तर सरकारचें व लोकांचें हितच करतील." (प्रो. केरूनानांचें १८६९ सालांतील पत्र)

---

अनुक्रमणिका

# वंग राजधानींतील कांहीं सांस्कृतिक संस्था

[ लेखक— प्रो. दत्तो वामन पोतदार ]

भारतीय अितिहासपरिषदेच्या निमित्ताने थोड्या दिवसांपूर्वी कलकत्त्यास जाणें झालें त्या वेळीं तेथील सांस्कृतिक संस्था स्वस्थपणें पाहाव्या असा संकल्प योजिला होता. या पाअूण महिन्याच्या मुक्कामांत मला जें निरीक्षण करितां आलें त्यावरून मिळालेली माहिती आणि सुचलेलें विचार या लेखांत निवेदन करीत आहें.

## अेशिॲटिक सोसायटी ऑफ बेंगाल—

कलकत्ता ही अेके काळीं अखिल भारतीय राजधानी होती. त्यामुळे तेथील जीवनास अेक प्रकारचा विशेष अुठाव यावा यांत नवल नाहीं. अखिल हिंदुस्थानांत, किंबहुना पौर्वात्य जगतांत, नवीन प्रकारच्या संशोधनार्थ पहिली संस्था कलकत्त्यासच स्थापन झाली. अिचें नांव अेशिॲटिक सोसायटी ऑफ बेंगाल, आणि अिचे संस्थापक सर विल्यम जोन्स. सरसाहेब हे अनेकभाषाकोविद होते आणि कलकत्त्याच्या न्यायालयांतील प्रमुख न्यायाधीश होते. बेंगाल अेशिॲटिक सोसायटलाच हल्ली रॉयल अेशिआटिक सोसायटी म्हणतात. मराठ्यांनी निजामाला खर्ड्यावर कोंडण्याची तयारी चालविली होती त्याच वेळीं हिंदुस्थानच्या पूर्वकोपऱ्यांत सर विल्यम यांनी नव्या ज्ञानयुगाची ध्वजा अुभारली. भगव्या झेंड्याचा वैभवसूर्य अिकडे आता अस्ताला जात होता आणि भारताच्या पूर्वेकडून आधुनिक युगाचा अरुणप्रकाश दिसूं लागला होता. जोन्स यांनी स्थापिलेल्या या संस्थेंत मी ज्या वेळीं गेलों त्या वेळीं तेथे आम्हा पाहुण्यांच्या करिता संस्थेंतील प्राचीन संग्रह निवडून लावून ठेविला होता. या संस्थेमार्फत आजवर जेवढे संशोधनपर ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत तितके हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याहि संस्थेकडून क्वचितच झाले असतील. फारसी, अरबी, संस्कृत आणि प्राकृत शेकडों ग्रंथ या संस्थेने प्रसिद्ध केले आहेत. आणि हें प्रसिद्धीकरण अद्यापिहि चालू आहे. अनेक संस्कृत-प्राकृत, फारसी-अरबी दुर्मिळ हस्तलिखितांचा संग्रहहि जो संस्थेंत आहे तो अत्यंत अपूर्व, प्रेक्षणीय आणि अभ्यसनीय आहे. या संस्थेस सरकारी मदत अर्थात् पहिल्यापासूनच मिळत आहे. आणि अेका मोठ्या भव्य अिमारतींत तिचा मोठा संसार थाटला आहे. संस्थेच्या कारभारांत अधूनमधून अुत्पन्न होणारें शैथिल्य नाहींसें करून तिची अुपयुक्तता आणि कार्यक्षमता वाढविण्याचे प्रयत्नहि अर्थात् करावे लागलेले आहेत. अशी ही हिंदुस्थानांतील अेक ज्येष्ठ आणि श्रेष्ठ शोध-संस्था आहे.

## भारतीय वस्तुसंग्रहालय—

या संस्थेच्या अितकीच किंबहुना अधिक प्रसिद्धि पावलेली कलकत्त्यांतील दुसरी संस्था म्हणजे तेथील भारतीय वस्तुसंग्रहालय (Indian Museum) ही होय. हिंदुस्थानांतील वस्तुसंग्रहालयांत अेवढें अफाट वस्तुसंग्रहालय अन्यत्र कोठेहि आढळून येत नाहीं. मुंबअी, मद्रास, दिल्ली, मथुरा, पाटणा वगैरे अनेक ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारचीं वस्तुसंग्रहालयें आहेत; परंतु कलकत्त्याच्या या संग्रहालयाची बरोबरी या कोणाच्यानेहि होणार नाहीं. पुराण अितिहास,

भूगर्भशास्त्र, मानवशास्त्र वगैरे अनेक शाखा या संग्रहालयांत आहेत. या भारतीय संग्रहालयाची अिमारत कलकत्त्यांतील चौरंगी या भागांत वर्तुळ मैदानाच्या समोर आहे. दारांतच अशोक-कालीन स्तंभावशेष आणि पुतळे वगैरे भव्य आणि मनोहर दृश्यें दृष्टि आकर्षण करून घेतात. समोरच अत्यंत विस्तृत आणि प्रचंड असा चौक प्रेक्षकाच्या दृष्टीस पडतो आणि तो पाहून तो आश्चर्यचकित होतो. पुराणवस्तुविभागांत प्राचीन शिल्पाचे अुत्खात नमुने ठेवण्यांत आले आहेत. त्यांची संख्या, महत्त्व आणि कलाकुसर तो संग्रह पाहिल्याशिवाय ध्यानांत येणार नाही. बुद्ध-विषयक अवशेषांत अेका बुद्ध स्तूपांत सांपडलेले गौतम बुद्धाच्या वेळचे नानाप्रकारचे मणि-कांचनालंकार ठेविलेली मञ्जूषा या संग्रहालयांत पाहण्यास मिळते. आणि अितक्या प्राचीनकाळीं कलाकुसरीचें काम किती सूक्ष्म आणि नीटस असें या भारतवर्षांत होत असे तें कळून येअून आश्चर्य आणि आनंद वाटल्याशिवाय राहत नाही. सर ऑरेल स्टाअिन यांनी मध्यआशिया खंडांतून जे बहुमोल अवशेष मिळविले ते सांप्रत नव्या दिल्लींत आज आपल्या दृष्टीस पड-तात. कलकत्याच्या संग्रहालयांत दिल्लींतील या स्टाअिनच्या विभागाची बरोबरी करणारा विभाग नाही. तथापि आहेत तेच नमुने अितके विशाल, विपुल, आणि विविध आहेत की आज तरी त्या संग्रहाची बरोबरी करील असा दुसरा संग्रह आपल्या देशांत सांपडणार नाही. मूर्ति-शिल्प-विभागाअितकाच वरील संग्रहालयांत नाण्यांच्या संग्रहाचा विभाग वाखाणण्यासारखा आहे. या नाणीसंग्रहाच्या याद्या कित्येक खंड भरतील अेवढ्या छापून झालेल्या आहेत. यामुळे कलकत्त्यां-तील हा संग्रहहि नामांकितत्व पावला आहे.

नाण्यांच्या जोडीला चित्रांचा अुल्लेख केला पाहिजे. जयपुरी, मोगली, पहाडी, कांगडा वगैरे कलमांतील निवडक आणि प्रेक्षणीय अशीं अनेक जुनीं चित्रें अिथे संग्रहून ठेविलीं आहेत. या संग्रहांत मराठे किंवा पेशवे यांचीं चित्रें बहुधा नाहीतच असें म्हणावयास चिंता नाही. ही अेक या संग्रहालयाच्या पूर्णतेला कमीपणा आणणारी गोष्ट आहे. ताम्रपटांचा आणि शिला-लेखांचाहि मोठा संग्रह या संग्रहालयाने केला आहे. प्राचीन शस्त्रें, वस्त्रें वगैरेंचा विशेष संग्रह पुराणवस्तुभागांत नाही म्हटलें तरी चालेल. वस्त्रें, पात्रें वगैरेंचें अेक दालन आहे, परंतु त्यांत नव्या जुन्याची मिसळ आहे.

या संग्रहालयांत प्राणिशास्त्र आणि भूस्तरशास्त्र यांचेहि मोठाले प्रचंड विभाग आहेत. भूस्तरविभागांत बंगालमध्ये आसनसोलनवळ सापडलेला अेक जुनाट दग्धवृक्ष— फॉसिल— ठेवण्यांत आला आहे. या वृक्षाचें वय अनेक लक्ष वर्षांचें आहे. याची लांबी ७२ फूट आहे. सर्व जगांत अितका प्राचीन दग्धवृक्ष कोठेहि अद्यापि मिळालेला नाही. असे अक्षरशः लाखो नमुने या विभागांच्या दालनांतून आहेत. आपल्या मुंबअी अिलाख्यांत व मुंबअी शहरांत वरील शास्त्रां-तील वस्तुसंग्रह कोठेकोठे आढळतो, परंतु मानुषशास्त्राविषयी जो संग्रह कलकत्त्यास पाहण्यांत आला त्याची बरोबरी अिकडील कोणत्याहि संग्रहाने होअील असें वाटत नाही. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या सुधारलेल्या आणि बिनसुधारलेल्या जातींतील स्त्री-पुरुषांचें जीवन स्पष्ट करणारीं विविधप्रकारचीं चित्रें आणि येथे ठेवलेले नमुने पाहून मन आश्चर्याने थक्क होतें. सुतार, लोहार, चांभार, कोष्टी, विणकर, न्हावी, परीट अित्यादि जातींच्या अनेक प्रकारच्या व्यवसायांत लागणाऱ्या सर्व प्रकारच्या वस्तूंचे नमुने या विभागांत तयार करून ठेवण्यांत आले आहेत. या नमुन्यांचें अेवढे अफाट प्रात्यक्षिक अन्यत्र कोठेहि पाहण्यास मिळणार नाही. जागेच्या कोताअीमुळे या विभा-गांत मांडून ठेविलेल्या वस्तूंचीदेखील अत्यंत खेचाखेच येथे झाली आहे; परंतु जागेच्या अभावा-मुळे न मांडलेल्या येथील वस्तु शेकडोंनी आणि लाखांनी मोजतां येण्याअितक्या आहेत. मानुष-

शास्त्राचा अभ्यास अत्यंत अुद्बोधक आणि मनोरंजक आहे यांत संशय नाही, परंतु आमच्या पश्चिम हिंदुस्थानांत या विषयाकडे अक्षम्य दुर्लक्ष्य केलें जात आहे. कलकत्त्यांतील हा विभाग पाहून पुण्यासारख्या शहरीं मानुषविद्येचें आणि मानुषशास्त्राचें संग्रहालय अवश्यमेव स्थापन केलें पाहिजे असें खचित वाटतें. कलकत्त्यांतील केवळ अेका अिंडियन म्यूझियममध्ये अभ्यास करणाराची जेवढी सोय व जितकीं साधनें संग्रहित केलेलीं सापडतील त्याच्या खरोखर शतांश किंवा लक्षांश देखील आमच्या पुण्यांत– विद्येच्या एवढया केंद्रस्थानांत– नाहीत हें पाहून मन विषण्ण झाल्याखेरीज राहत नाही. वाटतें की पुन्हा अेखादा कोणी रानडे किंवा नामजोशी आमच्या पुण्याला लाभावा आणि आमचें विद्याजीवन त्याने परिपुष्ट करून द्यावें. येथे अितकीं विद्यालयें, शाळा, पाठशाळा आणि संस्था असतांना वर दर्शविलेली अुणीव भरून काढण्यासंबंधाने, हालचाल राहिली, चर्चाहि कधी होत नाही, हें मनांत येअून चित्त व्यथित झाल्याशिवाय राहत नाही. भलत्याच क्षुल्लक वादांत आमची किती कालहानि होत आहे हें पाहिलें म्हणजे या व्यथेंत भरच पडते. अशाप्रकारें कलकत्त्याचें हें अिंडियन म्यूझियम हिंदुस्थानचें अेक भूषण आहे. अशा अपूर्व सोयीचा सहजासहजीं लाभ मिळणारे आमचे गंगातीरवासी वंगीय बंधु यांचा हेवा करावा तेवढा थोडाच होअील.

**साम्राज्यग्रंथालय—**

अिंडियन म्यूझियमच्याच शेजारीं अेका हाकेवर आम्हाला हेवा वाटावा अशी दुसरी अेक संस्था आहे. तिचें नांव अिंपीरियल लायब्ररी अथवा साम्राज्यग्रंथालय. कर्झनसाहेबांची ही देणगी आहे. या ग्रंथालयांत सर्व अभ्यासकांस मुक्तद्वार आहे. कोणत्याहि विषयावरील कोणत्याहि भाषेंतील ग्रंथ अभ्यासकास आणून द्यावा अशी येथे योजना आहे. सरकारी खर्चानें हें ग्रंथालय चालविलें जातें. या ग्रंथालयांतून हिंदुस्थानांत कोठेहि ग्रंथ दिले जातात. डाकखर्च अर्थात् ग्राहकास करावा लागतो. तथापि अशी सोय असल्याचेंहि अिकडे फारच थोड्यांस माहीत आहे असा आमचा अनुभव आहे; मग प्रत्यक्ष अशी सोय अिकडे नाही हें निराळें सांगावयास नकोच. बडोद्यास कै. श्री. सयाजीराव महाराज यांनी मात्र ज्याप्रमाणे पदार्थसंग्रहालय वगैरे सर्व प्रकारच्या संस्था काढल्या त्याप्रमाणेच अेक केंद्रग्रंथालयहि चालविलें आहे. तेवढा काय तो भूषणास्पद अपवाद इकडे आहे. हें साम्राज्यग्रंथालय आणि भारतीय वस्तुसंग्रहालय म्हणजे विद्यादेवीचे दोन मूर्तिमंत डोळे होत. कै. राजवाडे यांच्या मनांत कै. ना. गोखले यांच्या साहाय्याने कलकत्त्याच्या नमुन्याप्रमाणे अेक केंद्रग्रंथालय पुण्यास स्थापावें असा विचार होता. पण जेथे अेक साधें मराठी ग्रंथालय देखील अजून मनाजोगतें चालत नाही तेथे या कल्पना म्हणजे दरिद्रांचे मनोरथ ठरल्या तर नवल काय ! वास्तविक अशीं ग्रंथालयें आणि वस्तुसंग्रहालयें निर्माण करणें म्हणजेच अेखाद्या भरदार विद्यापीठाचा पाया रचण्यासारखें आहे.

**'ये चान्ये'—**

विद्यापीठाची गोष्टच निघाली, तेव्हा कलकत्ता विद्यापीठ आणि त्यांतील ग्रंथालय, प्रयोगशाळा, वस्तुसंग्रहालय, संस्कृत सभा, शास्त्रीय शोधसंस्था आणि अितर अनेक आनुषंगिक संस्था यांची आठवण येथे वाचकांस करून देणें अपरिहार्य आहे. या मोठाल्या संस्थांशिवाय अनेक विषयांच्या आणि अनेक प्रकारच्या शेकडो संस्था कलकत्त्यांत आहेत. त्या सर्वांचाच परामर्श येथे घेतां येणार नाही. कलकत्त्यांत विद्याप्रेमी जमीनदार अनेक आहेत. त्यांतील कित्येक स्वतः विद्वान असून अनेक प्रकारें विद्यावृद्धीस साहाय्य करीत असतात. या जमीनदार मंडळींपैकी ठाकूर घराणें जगप्रसिद्ध आहे. परंतु लाहा घराणें अिकडे तितकेंसें प्रसिद्ध नाही. डॉ. नरेंद्रनाथ लाहा, डॉ. सत्यचरण

लाहा आणि डॉ. विमलाचरण लाहा हे सर्व लाहावंशीय जातीने विद्वान असून अनेक प्रकारें विद्योत्कर्षास साहाय्य करीत असतात. अेका लाहाबंधूचें घर म्हणजे अेक प्रचंड उद्यानविहारच असून तेथे शेकडो पक्ष्यांचा प्रतिपाल त्यांनी केला आहे. तो पाहतांना बडोद्याच्या कामाठी-बागेची आठवण होते. मोठे मोठे कृत्रिम पाट काढून, पाणी खेळवून आणि मोठे मोठे लता-कुंज अुभारून डॉ. लाहा यांनी पक्षिपालन केलें आहे. परंतु ते नुसतें पालन करूनच थांबले नाहीत, तर त्यांनी पक्षिजीवनाचें निरीक्षण करून ग्रंथलेखनहि केलें आहे, असे ते व्यासंगी आहेत. डॉ. नरेन लाहा हे अैतिहासिक शोधविषयाचें अेक मोठे त्रैमासिक अिंग्रजींत काढीत असतात. त्यांचे शोधग्रंथ विद्वन्मान्य झाले आहेत. याशिवाय औद्योगिक चळवळींतहि ते अग्रेसर आहेत. या घराण्याची उन्नति पाहून त्यांच्याविषयी सविस्तर माहिती मिळवावी असें फार मनांत आलें, परंतु लाहाबंधु जितके विद्यासंपन्न तितकेच विनयसंपन्न असल्यामुळे ही माहिती सुलभतेने मिळाली नाही. पुढेमागे मिळवावी अशा यत्नांत आहों. पण आमच्यापेक्षा कलकत्त्यांतच राहणाऱ्या आमच्या महाराष्ट्र-बंधुभगिनींस हें कार्य सुसाध्य आहे. त्यांनी ही माहिती मिळवून प्रसिद्ध केल्यास आमच्या अिकडील मंडळींचें अुद्बोधन त्यायोगें होअील. यद्यपि अिकडे जमीनदारवर्ग प्रायः नाही, तरी महाराष्ट्राच्या कांही भागांत मालगुजारीपद्धति आहे. आणि आमचे छोटे संस्थानिक हेहि कांही अंशाने जमीनदारच म्हटले तरी चालतील. श्रीमंत राजे बाळासाहेब औंधकर यांचें मात्र नांव या ठिकाणीं आठवल्याशिवाय राहत नाही.

पुण्यांत ज्याप्रमाणे कै. महादेव चिमणाजी आपटे या अेकट्या गृहस्थाने आपलें स्वकष्टार्जित धन समर्पण करून आनंदाश्रम ही संस्था कायम केली त्याप्रमाणे शास्त्रीय विषयासाठी जग-विख्यात शास्त्रज्ञ कै. डॉ. जगदीशचंद्र वसू यांनी आपल्याच द्रव्यदानाने स्थापन केलेलें बोस-संशोधनमंदिर हीहि कलकत्त्यांतील अेक अपूर्व संस्था आहे. याच्या अुलट ब्रिटिश साम्राज्याचें वैभव जगापुढे अुभे करण्यासाठी कर्झनसाहेबांनी आमच्याच संस्थानिकांकडून लक्षावधी रुपये गोळा करून स्थापन केलेलें व्हिक्टोरिआ मेमोरियल् या संग्रहालयाची आठवण होते. ताजमहालाची नक्कल अुठविण्याचा हा प्रयत्न फसला आहे असें वाटल्याशिवाय राहत नाही. सुमारें ८० लक्ष रुपये या संस्थेपायीं खर्च झाले आहेत. आमच्या जेत्यांचीं अनेक लहानमोठीं स्मारकें या संग-मर्मरी साम्राज्यमहालांत अुभीं करण्यांत आलीं आहेत ! येथे अेका दालनांत नंदकुमारावरील मूळ आरोपपत्रक प्रदर्शनागारांत मांडलें आहे. आमच्या पारतंत्र्याची आम्हांस आठवण करून देणारें हें स्मारकालय संस्थापकाचा मूळ संकल्पित हेतु किती सफल करील तें दिसतेंच आहे ! बरीच वर्षें कै. बाळकृष्णपंत गुप्ते हे या व्हिक्टोरिआ स्मारकाचे सरकारी पालक होते तरीहि तेथील चित्रागारांतील मराठ्यांना अुपयुक्त वाटणाऱ्या चित्रांची नीट छाननी झाली नाही हें पाहून वाअीट वाटलें. या स्मारकालयांत कांही महत्त्वाचे फारशी ग्रंथ आम्हांस आढळून आले, परंतु कागदपत्रांच्या विभागांत पुदुकोटा संस्थानाकडून ज्या चारदोन चिठ्या ठेवण्यांत आल्या आहेत त्यांच्या तबलखा मोडी लिपींत आणि मराठी भाषेंत लिहिण्यांत आल्या आहेत आणि त्यांचा काळ सुमारे अि.स.१७८०च्या सुमारचा असून विषय अिंग्रज-मराठे युद्धाशीं संबद्ध आहे अेवढेंच आठवणीवरून येथे नमूद करून ठेवावेंसें वाटतें.

कलकत्त्यांत पुष्कळ संस्था आहेत. त्यांत अिंडियन रीसर्च अिन्स्टिट्यूट या संस्थेचाहि अुल्लेख केला पाहिजे. महाराजा वर्धमान (वरद्वान) हे या संस्थेचे प्रमुख आश्रयदाते आहेत. आणि आमचे महाराष्ट्रीय पंडित डॉ. देवदत्तराव भांडारकर यांचा या संस्थेशीं फार निकट संबंध आहे. 'अिंडियन कल्चर' या नांवाची शोधपत्रिका या संस्थेमार्फत प्रसिद्ध होत असते. मागे

अुल्लेखलेले डॉ. विमलाचरण लाहा हे या पत्रिकेच्या संपादकांपैकी अेक आहेत. या संस्थेने भारतीय दसरसमितीचा जो स्वागतसमारंभ केला त्या वेळीं वैदिक आशीर्वादाने कार्यक्रमाची सुरुवात झाली, मध्ये सुमधुर असें वंगीय संगीत अैकविण्यांत आलें आणि शेवटीं प्रथम वंगीय नृत्य होअून नंतर कामरूप म्हणजे आसाममधील भैरवनृत्याचा मासला पाहावयास मिळाला. कामरूपांतील हें मणिपुरी नृत्य पाहत असतांना त्यांतील वृत्ति आणि आविष्कार हे महाराष्ट्रीय मनाला अत्यंत निकटचे वाटण्याजोगे आहेत असें स्पष्ट झालें. या वेळीं आसामी अितिहास आणि मराठी अितिहास यांच्यांतील निकट साम्याची आठवण झाल्याशिवाय राहिली नाही. पुण्यांतील लाल महालांत शिवाजीमहाराजांनी बोटें छाटल्यामुळे जेव्हा शाहिस्तेखानाची रवानगी बंगाल्यावर झाली आणि त्याला कामरूपांतील शूर राजे आडवे झाले त्या वेळीं त्यांनी 'अरे, तोच तूं शिवाजीने बोटें छाटलेला ना!' असें म्हणून हिणविलें, अशी शिवाजीच्या पराक्रमाची लाट प्रेमभावाने आपल्या वृत्तीशीं मिळवून देणारे आसामी वीर आणि त्यांच्या पराक्रमाचें वर्णन करणाऱ्या आसामी बुरंजी म्हणजे बखरी यांची आम्हांस आठवण झाली. अितकें आसामी हृदय मराठी हृदयाशीं समरस होणारें आहे!

वंगीय साहित्यपरिषद्—

अितर अनेक संस्था झाल्या पण 'पत्रिके'च्या वाचकांस जिचें वृत्त सर्वांत जवळचें आणि श्रवणीय वाटेल अशी कलकत्त्यांतील संस्था म्हटली म्हणजे वंगीय साहित्यपरिषद् ही होय. या वंगीय साहित्यपरिषदेचा महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या स्थापनेशीं निकटचा संबंध आहे. यद्यपि महाराष्ट्रांत ग्रंथकारसंमेलनें माधवराव रानडे यांच्या प्रेरणेने निबंधमालेच्या युगांत भरण्यास सुरुवात झाली होती, तथापि सुप्रसिद्ध वंगीय विद्वान कै. बाबू रमेशचंद्र दत्त हे बडोद्यास दिवाण असतांना त्यांच्या प्रोत्साहनाने मराठी साहित्यपरिषदेच्या स्थापनेस चालना मिळाली. बाबू रमेशचंद्र हेच वंगीय साहित्यपरिषदेचे पहिले आधारस्तंभ होत असें म्हटल्यास हरकत नाही. तसें म्हटलें तर वंगीय साहित्यपरिषदेचा जन्म ता. २९ अेप्रिल १८९४ या सालीं झाला. त्या वेळीं सोभाबाजार येथील राजा विनयकृष्णदेव यांच्या घरीं सुमारें ३० वंगसाहित्यप्रेमी मंडळी जमा झाली होती. या मंडळींचा हेतु बंगाली साहित्यविषयक चर्चा करण्याचा होता. पुढे बाबू रमेशचंद्र यांच्या सल्ल्याने वरील मंडळीस व्यापक रूप देण्यांत आलें. पहिलीं ६ वर्षें परिषदेच्या सभा राजा विनयकृष्ण यांच्याच घरीं भरत असत. पुढे कांही वर्षें संस्थेसाठी भाड्याची जागा घेण्यांत आली. सांप्रत परिषदेचा संसार स्वतःच्या मालकीच्या अशा अेका स्वतंत्र अिमारतींत चालतो. पुढे काशीमबाजारचे महाराजा मणींद्रचंद्र नंदी यांच्याकडून परिषदेला अेक मोठी देणगी मिळाली व तिच्या साहाय्याने परिषदेचें मंदिर अुभारण्यांत येअून १९०८ सालीं परिषद् स्वतःच्या मंदिरांत नांदूं लागली.

परिषदेचें कार्य चतुर्विध झालें आहे. साहित्यप्रेमी मंडळींत परस्परपरिचय व सहकार वाढवणें आणि त्यांच्या गांठीभेटींसाठी अेक केंद्रस्थान निर्माण करणें हें या परिषदेचें पहिलें कार्य म्हणून सांगतां येअील. परिषदेचें दुसरें कार्य म्हटलें म्हणजे बंगाली भाषा आणि साहित्य यांचा अभ्यास आणि अुत्कर्ष यांस साहाय्य करणें हें होय. भाषा आणि साहित्य यांत शास्त्रीय विज्ञान, समाजशास्त्र, पुराणेतिहास अित्यादि विषयांचा समावेश येथे होतो; या अुद्देशास अनुसरून स्वतंत्र, रूपान्तरित व भाषान्तरित ग्रंथ प्रसिद्ध करणें हेंहि परिषदेनें महत्त्वाचें कार्य म्हणून चालतें. त्याचप्रमाणे गुणी ग्रंथकारांस साहाय्य करणें आणि प्रांतिक सरकार आणि कलकत्ता विद्यापीठ यांच्या

कारभारांत बंगाली भाषा आणि वाङ्मय यांना पोषक असें धोरण राखण्याविषयी जागरूक राहणें हा या परिषदेचा अेक विशेष अुद्देश आहे. या परिषदेने केलेलें तिसरें महत्त्वाचें कार्य म्हणजे बंगाली हस्तलिखितें व पुराणवस्तु वगैरेंचें संग्रहालय चालविणें हें होय. सांप्रत परिषदेचा हा वस्तुसंग्रह ठेवण्यासाठीं मूळच्या अिमारतीला जोडून अेक नवी दुमजली टुमदार अिमारत बांधण्यांत आली आहे. परिषदेच्या या वस्तुसंग्रहालयांत कुशान, मगध, गांधार आणि बंगीय वर्गांतील नमुनेदार प्राचीन मूर्ति आणि अितर शिल्पें यांचा संग्रह चांगला आहे. परिषदेजवळ दुर्मिळ नाण्यांचाहि चांगला संग्रह आहे. ब्रांझ धातूच्या तीन अत्युत्कृष्ट प्राचीन मूर्तिहि या संग्रहालयांत आहेत. राजा राममोहन राय यांची पगडी आणि त्यांची शीर्षप्रतिमा हीहि येथे ठेवण्यांत आलीं आहेत. त्याचप्रमाणे बाबू रमेशचंद्र दत्त वगैरे कित्येक बंगाली साहित्यिकांचें दौत, टाक, हस्ताक्षरें, हस्तलिखित ग्रंथ वगैरे स्मारकसाहित्यहि या वस्तुसंग्रहांत पाहून फार संतोष वाटला. त्याचप्रमाणे बंगालमधील अनेक साहित्यिक व बंगभाषोपकर्ते यांच्या अेकसांच्याच्या मोठमोठ्या तसबिरी दुसऱ्या मजल्यावर हारीने लावून ठेविल्या आहेत. पुणें येथील नाट्यसंशोधनमंदिरांत जो चित्रसंग्रह आढळतो त्यापेक्षा संख्येने बंगीय साहित्यपरिषदेजवळील संग्रह मोठा आहे. बंगीय साहित्यपरिषद्मंदिरांत सर्व बंगीय मुद्रित ग्रंथांचा असलेला प्रचंड संग्रह खरोखर प्रेक्षणीय आहे. या संग्रहांत सुमारें ५०००० ग्रंथ असून ५००० हस्तलिखितें आहेत. बंगाली हस्तलिखितांचा आणि ग्रंथांचा अेवढा संग्रह बंगाल्यांत अितरत्र कोठे नाही. परिषदेची जुनी अिमारत या संग्रहाने ठेचून भरली आहे, जागा पुरत नाही. हस्तलिखितांत कांही तिबेटी ग्रंथ आहेत आणि ग्रंथालयांत अीश्वरचंद्र विद्यासागर, रमेशचंद्र दत्त वगैरे व्यक्ति आणि 'साहित्यसंस्था', 'बांधवसमिति' वगैरे संस्थांचे संग्रहहि संमीलित आहेत. हस्तलिखितसंग्रहांतून सुमारें ७६ हस्तलिखितांचें प्रकाशनहि परिषदेने केलें आहे. परिषदेची त्रैमासिक पत्रिकाहि आहे. मासिक सभाहि भरतात. येथे निबंध वाचले जातात, प्रदर्शनेंहि भरविलीं जातात आणि विशेष प्रसंगीं स्वतंत्र सभाहि परिषदेकडून भरविल्या जातात. अशा अेका स्वतंत्र साधारण सभेला हजर राहण्याचा योग कलकत्त्याच्या मुक्कामांत या लेखकास साधतां आला. प्रसिद्ध बंगाली लेखक कै. बाबू दिनेशचंद्र यांच्या मृत्यूच्या दुखवट्याची सभा होती. लोक थोडेच हजर होते. सभेचे अध्यक्ष वयोवृद्ध बाबू हिरेंद्रनाथ दत्त यांच्या परवानगीने महाराष्ट्रातर्फे व म.सा.परिषदेतर्फे सभेच्या कार्यांत सहभागी होतां आलें. तरुण पिढीचें लक्ष्य बंगीय साहित्यपरिषदेंत विशेषसें दिसलें नाही. परिषदेजवळ अनेक निधि आहेत आणि ढाका, बडिशाल, भागलपूर, काशी, दिल्ली वगैरे ठिकाणीं परिषदेच्या शाखा आहेत. परिषदेने शाळांतील शिक्षणक्रमांत बंगीय भाषेला योग्य स्थान प्राप्त करून देण्याबाबत अि. स. १८९६ पासून चळवळ चालविली आहे व परिषदेला त्यांत बरेंच यशहि आलें आहे. परिषदेकडे कित्येक साहित्यिक स्मारकनिधींची व्यवस्था आहे आणि विशेष म्हटलें म्हणजे हें की गरीब व गरजू साहित्यसेवकांच्या मदतीसाठीं स्थापण्यांत आलेला अेक स्वतंत्र निधि परिषदेजवळ आहे. येणेप्रमाणे बंगीय साहित्यपरिषदेचें कार्य विविध प्रकारचें, यशस्वी आणि अनुकरणीय झालें आहे आहे. आपल्या अिकडे म. सा. परिषदेला आपण नुकतीच कोठे चार खण जागा बांधून स्वतंत्र वास्तु मिळविली आहे आणि रावसा. जोशी यांच्या परिश्रमाने सभासदसंख्याहि सांप्रत जोराने वाढत आहे. आपणांस किती पल्ला अद्याप गांठावयाचा आहे आणि बंगीय व हिंदी साहित्य-परिषदा अगर संमेलनें यांच्या आपण कांही बाबींत किती मागे आहों याची कल्पना येण्यास वरील हकीकत अुपयोगी पडेल अशी आम्हांस आशा आहे.

———

अनुक्रमणिका

# नभोवाणी कार्यक्रमांतील "भाषण" विभाग

[ लेखक— प्रा. श्रीधर बाळकृष्ण रानडे, बी.अे., अेम्.अेससी. ]

नभोवाणीवरून होणाऱ्या कार्यक्रमांचा बराचसा वेळ, गाण्यावजावण्यांत व ताज्या बातम्या सांगण्यांत, खर्च होतो. जनतेला रेडियो ही घटकाभर करमणुकीची, व विश्रांतीचा वेळ सुखांत घालविण्याची, खर्चाची पण घराला शोभा देणारी, वस्तु जोंपर्यंत वाटत आहे, तोंपर्यंत हें असेंच चालावयाचें. ताज्या बातम्या मिळूं लागल्यामुळे, रेडियोयंत्राचा खपहि वाढत्या प्रमाणावर होअून, श्रोत्यांची संख्या वाढत आहे; आणि त्यामुळे खर्चाची तोंडमिळवणी करणें सुलभ जातें आहे; ही गोष्ट नजरेआड करून चालत नाही. त्यामुळे अितर कार्यक्रम, जपून, श्रोत्यांच्या कलाकलानेच, शर्करावगुंठित गोळीप्रमाणे श्रोत्यांच्या गळीं नव्हे तर कानीं, ओतावे लागतात. औषध न घेणाऱ्या रोग्यावर अेक वेळ जबरदस्ती करतां येअील, पण रेडियोची कळ बंद करणें, श्रोत्यांच्या मर्जीवर असल्यामुळे, असे कार्यक्रम अरण्यरुदनाप्रमाणे, हवेंत ध्वनिलहरींत रूपान्तर होण्याच्या अगोदरच, आकाशद्रव्यांत विलीन होण्याचा संभव जास्त !

वर्तमानपत्राचाच दृष्टान्त घेतला, तर रेडियोंतील बातम्या ह्या दैनिकासारख्या असून, अितर कार्यक्रम, साप्ताहिकांतील गोष्टी, चर्चा, खुशखुशीत, चटकदार सदरें, रविवारच्या साप्ताहिकांतील 'ज्ञानाचें पेंव', किंवा मासिकांतील अुद्बोधक, विचारपूर्ण किंवा ज्ञानदायक लेखांच्या वर्गांत, ढोकळ मानानें पडतात. मासिक-साप्ताहिकांचे वाचक, ठराविक क्षेत्रांतले व विशिष्ट संस्कृतीचे असतात. संपादकांचीं ध्येयें भिन्न असतात. रेडियोच्या श्रोत्यांचें क्षेत्र मोठें व रुचि-भिन्न. अनेक श्रोत्यांची भिन्न रुचि, भिन्न संस्कृति, भिन्न वय, व भिन्न आकलनशक्ति, यांमुळे हे कार्यक्रम आंखणें, अतिशय बिकट होतें.

वर्तमानपत्रांतील लेख, व सभागृहांतील अेखाद्या वक्त्याचें व्याख्यान, या दोन टोंकांना सांधणारी सांखळी, म्हणजे रेडियोच्या कार्यक्रमांतील भाषण.

व्याख्यान अैकण्यास, सभागृहापर्यंत जाण्याचे श्रम घ्यावे लागतात. न बोलण्याचें, व्यवस्थित बसण्याचें, कंटाळा आला तरी मध्येच अुठून न जाण्याचें, अवधान ठेवावें लागतें. कधी आपल्या अपेक्षेप्रमाणे, व्याख्यान मनोरंजक किंवा माहितीपूर्ण, उद्बोधक असत नाही. थोडक्यांत मुद्देसूद बोलण्याचें बंधन, व्याख्यात्यावर असतेंच असें नाही. वक्त्याला प्रत्यक्ष पाहतां येणें, त्याच्या आविर्भावांचा व अभिनयाचा, विशदीकरणास किंवा रसपरिपोषास उपयोग होणें, हे व्याख्यानाचे विशिष्ट गुण ! आणि हे गुण वजा केले, तर बाकी उरेल, तें रेडियोंतील भाषण ! या न्यूनामुळे, रेडियोंत भाषण करणारास, अेकदोन अवधानें संभाळावीं लागतात. स्वतःचें व्यक्तिमत्व आवाजांत, बोलण्याच्या लकबींत व्यक्त करावें लागतें. आवाजांतला अभि-नय, अेवढेंच अेक साधन, रसपरिपोषासाठी अुरतें. विद्वान् पंडिताची भूमिका सोडून आराम-खुर्चीवर पडलेल्या, सुखावलेल्या, स्वच्छंदी श्रोत्याला, शिळोप्याच्या गोष्टी सांगणारा सम-वयस्क मित्र, ही भूमिका स्वीकारावी लागते. वर्तमानपत्रांतील दहा कॉलमी लेखाचें जडान्न श्रोत्याला पचत नाही. दहा मुद्दे संगतवार लक्ष्यांत ठेवणें दूरच; अेका मिनिटापूर्वी अैकलेल्या

अनुक्रमणिका

वाक्यावरून विस्मरणाची लाट गेलेली असते. मनोरंजक पद्धतीने सांगितलें, तरच अेकदोनच मुद्दे दहा मिनिटांत अैकण्याची श्रोत्याची लहर असते. विषय दुर्बोध वाटून, डोक्यावरून पाणी वाहतें आहे असा भास होतांच, श्रोता पटकन् रेडियोचें चाक फिरवून, अंतराळांतून प्रवासास निघतो. बिचारा वक्ता मात्र माअीक्पुढे कंठशोष करीत असतो. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट अेवढीच की, हजारों श्रोत्यांपैकी दहांपाचांनातरी अैकण्याचें अगत्य असतें, व ते अैकतातहि. शिवाय रेडियोच्या स्टुडियो व कंट्रोल रूममधील दोन अधिकाऱ्यांना अैकावेंच लागत असल्यामुळे भाषणास अेकहि श्रोता नाही, असें मात्र कधीच होत नाही !

पण अशा अज्ञात श्रोत्यांना दहा मिनिटें ज्ञानामृत पाजण्यासाठीं, अगोदर किती यातायात करावी लागते ! प्रत्येक रेडियो स्टेशनावरील प्रोग्राम डिरेक्टर– कार्यक्रम नियंत्रक– व त्याचे हस्तक, आपल्या बैठकींत चर्चा करून, भाषणाचे विषय निश्चित करतात. या विषयांना आकर्षक शीर्षकें हुडकण्याचें काम चालू असतांच, वक्त्यांचेंहि संशोधन सुरू होतें. निवडलेल्या विषयांतला तज्ज्ञ, अैकणाऱ्यांच्या परिचयाचा, त्याच गांवचा, किंवा नसल्यास बाहेरून ठराविक दिवशीं येण्याची दगदग करण्यास तयार असलेला, साधारण बऱ्या आवाजाचा व मनमिळावू असा वक्ता शक्य असेल तर शोधून काढण्यांत येतो. त्याची पत्रद्वारें संमति मिळाल्यावर कार्यक्रम जाहीर होतो. भाषणाचें हस्तलिखित आठ पंधरा दिवस अगोदरच तयार असतें. मूळची योजना व हें भाषण यांचा तंतोतंत मेळ असतोच असें नाही. मग जुजबी दुरुस्त्या करून, अेक दिवस तालिमीसाठीं मुक्रर करण्यांत येतो.

म्हणजे, जणूं काय अंतस्फूर्तीने सुचलेल्या विषयावर वक्ता जिव्हाळ्याने बोलतो आहे; समोर बसून अवघड विषय सोप्या भाषेत समजावून सांगतो आहे; गुंतागुंतीचीं किंवा पूर्वी होअून गेलेलीं रहस्यें मनःचक्षूपुढे उभीं करतो आहे; अशा थाटाने पंधरा दिवस अगोदरच हस्तलिखित तयार करायचें ! स्वाभाविकच नेहमीचा लेखक किंवा व्याख्याता, या प्रसंगांतून अेकदोनदा जाअीपर्यंत, त्याचें भाषण पुरेसें परिणामकारक होत नाही.

स्टूडियोमधील अेका लहानशा बंद स्वतंत्र खोलींत टेबलाशीं अेकटें बसावयाचें. खोलीची सजावट व उजेड मनाला प्रसन्नता आणणारी पण किंचित् भीतिहि उत्पन्न करणारी. अेका भिंतीच्या पलीकडे काचेच्या खिडकींतून दिसत असलेलें अेक टेबल, लहानसें यंत्र, त्याजवळ बसलेला कार्यक्रमहस्तक, सगळेंच विलक्षण ! खोलींत अशरीरिणी वाणी म्हणते, 'हं करा सुरू.' हस्तकाचा आवाज खोलींतील लाअुड स्पीकरमधून आलेला असतो. वक्ता जरा दचकतो. अेकदम बोलण्यास सुरुवात करतां येत नाही. भर सभेंतील बेडरपणा, मोकळेपणा, लवचिक अभिनय, आवाजांत कर्णगोचर होत नाही. मधूनमधून हस्तक दुरुस्त्या सुचवतो; पुन्हा वाचायला सांगतो, आवाजांत चढअुतार सुचवितो. अखेर वक्ता मनांत तरी निराश होतो, आणि हें अवघड कृत्रिम तंत्र संभाळण्यापेक्षा व्यासपीठावर अुभें राहणेंच बरें, असें त्याला वाटूं लागतें.

वक्त्यास पुन्हा येण्यास सवड नसल्यास मात्र, दोन तीन कसोशीच्या तालमीनंतर, भाषण ध्वनिमुद्रित करण्यांत येअून, ती मुद्रिका कार्यक्रमाच्या प्रसंगीं वाजविण्यांत येते. ध्वनिमुद्रण साधारणपणें ग्रामोफोन मुद्रणापेक्षा जास्त सफाअीने करण्याकडे लक्ष असल्यामुळे, मुद्रिका वाजविली हें सहसा श्रोत्यांच्या ध्यानांत येत नाही.

आता खुद्द कार्यक्रमाच्या दिवशीं ! वक्ता रेडियो घरांत तास अर्धा तास अगाअू येअून बसलेला असतो. या दिवसापूर्वी कितीदा तरी, त्याने आपल्या भाषणाचें 'ब्रॉडकास्टिंग' घरांत,

मित्रांसमोर, अेकान्तांत, खोलींत केलेलें असतें. 'अमुक दिवशीं अमुक वेळेला जरूर अैका बरं का !' अशी तो बजावून सगळ्यांना विनंती करीत असतो. पत्रें लिहितो. कार्यक्रमांतील बाकी-च्या बाबी त्याला महत्त्वाच्या वाटत नाहीत. स्वतःच्या भाषणावर त्याचें सर्व लक्ष खिळलेलें असतें. रेडियोघराकडे येतांना ट्रॅममध्ये, लोकलमध्ये, तो अेकदा तरी खिशांतलें पुडकें काढून तपासतो; अेकदा तरी विशेष गमतीच्या मुद्द्यांवरून डोळे फिरवितो; रेडियोघरांतील थांबखोलींत तो अधीरपणें बसून राहतो. त्या खोलींतल्या सुखद मवू खुर्चीवर स्थिरपणें बसण्याअैवजी त्याचें लक्ष दाराकडे असतें.

अखेरीस कार्यक्रमाच्या पूर्वी दहा पंधरा मिनिटें त्याचा मुख्य स्टुडियोंत प्रवेश होतो. निळा पोशाक केलेला द्वाररक्षक अदबीने दार अुघडून देतो. दोन्ही बाजूंना बोळाच्या दरवाज्या-वर पांढरे लाल दिवे झळकत असतात. कृत्रिम थंड हवेने शरीर किंचित् गार होतें पण मन मात्र, अंतरिक्षांत विहार करण्याच्या अगोदर पंख साफसूफ करून, फडफडविण्याच्या तयारींत असतें. तालीम घेतलेल्या, किंवा तशाच दुसऱ्या खोलींत टेबलाशीं वक्त्याला बसवून, हस्तक शेजारच्या काचेच्या खिडकीपलीकडे बसतो. कागद टेबलावर नीट पसरून, आवाज होणार नाही अशा तयारीने बसून, अेकदोनदा आवाज साफ करून, भिंतीवरच्या घड्याळांतील सेकंदकांट्याची जलद गति पाहात, टेबलावरच्या दिव्याची मनांत तारीफ करीत, वक्ता घटी भरण्याची वाट पाहात असतो. "खरेंच कोणी अैकत असेल का ! का विसरले ! घड्याळें मागे तर नसतील ना !" अशा अनेक कुशंका मनांत येतात. 'आज आपला आवाज अनेक ठिकाणीं दूरवर अैकूं येणार,' याचें आश्चर्य व अभिमान वाटून टेबलावरच्या माअीक्‌कडे तो विस्मयाने बघूं लागतो. अदृश्य श्रोते मनापुढे अुभे करून तो मनाचीं स्थिरस्थावर करतो. अितक्यांत दारावरचा लाल दिवा टक् टक् करून पुन्हा विझतो. पूर्वीचा कार्यक्रम संपून अनाअून्सर ( ललकाऱ्या ) त्याच्याविषयी बोलत असतो. पुन्हा अेकदा लाल दिवा पेटतो. वक्ता मनांत म्हणतो, आता आपण भाषणास सुरुवात केली पाहिजे. सर्व वाट पाहात असतील. क्षणभर शब्द फुटत नाही. हळूहळू वक्ता रंगांत येतो. अगोदर लिहिलेलें, पण आता बोलल्यासारखें, हितगुज करूं लागतो. तो आपल्या सभोंवतींचा अेकान्त विसरतो; आणि श्रोत्यांशीं समरस होतो. भाषण संपतें; आणि शेवटचें पान खाली ठेवून दरवाजा-जवळचा लाल दिवा विझण्याची वक्ता वाट पाहतो. दिवा गेल्यावर आंत आलेल्या हस्तकाकडे प्रश्नार्थक मुद्रा करून काय अुपयोग ! त्याला हा प्रकार नेहमीचाच. स्टुडियोच्या बाहेर आल्या-वर, यक्षसृष्टींतून भूतलावर अुतरल्यावर, रस्त्यांत, इतर ठिकाणीं आपल्या भाषणांविषयी बेपर्वाअीच आहे, असें वाटून त्याचा अुत्साह अर्धा अधिक मावळतो व घरीं किंवा मित्रांनी केलेल्या भाषणस्तुतीचें तितकेंसें कौतुक त्याला वाटत नाही. अनेक दिवस श्रमाने तयार केलेला, मोहरमांतील तावूत नदींत विसर्जन करावा, तशी मनःस्थिति होते. हें भाषण नंतर कदाचित् ओळखीच्या साप्ताहिकांत प्रसिद्ध होअील; पण जें अेकदा लहरीवर सोडलें, तें सहसा पुन्हा मूर्त रूप घेत नाही.

हें दृश्य अितक्या विस्ताराने सांगण्याचें कारण अितकेंच, की या दहा मिनिटांच्या भाषणामागे केवढे परिश्रम व बौद्धिक तयारी असते, याची श्रोत्यांना कल्पना नसते. आपल्या दिवाणखान्यांतील रेडियोची अपूर्वाअी, लायसेन्सफीचा तब्बल दहा रुपयांचा बोजा, विजेच्या खर्चाची व दुरुस्तीच्या खर्चाची भीति अेवढेच विषय श्रोत्याच्या मनांत प्रामुख्याने असतात. मनोरंजक कार्यक्रमांत चुकून गद्य कानांवर पडल्यास, नाखुषीने थोडा वेळ, अैकण्यास तो तयार

असतो. कार्यक्रमपत्रिका अगोदर चाळून, स्वतःस आवडणाऱ्या वक्त्याच्या, किंवा विषयावरील भाषणाचें टांचण करून आस्थेने अैकणारा श्रोता अजून दुर्मिळ आहे. दुसरी बाजू श्रोत्यांना कळली तर कदाचित् श्रोते अधिक तत्परतेने अैकतील.

असें हें अवघड व निर्जिव तंत्र रेडियोवरील भाषणाचें आहे. पण त्याला इलाज नाही. श्रोते भिन्न रुचीचे असल्यामुळे, सर्व प्रकारच्या विषयांवर भाषणें झालींच पाहिजेत. केवळ श्रोत्यांस किंवा तंत्रास दोष देण्यांत अर्थ नाही. विषय निवडून काढण्यांत लागणारी कल्पकता, विषयाचें ज्ञान, मांडणी, यांमध्ये विविधता येण्यास अनेक अधिकारी व्यक्तींचें साहाय्य पाहिजे. रेडियोघराचे अधिकारी कितीहि जागरूक असले, तरी 'मागणीप्रमाणे माल' बनवून घ्यावा लागतो. प्रत्येक विषयाचा तज्ज्ञ अधिकारमंडळांत असणें शक्य नाही. या कामीं व्यक्तिशः लेखकांचें, किंवा साहित्यसंस्थेसारख्या सामुदायिक संघाचें, सहकार्य रेडियोघरास उपकारक होअील. अनेक विषयांवरील अधिकारी व्यक्तींनी, अंतःस्फूर्तीने लिहिलेल्या भाषणांची निवड करून, योग्य बांधणी करून, मालेच्या रूपाने मनोरंजक ज्ञानसत्र रेडियोवर सुरू करतां येअील. नाटक-सिनेमा सोडले, तर हल्ली ज्ञानप्रसाराचे लेखी मार्ग थोडे व महागाअीचे झाले आहेत. पत्रकें, पुस्तिका, पुस्तक यांच्या छपाअीस खर्च येतो; व खपविण्याची जबाबदारी घेण्यास प्रकाशक तयार होत नाहीत. वर्तमानपत्रांची व मासिकांची संख्या हि या विस्तृत कार्यास अपुरी पडते. साक्षरतेच्या अभावीं कर्णद्वारा शिक्षण कांही दिवस तरी अुपयुक्तच ठरेल. वाचण्यापेक्षा पाहण्या-अैकण्याची आवड पुरातन आहे. टॉलस्टायचें 'अॅना कॅरेनिना' किंवा डिकन्सचें 'ए टेल ऑफ टू सिटीज्' हें पुस्तक वाचण्यापेक्षा, चित्रपट पाहणें, व त्यांतले संवाद अैकणें, लोक जास्त पसंत करतात. चित्रपट काढणें अत्यंत खर्चाचें असल्यामुळे, अखेर ध्वनिमुद्रिकेवर किंवा रेडियोवरच अवलंबून राहावें लागणार. प्रौढ शिक्षण, खेडूतांची सुधारणा, शैक्षणिक सुलभज्ञान, यांवरचीं भाषणें लेखकांनी अगोदर तयार करून दिलीं, आणि स्वतः लेखकास शक्य नसलें तर कसलेल्या वक्त्यांनी रेडियोवर म्हटलीं, तर देशाचा बराच फायदा होअील.

खेडूतांचीच गोष्ट कशाला! अितर सुशिक्षित (!) मध्यम स्थितींतल्या व्यवसायमग्न गृहस्थास तरी कितीसें ज्ञान असतें! त्याच्या पत्नीस घरकामापलीकडे दोनतीन मासिकांतील किंवा पंधरावीस पुस्तकांपलीकडील जगाची काय माहिती असते! अशा ज्ञानपिपासू लोकांना, रेडियोभाषण ही नवीन पण बहुमोल देणगी आहे. लोकांकरिता कांहीतरी करण्याची तळमळ असलेल्या विद्वान् लेखकांना, ती अुत्तम संधि आहे. अेकदा लेखनतंत्र अवगत करून घेतल्यावर, आपल्या आवडीच्या विषयावरचें भाषण लिहिणें सोपें जाअील. अशा अनेक भाषणांतून निवड करून, अुत्कृष्ट ध्वनिवाङ्मय रेडियोद्वारा प्रसृत करणें, अधिकाऱ्यांना कठीण नाही. आतापर्यंत अिंग्रजी, हिंदी, गुजराती व मराठी भाषांतून अुत्तम भाषणें झालीं आहेत; पण त्यांहीपेक्षा सरस व अुपयुक्त भाषणें, मातृभाषेतून होण्यास, व्यक्तिशः विद्वान् लेखकांचें व साहित्यपरिषदेसारख्या संस्थांचें, सहकार्य अवश्य आहे. या विधायक कार्यक्रमाचा परिषदेने अवश्य विचार करावा.

---

# साहित्यसंमेलनांतील चर्चा

[ले.-गंगाधर बाळकृष्ण सरदार, अेम्.अे.]

"We are all so prone to let prejudice shut the door on judgment, so slow to bring the first-born, bias, under the control of the second born, reflection, that when we sadly scan each other's aberrations the cause of reason is apt to seem desperate."

"I am wont to say that if we were all perfectly honest we should all be better reasoners so much bad reasoning being a matter of unreadiness to be fair. In other words, we have so many motives to opinion, so many incitements to wish that this or that proposition may be true or untrue, this or that man, right or wrong, that we are apt to prejudge as often as to reason."

— *John M. Robertson*, Letters on Reasoning P.26-27.

वीसपंचवीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत प्रतिवर्षी अेखाद् दुसरें साहित्यसंमेलन मोठ्या मुष्किलीने भरत असे. पण आता शारदोपासक संमेलन पुणें, मुंबअी व अुपनगर साहित्यसंमेलन, बडोदें वाङ्मयपरिषद्, दक्षिण महाराष्ट्र साहित्यसंमेलन अित्यादि लहानमोठीं प्रादेशिक संमेलनें, पत्रकारपरिषद्, नाट्यसंमेलन वगैरे विशिष्ट वाङ्मयशाखांचीं संमेलनें, वेगवेगळ्या साहित्यसंस्थांचे वार्षिकोत्सव असे विविध वाङ्मयीन समारंभ दरवर्षी अत्यंत अुत्साहाने पार पडत आहेत. सदरहू स्थित्यंतर हें मराठी भाषेच्या नि वाङ्मयाच्या अुज्ज्वल भवितव्याचें निःसंशय निदर्शक आहे. ह्या संमेलनांतून अितर बहुविध कार्यक्रमांबरोबर निरनिराळ्या साहित्यविषयक प्रश्नांची साधकबाधक चर्चा करण्याचा परिपाठ दिवसानुदिवस रूढ होत चालला आहे. तेव्हा प्रस्तुत लेखांत वरील चर्चेचा अुद्देश काय असावा, विषयांची निवड कोणत्या धोरणाने व्हावी, विवादपद्धतीचें स्वरूप कसें असावें अित्यादि गोष्टींचें यथाशक्ति विवेचन करण्याचा माझा अिरादा आहे. त्यामुळे महाराष्ट्रांतील सुविद्य साहित्यिकांचें ह्या विषयाकडे लक्ष जाअील, आणि त्यांच्या प्रयत्नाने संमेलनांतील चर्चांना अिष्ट वळण लागेल अशी माझी अपेक्षा आहे. अुपरिनिर्दिष्ट कोणत्याहि विवक्षित संमेलनावर माझा कटाक्ष नाही. केवळ तात्त्विक दृष्टीने मी ह्या विषयाचा अूहापोह करणार आहें. सर्व संमेलनांच्या चालकांबद्दल मला अतिशय आदर आहे. त्यांची तळमळ मी ओळखतों. शक्य तितकी दक्षता घेअूनहि प्रचलित चर्चापद्धतींत जे दोष राहिले आहेत त्यांबद्दल महाराष्ट्रांतील आपण सर्वच साहित्यप्रेमी जबाबदार आहोंत. परस्परसहकार्य व समंजसपणा ह्यांच्या जोरावर हे दोष खात्रीने काढून टाकतां येतील.

साहित्यिकांच्या मेळाव्यांत मुख्यतः साहित्यविषयक प्रश्नांचाच खल व्हावा हें स्वाभाविक आहे. परंतु साहित्य हें समाजाच्या व्यापक आणि बहुविध जीवनाचें अेक प्रधान अंग आहे. दिवसानुदिवस सामाजिक जीवन अितकें विशाल व गुंतागुंतीचें होत चाललें आहे की त्याच्या कोणत्याहि अेका अंगाचा विचार परिपूर्ण होण्यास अितर अनेक अंगांचा थोडाबहुत परामर्श

घ्यावा लागतो. शुद्ध साहित्यविषयक प्रश्न घेतले तरी त्यांत समाजकारण, राजकारण, अर्थकारण अित्यादि अवांतर गोष्टींचा अल्पस्वल्प संबंध येतोच येतो. 'प्रांतिक सरकारें नि देशभाषा', 'हिंदुस्थानीचा सार्वत्रिक सक्तीचा प्रसार', 'ठरीव सांच्याच्या क्रमिक पुस्तकांची योजना' अित्यादि प्रश्नांची चर्चा राजकारणापासून सर्वस्वीं अलिप्त कशी ठेवतां येअील ! पावित्र्यविडंबनाच्या वादांत धार्मिक व नैतिक कल्पनांचा विचार क्रमप्राप्तच नाही का ! तेव्हा साहित्यसंमेलनांतील चर्चा-विषयांची योग्य मर्यादा निश्चित करणें फार कठीण आहे. भारतीय समाजाच्या सध्याच्या संक्रमणावस्थेंत वेळोवेळीं नानातऱ्हेचे प्रश्न अुपस्थित होतात. त्यांपैकी साहित्याच्या प्रगतीशीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें निगडित असलेल्या प्रश्नांचीच संमेलनांत चर्चा व्हावी हें अुचित आहे. चिरकालीन महत्त्वाच्या विवाद्य प्रश्नांची चर्चा अेक दोन दिवसांच्या संमेलनांत करण्यापेक्षा नियतकालिकांच्या द्वारें करणें अिष्ट व सोयिस्कर आहे. अुलट संमेलनांत तात्कालिक महत्त्वाच्या पण अत्यंत जिव्हाळ्याच्या व निकटच्या प्रश्नांची निर्दोष चर्चा झाली म्हणजे ती पांचपन्नास साहित्यिकांनाच नव्हे तर सर्व समाजाला अुद्बोधक व मार्गदर्शक होअील. ह्या बाबतींत मनोरंजकतेपेक्षा अुपयुक्ततेकडे अधिक लक्ष दिलें पाहिजे. केवळ काव्यशास्त्रविनोदात्मक चर्चांचें सद्यःस्थितींत फार कमी प्रयोजन आहे. समाजासमोर अनेक गुंतागुंतीचे व बिकट प्रश्न आहेत. त्यांपासून साहित्य अलग राहूं शकत नाही. ह्या दृष्टीने 'प्रांतिक सरकारें नि देशी भाषा', 'क्रमिक पुस्तकांचा प्रश्न', 'वर्धा शिक्षण योजना', 'आधुनिक मराठी कवितेंत आजच्या समाजाच्या आकांक्षा नि भावना व्यक्त होत नाहीत', 'पावित्र्यविडंबन', 'हिंदुस्थानीचा सार्वत्रिक सक्तीचा प्रसार' अित्यादि विषयांची निवड अवश्य, मार्मिक व औचित्यपूर्ण आहे. लांबलांबच्या ठिकाणांहून पैसा आणि वेळ खर्च करून आलेल्या सुजाण साहित्यिकांनी अशा प्रकारचे महत्त्वाचे प्रश्न सोडविण्याला यथाशक्ति हातभार लावला, तर संमेलनाचें कार्य बहुंशीं सफल झालें असें म्हणतां येअील.

प्रादेशिक संमेलनांतील चर्चेचा अुद्देश राजकीय व सामाजिक परिषदेप्रमाणे सामुदायिक मतप्रदर्शन हा नसावा. प्रत्येक वक्ता व्यक्तिशः आपल्या मताचा पुरस्कार करणार हें अुघड आहे. तेव्हा चर्चेच्या शेवटीं अेखादा ठराव पसार करून संमेलनाचें निश्चित मत व्यक्त करण्यांत फारसें स्वारस्य नाही. अर्थात् कांही महत्त्वाच्या विषयांवर महाराष्ट्रीय साहित्यिकांचें अधिकृत मत व्यक्त होणें अवश्य आहे; पण त्यासाठी महाराष्ट्र साहित्यसंमेलनांत प्रत्येक वर्षी ते ते विषय ठरावरूपाने चर्चिले जातातच, यामुळे अितर लहानमोठ्या प्रादेशिक संमेलनांतील व वार्षिकोत्सवांतील चर्चा निर्णायक स्वरूपाच्या नसणेंच श्रेयस्कर होय. अशा चर्चेंत पुष्कळदा सत्यान्वेषणाची प्रांजल बुद्धि लुप्त होअून वक्त्याच्या मनावर दुराग्रहाचा पगडा बसतो व कसेंहि करून आपलें मत स्थापित करण्याच्या मोहाला तो बळी पडतो. वास्तविक पाहतां ह्या चर्चा निव्वळ विचारप्रवर्तक व्हावयास हव्यात. अेखाद्या व्यक्तीवर किंवा विशिष्ट परंपरेवर विसंबून न राहतां कोणत्याहि प्रश्नाचा निर्विकार मनाने व शास्त्रशुद्ध दृष्टीने विचार करण्याची लोकांना सवय लागली पाहिजे. प्रत्येक विषयाची अुलटसुलट सर्व बाजूंनी कसून छाननी करण्याची लोकांना शिकवण मिळाली पाहिजे. ह्या दृष्टीने संमेलनांतील चर्चेचा पुष्कळ अुपयोग होण्यासारखा आहे. निरनिराळ्या महत्त्वाच्या प्रश्नांवर राजकीय व अितर पक्षोपपक्षांचा प्रचार चालू असतो. त्यामध्ये अभिनिवेश व अेकांगीपणा असणें अपरिहार्य आहे. साहित्यिकांची भूमिका याहून भिन्न असली पाहिजे. कोणतेंहि विशिष्ट मत लोकांच्या गळीं उतरविण्यापेक्षा त्यांच्या विचारांना वळण लावणें, त्यांना आपलें स्वतंत्र मत बनविण्याचें शिक्षण देणें व त्यासाठी त्या

प्रश्नाच्या सर्व बाजू त्याच्या दृष्टीपुढे आणणें हें जास्त अगत्याचें आहे. ह्याच शुद्ध व तात्त्विक भूमिकेवरून साहित्यसंमेलनांतील चर्चा चालवयास हव्यात. त्यांमध्ये अितर अेकान्तिक व पक्षनिष्ठ चर्चेतील कडवेपणा व कडवटपणा येण्याची तिळमात्र गरज नाही.

येथपर्यंत संमेलनांतील चर्चेचें अुद्दिष्ट व चर्चाविषयांची निवड यासंबंधीं विचार झाला. आता हे अुद्देश साध्य होण्यास कोणकोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे तें पाहूं. आपल्यांतील सर्वसामान्य सुशिक्षितांचा दृष्टिकोनहि अद्याप बराच आकुंचित आहे. आपण मोठमोठाली तत्त्वें वाचतों व क्वचित् बोलतोंहि. पण आपल्या वैयक्तिक बाबींचा आपण जितक्या आस्थेने व कळकळीने विचार करतों, तितकी सार्वजनिक प्रश्नांची आपणांस क्षिति वाटत नाही. कित्येकदां आपण त्यांबद्दल अक्षम्य अुदासीनताहि दाखविण्यास चुकत नाहीं. संमेलनांतील चर्चाविषयांची अशा अुथळ व बेजबाबदार वृत्तीने चिकित्सा करण्यापासून कांही निष्पन्न होणार नाही. त्याविषयी आपल्या अंतःकरणांत आत्मीयता अुत्पन्न झाली असली पाहिजे. केवळ चालकांच्या निमंत्रणाला मान देअून चार समयोचित शब्द बोलण्याची प्रथा अनिष्ट आहे. आपण ज्या प्रश्नांची चर्चा करीत आहों, त्यांचा समाजांतील अनेक लोकांच्या हिताहिताशीं संबंध आहे, याची आपणांस पुरेपूर जाणीव असली पाहिजे. संमेलनांतील चर्चा म्हणजे कांही वक्तृत्वोत्तेजक मंडळाच्या बैठकी नव्हेत. तेव्हा दोन्ही बाजू रंगविण्यासाठीं पांच-सात वक्ते मिळाले म्हणजे झालें असें मानून चालणार नाही. विषय प्रतिपादन करावयाचा म्हणजे थोडेंबहुत वक्तृत्व हवें ही गोष्ट खरी; परंतु ह्या ठिकाणीं वक्त्याची कसोटी वक्तृत्वा-पेक्षा त्या त्या विषयाच्या तज्ज्ञतेवरच अवलंबून ठेवणें अधिक अिष्ट होय. तसेंच प्रत्येक वक्त्याने आपली बाजू परिश्रमपूर्वक मांडण्याची शिकस्त केली पाहिजे; आणि त्यासाठी जरूर ती साधनसामग्री जमा करण्यांत थोडीदेखील हयगय होतां कामा नये ! ह्या बाबतींत मला प्रामुख्यानें कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांचा अुल्लेख करावासा वाटतो. विश्वविद्या-लयाची अत्युच्च पदवी प्राप्त झाल्यानंतरहि आदर्श विद्यार्थ्याप्रमाणे ते अतिशय परिश्रमपूर्वक आपल्या विषयाची मांडणी करीत. अर्ध्या हळकुंडाने पिवळे होणाऱ्या आमच्या तथाकथित विद्वानांना हें अुदाहरण बोधप्रद नाही काय ! कांही तरी करून समारंभ साजरा करण्याची प्रवृत्ति नष्ट झाल्याशिवाय ह्या चर्चा कधीहि यशस्वी व्हावयाच्या नाहीत. चर्चात्मक व्याख्याना-साठी पूर्वतयारी करण्यांत मुळीच कमीपणा नाही. पुष्कळदां साधार व पुरेशा माहितीच्या अभावीं मोठमोठ्या चतुरस्र पंडितांचीहि दिशाभूल झालेली दिसून येते. तेव्हा समयसूचकतेवर वाजवीपेक्षा जास्त विश्वसून राहण्यांत स्वारस्य नाही. आमच्या ह्या घातक प्रवृत्तीमुळे संमेलनां-तील चर्चेत नवविचारांचें दुर्भिक्ष व पोकळ शब्दपांडित्याचा विलास मात्र दृष्टीस पडतो. पुरो-गामी साहित्यिकांचा असला मेळावा समाजाला अेक पाअूलहि पुढे नेअूं शकत नाही. वीस पंचवीस वर्षांपूर्वी साहित्याचा प्रसार व लोकप्रियता पुष्कळ कमी असतांहि साहित्यिकांच्या हातांत समाजाचें पुढारीपण होतें. आज सुदैवाने जनतेंत बरीच जागृति झाली आहे. पण आमच्या कमनशिबाने साहित्य मागे रेंगाळत आहे. ही स्थिति लवकरच पालटली पाहिजे. साहित्यिकांनी आपला व्यक्तिनिष्ठ दृष्टिकोन बदलल्याशिवाय कितीहि संमेलनें भरविलीं, कितीहि चर्चा केल्या, तरी त्या व्यर्थ होत. नुसत्या शाब्दिक सहानुभूतीचा काळ केव्हाच निघून गेला. आमच्या विचारांत निष्ठेचें बळ नाही, आमच्या शब्दांत अंतःकरणाची तळमळ नाही, आमच्या कृतींत त्यागाचा लवलेश नाही, अशा स्थितींत आमच्या बेगडी वक्तृत्वाचा काय परिणाम होणार ! सावरकरांच्या अध्यक्षीय आदेशाप्रमाणे साहित्यिकांनी लेखण्या टाकून बंदुकाच घेतल्या

पाहिजेत असें नाही. टिळक-आगरकरांच्या तेजस्वी लेखणीने शेकडो बंदुकांचें कार्य साधलें नाही का? आजहि महाराष्ट्रांत प्रतिभासंपन्न लेखक आणि वक्ते यांची वाण नाही. पण त्यांच्या खानदानी प्रतिभेला अनाथ अपंगांच्या गलिच्छ झोपड्याकडे दृष्टि देण्यास सवड नाही. ह्या सर्व गोष्टींचा अित्यर्थ अितकाच की अंतरींच्या जिव्हाळ्याशिवाय बाह्य भपका फुकट आहे. आमच्या अुत्सवप्रियतेला कर्तव्यबुद्धीची जोड मिळाली तर संमेलनांतील चर्चा खास यशस्वी होतील. संमेलनाच्या चालकांचें काम लायक माणसांची निवड करणें अेवढेंच आहे. त्यापलीकडे ते कांही करूं शकत नाहीत. पण प्रत्येक वक्त्याने आपापलें काम आस्थापूर्वक बजावलें तर चर्चेच्या कार्यक्रमाने संमेलनाचें यश द्विगुणित होअील.

ह्यानंतर चर्चेचा कार्यभाग सिद्धीस जावा म्हणून आणखीहि अेक अिशारा देणें प्राप्त आहे. प्रत्येक वक्त्याने आपली भूमिका पक्षातीत ठेवण्याचा शक्य तितका प्रयत्न करणें अवश्य आहे. विवाद्य विषयाच्या सर्व बाजू शुद्ध स्वरूपांत लोकांच्या ध्यानीं याव्या हा चर्चेचा मुख्य हेतु आहे ही गोष्ट त्याने सतत डोळ्यांसमोर ठेवणें जरूर आहे. व्यावहारिक धकाधकीच्या मामल्यांत निर्भेळ तात्त्विक चर्चेला स्थान मिळणें शक्य नाही व अिष्टहि नाही. पण ज्या ठिकाणीं मुख्यतः विचारांचेंच साम्राज्य आहे अशा साहित्यक्षेत्रांत विवादकांना पक्षातीत भूमिका ठेवणें अवघड पडूं नये. पक्ष म्हटला म्हणजे त्याजबरोबर पूर्वग्रह आलेच. पूर्वग्रहदूषित दृष्टीने सत्यान्वेषणाचा प्रयत्न करणें हास्यास्पद होय. जो दुसऱ्यापासून कांहीच शिकावयास तयार नाही तो सत्याचा अुपासकच नव्हे! यावरून पक्षातीत भूमिकेचें प्रयोजन लक्षांत येअील. मात्र ह्या हतभागी देशांत अशा भूमिकेची अत्यंत आवश्यकता असतांहि ती ठेवणें फार दुर्घट आहे. व्यावहारिक जगांतील दूषित वातावरणापासून अलिप्त राहून केवळ विद्याभ्यासांत निमग्न असणारा पंडितांचा वर्ग हिंदुस्थानांत निर्माण होणें सध्या शक्य दिसत नाही. आमचे शास्त्रज्ञ व साहित्यिक यांचा आवडीचा व्यवसाय प्रत्यक्ष व्यवहारांत दुय्यम ठरतो. आणि अुदरनिर्वाहासाठी त्यांना शिक्षक, प्राध्यापक, वकील, डॉक्टर, किंवा अन्य कोणीतरी म्हणून दिवसभर काम करावें लागतें. त्यांतच ते कोणत्या ना कोणत्या तरी राजकीय व सामाजिक पक्षाचे सभासद असतात. परिस्थितीमुळे अेकाच माणसाला अशा अनेक भूमिका पार पाडाव्या लागल्यामुळे स्वाभाविकच अहोरात्र त्याच्या मनावर विशिष्ट परिस्थितीचे व पक्षाचे संस्कार घडत राहणें अनिवार्य होतें अशा स्थितींत कोणाहि माणसाची शुद्ध तात्त्विक भूमिका राहणें कठीण आहे. त्याचे विचार कोणत्यातरी पक्षाकडे साहजिकच झुकणारच. त्यामुळे संमेलनांत राष्ट्रभाषेची चर्चा असो, किंवा वर्धा-शिक्षणयोजनेची मीमांसा असो, तींत पूर्वग्रहाचा प्रभाव दृष्टीस पडल्यावांचून राहात नाही. ह्याला अिलाज अेकच. सद्यःस्थितींत पक्षनिष्ठा जरी अपरिहार्य असली तरी साहित्यिकांनी आपलें मन थोडें मोठें करून पक्षांधतेला थारा देअूं नये. परस्परांचे विचार समजून घेण्याचा प्रयत्न करावा. व्यावहारिक मतभेद तात्पुरते विसरून जाण्याची शिकस्त करावी. क्षुद्र गोष्टींना नसतें महत्त्व देअून चर्चेची प्रौढी कमी करूं नये.

प्रचारकी व्याख्यानांचा कल बुद्धिवादापेक्षा भावना क्षुब्ध करण्याकडे असतो. संमेलनांतील चर्चेंत मुख्यतः बुद्धिवादाचाच आश्रय करणें युक्त आहे. म्हणून आपलें भाषण ओजस्वी व आवेशपूर्ण करण्यापेक्षा, तें सुबोध व तर्कशुद्ध व्हावें म्हणून जास्त काळजी घेणें अधिक महत्त्वाचें आहे. कोणत्याहि प्रश्नाची साधकबाधक चर्चा कशा रीतीने करावी याचें लोकांस शिक्षण देतांना आपणच भावनेच्या आहारीं जाणें बरोबर नाही. याचा अर्थ चर्चा नीरस व कंटाळवाणी झाली तरी चालेल असा नाही, पण सभा जिंकण्याच्या मोहाने लोकांच्या भावना-

वशतेला प्रोत्साहन देणें हानिकारक आहे. आमचे लोक अंधश्रद्ध आहेत अशी हाकाटी करणारे वक्तेच आपली पडती बाजू सावरून धरण्यासाठी वेळोवेळीं त्यांच्या भोळ्या भाविकतेचा गैर फायदा घेण्यास मागेपुढे पाहात नाहीत. प्रचारकार्यांत ह्या गोष्टी क्षम्य असल्या, तरी विद्वज्जनांच्या चर्चेत अशा क्लृप्त्यांना वाव मिळणें बाजवी नाही. प्रतिपाद्य विषय जोरदार रीतीने मांडण्यासाठी विकाराधीन होऊन तर्कदुष्ट कोटिक्रमांचा अवलंब करण्याची मुळीच आवश्यकता नाही. अुलट तसें करणें म्हणजे आपली बाजू थोडी कमकुवत असल्याची अप्रत्यक्ष कबुली देणेंच होय!

आपल्या चर्चांना अधिक व्यवस्थित स्वरूप यावें म्हणून सर्वांनीच थोडा समजूतदारपणा दाखविला पाहिजे. सभेच्या कामाला कांही शिस्त असावयास हवी. पण ही साधी गोष्टसुद्धा आम्ही अंमलांत आणूं शकत नाहीं. आमच्या वक्त्यांना वेळेचें नियंत्रण मानवत नाही. सुप्रतिष्ठित वक्ते अध्यक्षांच्या भिडस्तपणाचा फायदा घेअून खुशाल प्रमाणाबाहेर वेळ घेतात. अेकंदर वेळ किती व त्यामध्ये किती वक्त्यांचीं भाषणें व्हावयाचीं याचें कोणालाच भान नसतें. त्यामुळे नंतरच्या नवशिक्या वक्त्यांना साहजिकच पांच पांच मिनिटांत भाषण आवरावें लागतें व त्यांचा विरस होतो. त्यांनी कितीहि मेहनत घेतलेली असली तरी चर्चेच्या दृष्टीने तिचा बिलकूल अुपयोग होत नाही. अेखाद्या व्यक्तीचा विरस झाला म्हणून कांही बिघडत नाही. पण आम्हां सुशिक्षितांना आमचे साधे साधे कार्यक्रमहि सुव्यवस्थित रीतीने पार पाडतां येअूं नयेत ही गोष्ट आपणांस लाजिरवाणी नाही का? बरें, पहिले पहिले वक्ते तरी आपल्या पाल्हाळिक भाषणाने लोकांच्या विचारसंपदेंत कांही भरीव भर घालतात काय? मुळीच नाही. मग ह्या ढिलेपणांत काय अर्थ आहे? यासाठी प्रत्येक वक्त्याने स्वतःला आपलें भाषण ठरीव वेळांत आटोपण्याची शिस्त लावून घेतली पाहिजे. आपला अेखाद दुसरा मुद्दा सांगावयाचा राहिला तर समाजावर कांही भयंकर आपत्ति कोसळणार आहे अशांतला भाग नाही. प्रत्येक वक्त्याचा अनुभव व अधिकार लक्षांत घेअून त्याला कमजास्त वेळ देण्यास हरकत नाही. पण ज्यांची त्याने आपली नेमलेल्या वेळांत भाषण संपविण्याची जबाबदारी आपण ओळखावयास हवी. निष्कारण अध्यक्षाच्या व श्रोत्यांच्या सहनशीलतेचा अंत पाहण्यांत काय राम?

प्रत्येक वक्त्याला प्रतिपाद्य विषयाचा अेकेक मुद्दा नेमून देअून चर्चा चालविणें अेका दृष्टीने सोयीचें आहे. पण त्यामुळे वक्त्याला बांधल्यासारखें होअून त्याच्या विवेचनांत कृत्रिमपणा येण्याचा संभव आहे. तेव्हा प्रत्येक वक्त्याचें भाषण स्वयंस्फूर्त असलेलें बरें. मात्र आधीच्या वक्त्याने प्रतिपादलेल्या मुद्यांचें चर्वितचर्वण न करण्याबद्दल सर्वांनी खबरदारी घेतली पाहिजे. कांहीतरी नावीन्य असल्याशिवाय पुन्हा पुन्हा तेच तेच मुद्दे अुगाळीत बसण्याने चर्चा कंटाळवाणी होते.

याप्रमाणे साहित्यसंमेलनांतील चर्चा फलदायी होण्यास माझ्या समजुतीप्रमाणे ज्या गोष्टी अगत्याच्या आहेत त्यांचा मीं थोडक्यांत अूहापोह केला आहे. माझ्या विचारसरणींत अनेक दोष असण्याचा संभव आहे याची मला जाणीव आहे; परंतु प्रस्तुत लेखामुळे ह्या महत्त्वाच्या प्रश्नाकडे महाराष्ट्रांतील विद्वानांचें लक्ष गेलें म्हणजे माझ्या लेखाचें कार्य संपलें.

अनुक्रमणिका

# घटकर्पर काव्यावरील शांतिसूरीची टीका

हें २२ श्लोकांचें यमकालंकारसुशोभित लहानसें काव्य जगप्रसिद्ध असून, हा कवि आद्य कालिदासाचे वेळीं, विक्रमादित्य राजाच्या पदरीं जी अेक नवरत्नमालिका होती, तींतील अेक बहुमोल रत्न होता, हें सर्वांस विदितच आहे. यासंबंधांत अेक जुना आख्यायिकापर श्लोक रचलेलाहि आहे. या लहानशा काव्याशिवाय या कवीने, कोणकोणते ग्रंथ निर्माण केले, याबद्दल माहिती मिळत नाही. या काव्यावर खालीलप्रमाणें टीका आफ्रेक्ट याने आपले सूचींत घातल्या आहेत :—

१ घटकर्परयोजिनी – कमलाकर (चतुर्भुज याचा पुत्र).
२ ,, कुलकावृत्ति – अभिनवगुप्त.
३ मुग्धावबोधना ....
४ सुबोधिनी (आडकमल्ल)

यांशिवाय कौशलकवि, ताराचंद्र, विंध्येश्वरीप्रसाद, विद्यानाथ, रमापतिमिश्र व गोवर्धन या टीकाकारांचीं नांवेंहि त्याने दिलीं आहेत (Aufrecht, Part I, Page 174., Part II, Page 35., Part III, Page 37). परंतु यांत शांतिसूरि याने केलेल्या टीकेचा अुल्लेखहि नाही. गोवर्द्धनी टीकेसह हें काव्य मुंबअी येथे ज्ञानबोधक आणि दीपदर्शक शिळा प्रेसमध्यें सं. १९२३ सालीं छापून प्रसिद्ध झालें आहे. या टीकेची छापील प्रत संग्रहांत विद्यमान असून त्यांत टीकेच्या रचनेचा समाप्तिकाल संवत् १९२३ श्रावण शु॥ ५ असा दिला आहे व पुस्तकप्रकाशनाचा समय आश्विन शु॥ १९२३ संवत् असा लिहिला आहे. यावरून ही टीका सं. १९२३ सालींच कर्त्यानें रचून प्रकाशित केली हें अुघड आहे. या काव्यासंबंधी माहिती रा. कैथसाहेब यांनी आपले A History of Sanskrit Literature पुस्तकांत पृ. २००-२०१ यांत दिली आहे. त्यांत या कवीचे नांवावर २१ श्लोकांचें 'नीतिसार' नांवाचें पुस्तक घातलें आहे. परंतु हें पुस्तक आजपावेतो पाहण्यांत आलेलें नाही. कैथसाहेब या कवीस कालिदास समकालीन तर मानितात, परंतु त्याच्या काव्यास कालिदासाअितकें महत्त्व देत नाहीत. शांतिसूरि या जैन पंडिताने ही टीका ११ वे शतकाचे शेवटीं किंवा १२ वे शतकाचे आरंभीं केली असली पाहिजे असें वाटतें. कारण श्रीजैनश्वेतांबर परिषदेने जैनग्रंथावलिनामक जी बृहत्-सूची विक्रम संवत् १९६५ सालीं छापून प्रकाशित केली, तींत शांतिसूरि नांवाचे दोन ग्रंथकार दिले आहेत. पहिला वादिवेताल शांतिसूरि हा असून याचा निधनकाल संवत् १०९६ हा दिला आहे. यावरून अि. स. १०३९ येतो. तसेंच पृथ्वीचंद्रचरित्रकर्ता शांतिसूरि याचा हा ग्रंथ रचण्याचा संवत् ११६१ दिला असून दोहोंत अंतर ६५ वर्षांचें आहे. तेव्हा प्रस्तुत काव्याचा टीकाकार शांतिसूरि हा वादिवेताल शांतिसूरि ठरत नाही. दुसरें असें की, शांतिसूरि याने मेघाभ्युदय, शिवभद्र, चंद्रदूत व वृंदावन या चार खंड काव्यांवराहि टीका केल्या आहेत. हीं सर्व काव्यें सटीक अेकापुढे अेक अशीं लिहिलेलीं असून ग्रंथाची लिपी जैन नागरी आहे. हा ग्रंथ संग्रहांत असून त्याचीं शेवटलीं

११२ पत्रें गहाळ आहेत. त्यामुळे लिपिकाराचा समय अित्यादि समजणें कठीण आहे. यांतील मेघाभ्युदय व वृंदावन काव्यवृत्तीचे शेवटीं प्रशस्ति अशी आहे— ॥ अिति श्री पूर्णतल गच्छ-संबंधि श्रीवर्द्धमानाचार्यस्थापित श्रीशांतिसूरिविरचिता वृंदावनकाव्यवृत्तिः समाप्ता ॥ ६ ॥ अिति श्री पूर्णतल्लगच्छसंबंधि श्रीवर्द्धमानाचार्य स्वपदस्थापित श्रीशांतिसूरि विरचिता मेघाभ्युदय लघुकाव्यवृत्तिः समाप्ता ॥ ६ ॥ यांत दिलेलें पूर्ण तल्लगच्छ हें जैनांचें अेक विहारस्थल आहे; परंतु प्रमाणाभावीं त्याचा विचार करतां येत नाही. या प्रशस्तींत वर्द्धमानाचार्य व शांतिसूरि हीं दोन नांवें बरोबरच दिलेलीं आहेत; त्यावरून वर्द्धमान व शांतिसूरि हे समकालीन होते हें दिसतें. वर्द्धमानानें रचलेल्या कांही ग्रंथांच्या नांवांपुढे रचण्याचीं वर्षेंहि दिलेलीं जैन ग्रंथावलींत आढळतात. तीं अशीं— १ मनोरमचरित्र सं. ११४०, २ आदिनाथ चरित्र सं.११६०, ३ धर्मरत्नकरंडक सं.११७२, ४ गणरत्नमहोदधि सं.११९७, ५ वासुपूज्यस्वामिचरित्र सं.११९९.

यांतील संवत् ११४० पासून सं. ११९९ पावेतोचा जो काल दिला आहे त्यांत शांतिसूरि याच्या पृथ्वीचंद्रचरित्ररचनेचें वर्ष संवत् ११६१ हें मोडतें. तेव्हा वर्द्धमान व शांतिसूरि हे समकालीन असल्याबद्दल खात्री होते. यावरून शांतिसूरि याचा समय वर दिल्याप्रमाणे कसा सिद्ध होतो, हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

शांतिसूरीने या काव्यावर जी टीका केली आहे, तिला त्याने टिप्पनक अथवा टिप्पणी असें नांव दिलेलें आहे. या टीकेचा आरंभ व शेवट मूलग्रंथासह खाली दिला आहे:—

मूळ— निचितं खमुपेत्य नीरदैः प्रियहीनाहृदयावनीरदैः ॥
सलिलैर्निहितं रजः क्षितौ रविचंद्रावपि नोपलक्षितौ ॥१॥

टीका— ६० ॥ निचि० निचितमपि क्रियापदं निचितं छन्नं इत्यर्थः । किं तत्कर्मतापन्नं ? खं आकाशं। कैः ? कर्तृभूतैः नीरदैः। नीरं जलं ददतीति नीरदास्तैर्मेघैः। पूर्वे कर्मकर्तृपदानि योजयित्वा ततोऽन्यानि विशेषणानि पदानि योज्यन्ते। तान्याह। कथंभूतैर्नीरदैः। प्रियो भर्ता तेन हीना रहिता प्रियहीना तस्य हृदयं वक्षः। प्रियहीनाहृदयं। तदेवावनीतां रदंति विलिखन्ति ये ते प्रियहीनाहृदयावनीरदास्तैस्तथोक्तैः। उपेत्यागत्य तैः पूर्वकालं निहितमाच्छादितं। किं तत् ? । रजः पांशुः। कैः ? सलिलैः। क ? क्षितौ पृथ्व्यां। अपिशब्दः संभावनार्थे। न केवलं रजः क्षितौ निहितं रविचंद्रावपिनो०। रविश्च चंद्रश्च रविचंद्रौ तावपि नो० न दृष्टौ इत्यर्थः ॥१॥

शेवट— मूळ— भावानुरक्तवनितासुरतैः शपेयमालभ्य वांबु तृषितः करकोशपेयं ॥
जीयेय येन कविना यमकैः परेण तस्मै वहेयमुदकं घटकर्परेण ॥२२॥
॥ इति घटकर्परकाव्यं ॥.

टीका— शपेयमिति क्रियापदं। शपेयमाक्रोशेयं। कः ? कर्ता अहं। कं ? आत्मानमित्यध्याहार्यं। कैः कृत्वा ? भावानु० भावानुरक्ता वनितास्तासां सुरतानि मोहितानि तैः। च समुच्चये। अंबु वालभ्य। जलं प्राप्य। कथंभूतः सन्। तृषितः सन्। कथंभूतमंबु। करकोशपेयं। कर्त्रा कविना। किंविशिष्टेन। परेणान्येन। कैः कृत्वा यमकैः ॥२२॥

॥ समाप्तमिदं घटकर्परस्य टिप्पनकं ॥ ६ ॥

दिलेल्या उद्धरणावरून ही टीका सरल व सुबोध आहे, हें तेव्हाच लक्षांत येअील. हीच खंडान्वय-पद्धति गोवर्धनाच्या चंद्रिका-टीकेंतहि स्वीकारली आहे; परंतु तींत शब्दांचें व्याकरण, अलंकारांचें स्पष्टीकरण, अित्यादि बाबींचा समावेश केला असल्याने, ती अधिक श्रेष्ठ ठरते. असें जरी असलें तरी शांतिसूरि याची टीका जुनी असून अप्रसिद्ध आहे. तस्मात् ती प्रकाशित झाल्याने आपल्या प्राचीन साहित्यांत थोडीशी भरच पडेल. सनातनी पंडितांप्रमाणे जैन विद्वानांनीहि साहित्यशास्त्रावर अनेक ग्रंथ व टीका लिहून, फार मोठा अुपकार केला आहे, यांत संशय नाही. जैनांचे ग्रंथसंग्रहाचा सांठा फारच मोठा असून चोहीकडे पसरलेला आहे; परंतु अज्ञानामुळे कित्येक ठिकाणीं तो वाळवी, कसर अित्यादि क्षुद्र जंतूंचे भक्ष्यस्थानीं पडलेला आजहि निदर्शनास येतो.

नारायणशास्त्री आठले

—०००—

# स्त्रियांच्या म्हणी

(५३ व्या अंकावरून पुढे)

(४५१) सारी नवरी चांग, अन् अेका डोळ्यांत वांग (वांग = व्यंग).
(४५२) जिकडे घुगऱ्या, तिकडे अुदो अुदो.
(४५३) सांगोसांगी अन् वडाला वांगीं.
(४५४) सुतासाठी मणी फोडूं नये.
(४५५) महाराची आडवणूक वेशीपाशी.
(४५६) वाकडें बोट घातल्याशिवाय तूप निघत नाही.
(४५७) आपलींच नखें आपणांस विखें होतात.
(४५८) घरचा माळी अन् सहामासीं पाणी घाली.
(४५९) खायला नाही खापर, राहायला नाही छप्पर.
(४६०) फुटका डोळा काजळाने साजरा.
(४६१) तेलीण सांठवी धारोधार, खुदा लेजा अेकच बार.
(४६२) गुंडाहि तिकडेच व गोफणहि तिकडेच (गुंडा = वाटोळा दगड).
(४६३) गोष्टींचें गुऱ्हाळ आणि पायलीचा फराळ.
(४६४) बोलण्याची बढाअी, तोंडावर चिलटांची लढाअी.
(४६५) रिकामटेकडी अन् गांवाशीं वाकडी.
(४६६) कुठले कुठे अन् अुठेअुठे भेटे.
(४६७) वेड्यांचा बाजार, जीव झाला बेजार.
(४६८) शेत धोंडाळ, बायको तोंडाळ, कणीस गोंडाळ.
(४६९) पैसा कसा मोड्डूं, मला येतें रड्डूं.
(४७०) कुत्रें भुंकलें म्हणून देअुळ विटाळत नाही.
(४७१) कधीं नाही वग, डोळे अुघडून बघ (वग = ओळखदेख).
(४७२) सतरा लुगडीं, तरी पुन्हा अुघडी.
(४७३) आपलें ठेवायचें झाकून, अन् दुसऱ्याचें पाहायचें वाकून.

नीळकंठ शंकर नवरे

अनुक्रमणिका

# वंबअसे बोल रहे हैं*

—⁓—

[लेखक– प्रो. सखाराम विनायक आपटे, अेम्.अे., बी.अेस्‌सी., अिंजिनियरिंग कॉलेज, पुणें,
व श्री. त्र्यंबक गोविन्द ढवळे, बी.अे., वेधशाळा, पुणें ]

साहित्यपत्रिकेच्या गेल्या अंकीं प्रसिद्ध झालेल्या प्रो. श्री. बा. रानडे यांच्या 'नभोवाणी आणि मराठी साहित्य' या लेखाची मराठी वाचकांकडे शिफारस करतांना या, म्हणजे 'नभोवाणी'विषयक, तात्त्विक आणि तांत्रिक स्वरूपाचे लेख वाचण्याची वाचकांना अुत्सुकता अुत्पन्न होअील अशी अपेक्षा संपादकांनी व्यक्त केली होती. पैकी तांत्रिक विभागाची, म्हणजे 'नभोवाणी'-साठी आवश्यक असणाऱ्या व्यवस्थेंत जी साधनसामग्री वापरली जाते तिच्याविषयीची, तपशील-वार माहिती करून देण्याचे कामीं 'पत्रिके'ची जागा अडवणें कदाचित् गैर ठरण्याजोगें असलें तरी देखील तांत्रिक मांडामांडीची स्थूल कल्पना आणि तिला आधारभूत अशी तात्त्विक, शास्त्रीय, बैठक सर्वसाधारण मराठी वाचकांच्या जिज्ञासापूर्तीसाठी— नव्हे जिज्ञासावृद्धी-साठीच— येथे थोडक्यांत देणें अयोग्य ठरणार नाही.

तसें करावयाचें झाल्यास आरंभींच हें सांगणें जरूर आहे की ज्या व्यवस्थेला हल्ली आपण लौकिक भाषेंत 'नभोवाणी' किंवा 'आकाशवाणी' या नांवाने ओळखूं लागलों आहोंत तिच्या शास्त्रीय स्वरूपाचा ठसा या नांवांतून बिलकूल अुमटत नाही. या दोन्ही नांवांतून जो अेक दैवीपणाचा, अलौकिकतेचा अर्थ पूर्वीच्या वाङ्मयांतून स्पष्टपणें निघत असे, तो आताच्या या व्यवस्थेला लागू नाही. 'नभोवाणी' किंवा 'आकाशवाणी' म्हणून जी हल्ली आपण अैकतों ती कांही नेहमी कोणाची तरी वाणीच असते असें नाही. भाषण-गायनादिकांप्रमाणेच वादनहि आपण अैकूं शकतों. कट्-कड-कट् सारख्या सांकेतिक खुणांच्या द्वारासुद्धा, या व्यवस्थेंत दूर अंतरावरच्या दोन व्यक्तींत विचारविनिमय होअूं शकतो. अितकेंच काय पण कानांनीं अैका-यच्या अैवजी डोळ्यांनी, दिवा लागलेला–विझलेला पाहून, संकेताने अर्थबोध घेतां येतो. कंठोद्गत वाणी हा जसा तिच्यामधला अेकच अेक अंश, प्रतीतीला येणारा प्रकार नव्हे, तसाच 'नभ' किंवा 'आकाश' हाहि तिचा मार्ग नव्हे. नभ शब्दाने केवळ, जो भाग ढगांनी व्यापला जातो तो सूचित होतो. आणि 'आकाशा'ला तर निश्चित अेकच अेक असा अर्थच आढळत

---

* विषयप्रतिपादनासाठी आवश्यक तेवढ्या परिभाषेचीच काय ती फोड लेखांत होअूं शकली. कांही शब्दांचें शास्त्रीय विवेचन लेखाचे शेवटीं अेका टिपणींत केलें आहे. अिंग्रजी परिभाषेशींच परिचय असणाऱ्यांना क्वचित् अडखळल्यासारखें झाल्यास अुपयोग व्हावा म्हणून लेखांतील सर्व पारिभाषिक शब्दांचे अिंग्रजी पर्यायहि लेखाच्या शेवटीं जोडले आहेत.

लेखांतील आकृति श्री. वि. वि. रानडे, बी.अे., अल्‌अेल्.बी., पुणें, यांच्या 'रेडिओ' या मराठी पुस्तकांतून घेअूं दिल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों. जिज्ञासूंनी तांत्रिक माहितीसाठी त्यांचें पुस्तक अेकवार अवश्य पाहावें.

नाहीं. पृथ्वीपेक्षा निराळें, चहूंबाजूंनी क्षितिजाशीं येऊन भिडणारें, काशनामुळे, म्हणजे सूर्यादिकांच्या प्रकाशामुळे आपलें निराळें अस्तित्व जाणवणारें, अेक नैसर्गिक छत या अर्थानें जसा त्याचा अुपयोग होतो, तसाच पोकळी, जेथे कांहींही नाहीं अशी जागा, हाहि अर्थ त्याने केव्हा केव्हा दाखविला जातो. 'शब्दगुणं आकाशं' हा जुना वाक्प्रचार तर प्रसिद्धच आहे. आणि शब्दप्रतीति केवळ हवेंतच होअूं शकते असें हल्लींचें शास्त्र सांगतें. हवेंतले शब्दतरंग कोस दोन कोस अंतर जाअूं शकतात. फार फारच झालें तर निवान्त वेळीं अेखाद्या मोठ्या घंटेचा नाद किंवा तोफेचा आवाज दहापांच कोसांवर अैकावयास येतो. हजारों मैलांचें अंतर तोडून जावयाची कुंवत कांही या हवेंतल्या तरंगांत असत नाहीं. तर मग हें काम होतें तरी कोणाकडून या प्रश्नाचें अुत्तर शास्त्रतःच द्यायचें झालें तर असें म्हणायला हवें की तार्‍यांतार्‍यांतलें अंतर व्यापणार्‍या आणि पदार्थमात्राच्या अणुरेणूमधली देखील मोकळी असेल ती जागा व्यापणार्‍या अवकाशांतून कांही तरंग जाअूं शकतात, त्यांच्याकडून हें काम घडतें.

पण असें कांही सांगायला लागलें म्हणजे नवखा माणूस विचकतो आणि नीटसा अर्थ त्याच्या ध्यानांत येत नाही. म्हणून मग त्याच्या समजुतीसाठी शास्त्रज्ञांना असें म्हणावें लागतें की पाण्यांतून ज्याप्रमाणे मासे, सुसरी वगैरे सुखाने संचार करतात, त्याप्रमाणे पृथ्वीचंद्रसूर्यादि गोल हे सुद्धा कशांतून तरी, पाण्याहून अतिपातळ, कल्पनेनेच केवळ जाणतां येअील अितक्या विरळ, अशा अेखाद्या माध्यमांतून जात आहेत असें आपण मानूं. चंद्रसूर्यादिकांची अुष्णप्रकाशादि तेजें आपल्याकडे येतात, ती या माध्यमांतूनच येतात अितकेंच काय, पण तुम्ही आम्ही राहतों ते सुद्धा या माध्यमांतच डुंबत असतों असें समजूं. हीं जीं तेजें आपल्याकडे येतात तीं कितीतरी मोठ्या वेगाने— सेकंदाला १,८६,००० मैलांच्या वेगाने, सूर्यापासून पृथ्वीपर्यंत येअून पोहोंचावयाला प्रकाशाला सुमारें ८ मिनिटें लागावींत अितक्या वेगाने— येत असतात. अशा माध्यमाला 'संवह'—अुष्णप्रकाशादि तेजांना सहज आपल्यामधून वाहूं देणारें— आणि त्याच्यांतून येणारा संदेश तो 'सांवाहिक संदेश' असें 'नभोवाणी'ला शास्त्रशुद्ध दृष्ट्या म्हणतां येअील.

मराठींत 'सांवाहिक संदेश' म्हणा किंवा अिंग्रजींत 'रेडिओ कम्युनिकेशन', 'रेडिओ टेलिफोनी' अशांतलें कांही म्हणा, या व्यवस्थेंतलें, नेहमीच्या सरावाने, जें दृश्य आपल्या डोळ्यांसमोर चटकन् अुभें राहतें तें केवळ, अेकाने कोठून तरी मुंबअी, कलकत्ता, लखनौ अशासारख्या ठिकाणाहून बोलायचें आणि हजारों ठिकाणच्या हजारों जणांनी आपापल्या घरीं विवक्षित पेटींतून तें अैकावयाचें अशा तर्‍हेचें असतें. पण हें कांही 'रेडिओ'चें खरेंखुरें, पूर्ण, स्वरूप नव्हे. लोकोपयोगीच खरी, पण ती अेक शिक्षण-मतप्रचार-मनोरंजनादिकांच्या दृष्टीने राजनियंत्रित अशी व्यवस्था आहे. जागेचें बंधन तुमच्या-माझ्यावर न घालतां 'अैका अैका जगांतल्या समानधर्म्यांनो, माझ्याशीं बोला' असें जगाला घरबसल्या पाचारण करण्याची आणि असा अेखादा समानधर्मा कांही अुत्तर देतो कीं काय हें पाहण्याची सोय मला जशी नेहमी माझ्या हाताशीं हवी, तशीच ती तुम्हांला कांचन-गंगेचीं दर्‍याखोरीं तुम्ही तुडवीत असतांना देखील, माझ्या समानधर्मित्वाची हाक अैकायची आणि अुलट तेथून हिमालयाची निसर्गशोभा तुमच्या समानधर्म्यांना अैकविण्याची सोय तुमच्या हाताशीं हवी. याचें नांव 'रेडिओ कम्युनिकेशन'. आपण याला सांवाहिक समनुयोग— संवाहाच्या द्वारा अेकमेकांनी अेकमेकांचें क्षेमकुशल विचारण्याची, बातचीत करण्याची व्यवस्था— असें म्हणूं. अशी सोय हल्ली बहुतेक जहाजांना आणि आकाशयानांना असते. प्रत्येक देशाच्या सरकाराजवळ ती खास अुपयोगासाठी असते. व्यापारी दृष्ट्यासुद्धा तिचा अुपयोग केला जातो. पण हा फार खर्चाचा प्रकार

असल्यामुळे आपल्यापैकी बहुतेकांचा याच्याशीं संबंध येत नाही.

दूर अंतरावरच्या लोकांशीं बोलावयाची ही व्यवस्था व्यापारी स्वरूपाची असो किंवा सरकारी स्वरूपाची असो, त्यांतील भाषण, तारेचा किंवा अितर कोणत्याहि दृश्य माध्यमाचा आश्रय न घेतां, अितक्या अंतरावर अैकावयाला कसें जातें हें समजण्यासाठी आपण अेक अुदाहरण घेअूं. समजा, अेक अत्यंत विस्तीर्णसा तलाव असून त्याच्या मध्यावर अेक नावाडी नावेंत बसला आहे. सकाळची वेळ असल्यामुळे वारा अितका निश्चल आहे की तलावाच्या निळसर काळया पाण्याअैवजी अेक अखंड आणि विस्तीर्ण संगमरवरी फरशीच नावेसभोंवार घातल्याचा भास निर्माण झाला आहे. दूर अंतरावर, तलावाच्या कांठीं, कोणी तरी पाण्यांत पाय सोडून बसलेलें असून कांही कारणामुळे नावाड्याला या तीरस्थ व्यक्तीचें लक्ष्य आपल्याकडे वेधायचें आहे. नावाड्याने आपल्या डोकीचा रुमाल सोडला आणि वर अुंच हवेंत फडफडावला, पण लक्ष वेधलें गेलें नाही. नावाडी मनांत समजला की अेवढ्या विस्तीर्ण तलावाच्या मध्यावर अेकुलत्या अेका नावेंतून कांही तरी फडफडतें आहे, हें ध्यानांत न येणारें माणूस अंतर्व्यग्र तरी असलें पाहिजे किंवा आंधळें तरी असलें पाहिजे. म्हणून त्याने खूप मोठ्याने ओरडून पाहिलें, पण तरीहि कांही अुपयोग झाला नाही. अखेरीला त्याने नावेचें वल्हें सोडविलें आणि तें हातांत घेअून पाण्याच्या पृष्ठभागावर खूप जोरजोराने घोपटायला सुरवात केली. त्यामुळे तलावाच्या पृष्ठभागावर तरंगापाठोपाठ तरंग निर्माण झाले, ते सभोंवार जात जात त्या तीरस्थाच्या पायाला जाअून लागले, आणि तेवढ्यावरून त्यानेहि जाणलें की हा वेळपर्यंत स्थंथ असणाऱ्या पाण्यावर, वाऱ्याच्या अभावीं, अेवढे तरंग निर्माण झाले त्या अर्थी पाण्यांत मोठेंच कांहीतरी पडलें आहे किंवा पडत असावें. अर्थातच हें सांगायला जितका वेळ लागला त्याच्यापेक्षा किती तरी झटकन् त्या माणसाला हें ज्ञान झाल्यामुळे तो दचकला आणि त्याने आपले पाय चटकन काढून घेतले. यापुढे काय झालें त्याच्याशीं आपल्याला कांहीच कर्तव्य नाही. अैकावयास येणारे शब्द किंवा डोळयांनी दिसणाऱ्या खुणा यांच्या अभावीं देखील, नुसतें त्या माणसाचें लक्ष्य वेधण्यापुरतेंच का होअीना, दूरवरपर्यंत केवळ तरंगद्वारा संदेशवाहन कसें होअूं शकलें ही अेकच घटना काय ती आपल्याला येथे ध्यानांत घ्यावयाची आहे.

आता हा तलाव आपण कल्पनेने थोडा विस्तीर्ण करूं. तलावांतलें पाणी काढून टाकून त्या ठिकाणीं 'संवह' भरूं. डाव्या हाताने नावाड्याला मागे रेटीत रेटीत मुंबअींत नेअूं. तेथे त्याला नावेअैवजी अेका अिमारतींत बसवूं. त्याचा ग्रामीण पोषाख काढून घेअून त्याला बिनतारी कारागीर किंवा वायरलेस ऑपरेटर बनवून टाकूं आणि आपण पुन्हा आपल्या जागीं येअूं. म्हणजे मग त्या कारागिराने मुंबअींतल्या संवहांत कसल्या तरी अेखाद्या साधनाच्या द्वारा खूप मोठमोठ्याने ढवळायला सुरवात केली तर तेथे जे सांवाहिक तरंग निर्माण होतील ते संवहांतच असणाऱ्या तुमच्या-आमच्यापर्यंत दूर अंतरावर कसे येअून पोंहोंचत असतील हें कल्पनेने दृष्टीसमोर आणावयास विशेषसें कठीण जाअूं नये.

यावर तुम्ही म्हणाल, "कबूल. संवहांतले तरंग आमच्यापर्यंत येत असतील हें मान्य. पण मग काय हो, मघाच्या अुदाहरणांत तो जो तलावाच्या काठचा म्हणून मनुष्य सांगितलात, त्याने आपले पाय त्या पाण्यांत बुडवले होते म्हणून त्याच्या पायाला ते तरंग येअून लागले आणि स्पर्शद्वारा त्याला कांही तरी संवेदना मिळाली. तुम्ही आम्ही तर सपशेलच संवहांत बुडालों आहोंत म्हणतां. मग काय, आपल्याला मुंबअींतलें जें गायनवादन अैकायला येतें तें काय असें स्पर्शज्ञानाने मिळतें म्हणतां ? आणि दुसरें असें की तुमच्या त्या पाण्या-

काठच्या माणसाला जो संदेश मिळाला तो तर अनिश्चित स्वरूपाचा होता, म्हणजे पाण्यांत कांहीतरी पडलें आहे, पडत आहे, असा होता; पण आपण जें गाणें वगैरे अैकतों तें असें 'कांही तरी घडतें आहे' अशा स्वरूपाचें कोठे असतें ! निश्चितच मुळी मुंबअींत जें बोललें जातें तें अगदी यथाभूत आपण अेकतों हें कसें !"

यांतल्या पहिल्या प्रश्नाला अुत्तर असें की, होय; मुंबअींतलें गायनवादन वगैरे जें आपण अैकतों तो अेक स्पर्शज्ञानाचाच प्रकार असतो. कारण खरें पाहिलें तर कानांनी आपण अैकतों याचा अर्थच मुळी असा की बाहेरच्या हवेंतले विशिष्ट तरंग आपल्या कानांतल्या पडद्यावर आपटल्यावरच तेथून आपल्याला ध्वनिसंवेदना मिळते. पण हा शब्दच्छल बाजूला ठेवला तरी देखील दुसऱ्याहि अेका दृष्टीने ती स्पर्शसंवेदनाच म्हणतां येअील. हा स्पर्श अेका हाताला होतो. मात्र तो हात तुमच्या-आमच्या हातासारखा अस्थिचर्माचा नसून केवळ तो अेका आडव्या अुभ्या तारेचा असतो, आणि ती तार बांबूच्या दोन काठ्यांना बांधून गुढीसारखी आपण आपल्या घरावर अुभारून ठेवलेली असते. आकाशाकडे हा हात अुंच, वर, केलेला असतो म्हणून त्याला आपण 'आकाशीय' म्हणूं. किंवा त्या तारेच्या द्वारा ठिकठिकाणच्या कार्यक्रमांचें आकलन होतें म्हणून या व्यवस्थेला 'आकलनी' म्हणूं तिचा आणि आपल्या घरच्या 'रेडिओ सेट' चा संबंध जोडून दिलेला असल्यामुळे या 'रेडिओ'चाच तो अेक हात झाला. तद्द्वारा आपण तो तो कार्यक्रम अैकूं शकतों. हें तरी कसें काय घडतें ! असाच वरच्या परिच्छेदांतला दुसरा प्रश्न होता.

त्याच्याकडे वळण्यासाठी म्हणून घटकाभर असें मानूं की आकाशयानांत बसून आपण खूप अुंच गेलों असून तेथून दुर्बिणीच्या द्वारा खाली नजर फेकल्यावर घरांतल्या देखील घडा-मोडी दिसायची सोय आपल्या कामापुरती झाली आहे. असें खाली पाहूं लागल्यावर अेका बाजूला मुंबअींतली, किंवा अितर कुठलीहि, बिनतारी व्यवस्था आणि दुसऱ्या बाजूला पुण्यांतल्या अेखाद्या अिमारतीवरचा 'आकाशीय' हात, त्याच्याच खाली रोवलेला 'भूमिगत' पाय, आणि त्या दोहोंना सांधून राहिलेला रेडिओ सेटचा देह, अेवढें आपल्याला दिसत आहे. मधलें अंतर अर्थातच केवळ संवहाने व्यापलेलें आहे. आता दुर्बिणीची कक्षा आपण थोडीशी वाढवूं आणि बिनतारी परिक्षेपणाच्या व्यवस्थेवर दृष्टि स्थिरावूं. तेथे पुढील पानावरील चित्रांत दाखवलेलीं पांचहि अंगें आपल्या दृष्टीस पडतील. आकृतींतील (१) या ठिकाणीं अेक गायिका गावयास बसलेली दाखविली आहे. गाण्याबजावण्याअैवजी अेखादा वक्ता सुद्धा तेथे भाषण करूं शकेल. या जागेला आपण कलास्थान म्हणूं. कलास्थानांत, गायिकेच्या जवळच, अेका अुभ्या दंडावर बसवलेलें अेक कृत्रिम 'श्रोत्र' दाखविलें आहे. त्याचा संबंध अेका विजेच्या सरणीच्या द्वारा (२) मधील संस्करणालयांतून (४) मध्ये दाखविलेल्या स्थळीं आणून जोडलेला आहे. 'श्रोत्र' हा या व्यवस्थेतला अेक महत्त्वाचा भाग आहे. अशीं 'श्रोत्रें' केवळ सांवाहिक संदेशासाठीच वापरलीं जातात असें नाही तर अेखाद्या मोठ्या सभेंत देखील वक्त्यासमोर 'श्रोत्र' आणि भाषण अैकणाऱ्या जनसमुदायांत जरूरीप्रमाणे चारदोन ठिकाणीं 'महावक्त्रें' टांगलेलीं आपण पाहतों. आता ही जी कलास्थानांतली गायिका म्हणून सांगितली ती गाअूं लागली म्हणजे तिच्या शब्दन् शब्दांमुळे आणि आलापादिकांतल्या अगदी लहानश्या बारकाव्याने देखील निर्माण झालेले तरंग भोंवतालच्या हवेंतून वाहूं लागतात. ते त्या श्रोत्राच्या चकतीवर बाहेरून आदळतांक्षणींच या प्रत्येक तरंगाबरहुकूम श्रोत्रामागच्या विजेच्या सरणींतून वैजिक तरंग किंवा विजेचे तरंग निर्माण होअून ते त्या सरणींतून वाहूं लागतात. निराळ्या शब्दांत सांगायचें झाल्यास असें म्हणतां

येअील की हवेंतल्या शब्दतरंगांचें परिभावन किंवा रूपान्तर श्रोत्राच्या द्वारा विजेच्या तरंगांत होतें. कलास्थानांतल्या गायकाच्या किंवा वक्त्याच्या निरनिराळ्या बाजूंना 'श्रोत्रें' ठेवून त्यांच्यांतून येणारे









वैजिक तरंग (२) येथे दाखवलेल्या संस्करणालयांत अेकत्रित केल्यावर कांही संस्कारांनंतर ते (४) मधील साधनांत आणून सोडले जातात. हे जे 'वैजिक तरंग' म्हणून सांगितले ते स्वतः अतिशय दुबळे असल्यामुळे दूर अंतराचा पल्ला गांठण्याची कुवत त्यांच्या अंगीं असत नाही म्हणून, (३) येथे दाखवलेल्या वैजिक सरणींत तडाखेबंद खूप. झपाटदार, किंवा 'महाक्षिप्रते'चे तरंग निर्माण करून त्यांच्यावर (४) येथे त्या दुबळ्या तरंगांचें आरोपण केलें जातें आणि मग ते (५) येथे दाखवलेलें आकाशीय आणि त्याच्याखालचा भूभाग या दोहोंच्या दरम्यान खूप जोरजोराने अुसळ्या देअून चहूंवार 'परिक्षेपित' केले जातात. हेच ते सांवाहिक तरंग. परिक्षेपण किंवा ब्रॉडकास्टिंग म्हणजे दशदिशांना मुक्तहस्ताने फेकून देणें. चित्रांत दाखवलेल्या (२) ते (५) या संकलित व्यवस्थेने विजेचे तरंग संवहांत फेकले जातात म्हणून ती व्यवस्था ज्या ठिकाणीं असते त्याला प्रेषास्थान आणि ते (४) मधील ज्या साधनसंभारांतून बाहेर पडतात त्याला प्रेषणी म्हणावयाचें ठरविल्यास आपल्या घरीं ते जेथे येतात त्याला ग्रहणस्थान आणि ज्या पेटींकडून त्यांचें ग्रहण केलें जातें तिला 'ग्रहणी' असें सुटसुटीतपणें म्हणतां येअील.

प्रेषास्थानाकडून नजर काढून ती ग्रहणस्थानाकडे वळल्यास तेथे अुभारलेल्या आकाशीयाचा संबंध अेका तारेने ग्रहणीशीं जोडलेला आढळेल. ग्रहणींतून निघालेली दुसरी अेक तार जमिनीशीं नेअून पोंचविली असून तिसऱ्या तारेच्या द्वारा तिचा सांधा घरांतून खेळविल्या जाणाऱ्या विजेच्या तारेशीं जोडण्याची सोय आढळेल. ग्रहणीच्या पोटांत द्वारकें, निर्बंधनी, रोधनी आणि धारणी अशा चार वैजिक साधनांची अेकमेकांशीं जुळणी केलेली आढळेल. ग्रहणीच्या बाहेरच्या अंगाला चारपांच खुंट्या आढळतील.

सबंध चित्र नजरेसमोर आणावयाच्या सोयीसाठी म्हणून या दोन्ही व्यवस्था अेकापाठोपाठ अेक सांगितल्या. मध्यंतरींच्या प्रवासाची कल्पना नीट यावी म्हणून आता आपण प्रेषास्थानाहून निघालेल्या अेखाद्या सांवाहिक तरंगाकडे थोडेंसें लक्ष देअूं. या तरंगांचें स्वरूप ध्यानांत यावयास त्यांची 'क्षिप्रता' म्हणजे काय याची थोडीशी कल्पना हवी. म्हणून अेक अुदाहरण घेअूं. समजा, लहानपणचे आपले स्नेही 'अिसाप' आणि 'विष्णुशर्मा' हे दोघेहि कांही करमणुकीसाठी भूतलावर अवतरले असून त्यांनी अेका माळरानांत अेक ससा आणि अेक कासव अुभें केलें आहे. त्यांच्याजवळ विष्णुशर्मा अुभा आहे. चाळीस मैलांवर अिसाप अुभा आहे. कासवाच्या आणि सशाच्या पाठीवर अेकेक ग्रामोफोन बांधला असून दोहोंवर अेकाच क्षणाला अेकच प्लेट सुरू केली आहे. दोघेहि जीव बिचकले असून ग्रामोफोनपासून सुटका करून घेण्यासाठी धावावयास सुरवात करणार तोंच विष्णुशर्म्यांने त्यांच्या कानांत सांगितलें आहे की कितीहि जोराने धावा, जमिनीशीं लोळण घ्या, किंवा अस्मानांत अुड्डाणें घ्या, चाळीस मैलांवरच्या अिसापाला गांठण्याखेरीज सुटका नाही आणि वाटेल तितकी धूम ठोका अगर नका ठोकूं, तुम्हां दोघांनाहि अिसापला गांठायला वेळ लागणार. तो दोघांनाहि अेकसारखाच, अेका तासाचा. पण असें कोणीं कितीहि कांही सांगितलें म्हणून बिचाऱ्यांचा जातिस्वभाव कसा जाअील ! हे दोघेहि जीव धावायवास सुरवात करणार न करणार तोंच गोष्टींतील तात्पर्य मनावर बिंबावें म्हणून, अिसापने तुम्हांआम्हांला किडामुंगी बनवलें असून सगळ्या माळभर आपली पसरणूक केली आहे. आणि अशी लालूच दाखविली आहे की या दोन्ही जीवांचे पाय तुमच्या-आमच्या अंगावर पडले तर आपल्याला प्रत्यक्ष ते जाणवणार तर नाहीतच पण अुलट फायदा मात्र असा की ज्या ज्या वेळीं म्हणून त्यांचे पाय आपल्याला लागतील त्या त्या वेळींच काय तें आपल्याला ग्रामोफोनचें संगीत अैकायला मिळेल. अिसाप मिस्कीलपणाने डोळे मिचकावीत विचारूं लागला आहे की बोला, काय हवें तुम्हांला, ससा कीं कासव !

यावर कोणी म्हणेल की अेवीतेवी दोघेहि जीव अेकाच वेळीं पोचणार, मग घाणेरडें कासव हवें कशाला ! सशाच बरा. आणि असें आपण म्हणालों तरच अिसापलाहि झालें तरी, हिरिरीने तात्पर्य सांगायला अवसर मिळणार. तो म्हणेल, विसाव्या शतकांतल्या मुलांनो, चुकलांत तुम्ही. कासवच चांगलें. कारण असें पाहा की दोघांचेहि जातिस्वभाव कांही हिरावून घेतले नाहीत. तेव्हा ससा टणाटण उड्या मारीत धावणार, कासव तुरुतुरु पळणार. दोघांचाहि अंतिम वेग अेकच. चाळीस मैलांचा. म्हणून सशाची बरोबरी करायला कासवाला पाअूल उचललें पाहिजे तें कितीतरी झपाझप. त्यामुळे तुम्ही कोठेहि असलांत तरी तुमच्याजवळ संगीत येअून पोचायचा संभव कासवाकडून जास्ती. आता अेवढी गोष्ट खरी की मुक्कामाला जाअीपर्यंत कासव थकेल जास्त, म्हणून त्याला ब्रँडीब्रिडी घालावी लागेल जास्त. पण तो पुढचा प्रश्न आहे.

सशाच्या अुडींतली झेप मोठी, पाअूल अुचलण्याचा झपाटा लहान. कासवाची झेप लहान, झपाटा मोठा. परिभाषा वापरायची झाल्यास असें म्हणतां येअील की सशाच्या अुडीचा आयाम मोठा, पाय अुचलायची क्षिप्रता लहान. कासवाचा आयाम लहान, क्षिप्रता मोठी. कपडे शिवायच्या यंत्रावर कपड्याला टीप घालायला बसलें, म्हणजे जेव्हा टीप लांब लांब पडते तेव्हा तिचा आयाम मोठा, सुअीची क्षिप्रता लहान. टीप जेव्हा जवळ जवळ पडते तेव्हा तिचा आयाम लहान, क्षिप्रता मोठी. हाच संबंध सांवाहिक तरंगांनाहि लागू.

आयाम आणि क्षिप्रतेच्या दृष्टीने सांवाहिक तरंगाचे तीन प्रकार कल्पिले आहेत, (१) लघुक्षिप्रतेचे किंवा महाआयामाचे; (२) मध्यमक्षिप्रतेचे किंवा मध्यम आयामाचे; आणि (३) महाक्षिप्रतेचे किंवा लघु-आयामाचे. पहिल्या प्रकारचे तरंग लवकर क्षीण होतात. त्यामुळे दूर अंतरावर संदेश पाठवायला त्यांचा अुपयोग होत नाही. अुलट महाक्षिप्रतेचे तरंग दूरवर जातात. म्हणून लहान क्षेत्रापुरताच कार्यक्रम असेल तेव्हा लघुक्षिप्रतेचे तरंग, आणि दूरवरपर्यंत तो पोंचवावयाचा असेल तेव्हा महाक्षिप्रतेचे तरंग अुपयोजिले जातात.

मुंबअीचें भाषण, दिल्लीचें गाणें, लाहोरचें अितिवृत्त, मद्रासचें सतारवादन आणि अितर शेकडों ठिकाणचे अशाच तऱ्हेचे कार्यक्रम त्या त्या ठिकाणाहून सगळीकडे परिक्षेपित केले जात असल्यामुळे, आणि हे सर्व कार्यक्रम अेकसारखे आपल्या भोंवतालच्या संवहांतून तरंग-रूपाने जात असल्यामुळे या सर्व संवहांत अेकप्रकारें, माधळीबाजाराचा गजबजाट आणि कोलाहल माजून राहिलेला असतो. तो अैकावयास येत नाही हे आपलें भाग्यच म्हणायचें! पांचचार युरोपियनांच्या लहानशा समूहांत आपण असलों तरी देखील थॉमस हॅरिसनचा आवाज कोणता आणि हॅरी थॉमसनचा कोणता, हें, ते पाठमोरे असतांना तरी निदान, चटकन् सांगायला कठीणच जातें. मग या सर्व सांवाहिक कोलाहलांतून दिल्ली कोणती आणि मुंबअी कोणती हें निवडून सांगणें अेरव्ही अगदी अशक्यच झालें असतें. अेवढ्याचसाठीं, शर्यतींतले घोडे ओळखायला म्हणून जसे त्यांना निरनिराळे क्रमांक दिले जातात तसेच निरनिराळ्या प्रेषास्थानांना त्यांचा त्यांचा म्हणून कांहीतरी क्षिप्रतेचा अंक दिला जातो. शर्यतींतील घोडे दूर अंतरावरून पळत असलेले आपण पाहूं शकतों, त्यामुळे त्याच्या त्याच्या क्रमांकावरून 'टिपू सुलतान' कोणता आणि 'गोल्डन लिंक' कोणती हें सांगूं शकतों. पण हे सांवाहिक तरंग कांही आपापल्या पाठीवरून असे क्रमांकांचे शिक्के बांधून जात नाहीत. म्हणून, त्यांचा अेकमेकांपासूनचा अलगपणा राखण्यासाठी आणि ओळखण्याठी जी सोय केली जाते ती अेखाद्या लौकिक अुदाहरणाने समजावून घ्यायचा प्रयत्न करूं.

शर्यतींतले घोडे जसे अेकाच जातीचे प्राणी, तशीच या तरंगांची जात देखील, 'सांवाहिक' ही अेकच. म्हणून शर्यतींतलेच चार घोडे डोळ्यांसमोर आणूं. आता समजा, यांतल्या अेकांतच काय तो घोड्याचा आत्मा शिल्लक ठेवला आहे. बाकीचे तीन देहाने जरी घोडे असले तरी त्यांच्यांत अनुक्रमें कासव, ससा आणि चित्ता यांचे आत्मे, आणि तदनुसारी गुणधर्म घातले असून ओळखायसाठी म्हणून त्यांना घोडा, कासव, ससा, चित्ता, अशींच नांवें दिलीं आहेत. मागे ससा-कासव यांच्या शर्यतींत बंधन होतें तसेंच येथेहि सगळ्यांचा वेग ताशीं चाळीस मैलांचा असें ठरवून चौघांनाहि आता धावावयास सोडूं. म्हणजे मग चित्ता, घोडा, ससा आणि कासव हीं अनुक्रमें पहिल्याहून दुसरा, दुसऱ्याहून तिसरा, अशीं वाढत्या क्षिप्रतेने धावत असलेलीं आढळतील. येथे चौघांचीहि बाह्यदेहाकृति सारखीच. पण त्यांतला कोणता कोण; हें त्याच्या चालीवरून ओळखतां आलें. आता समजा, कासवाच्या पाठीवर वक्ता, सशावर गवअी, घोड्यावर वृत्तसंपादक, चित्त्यावर सनअीवाला, अशा स्वाऱ्या भरल्या आणि खुराड्यां-तून कबुतरें अुडवावींत त्याप्रमाणे मुंबअीहून कासवेंच कासवें, दिल्लीहून ससे, लाहोरहून घोडीं, मद्रासहून चित्ते सगळीकडे भराभर फेकून दिलीं, तर मग केवळ त्यांच्या गतींतील क्षिप्रतेची माहिती असल्यास तो तो प्राणी ओळखून काढून त्याच्या पाठीवरची स्वारी अुतरून घेणें कठीण पडूं नये. थेट असाच प्रकार सांवाहिक तरंगाच्या बाबतींतहि होतो.

संवहांतून हे तरंग सगळीकडे धावत असतांना ते सर्व आपल्या घरच्या आकाशीयावर

आदळून पुढे जात असतात आणि त्याच्याकडूनहि त्यांचें निःपक्षपातीपणाने आकलन केलें जात असतें. आपण जेव्हा आपल्या घरांतील ग्रहणपेटिकेसमोर बसून तिचा अेक हात विजेच्या प्रवाहाशीं जोडून देतों आणि पेटीची अेक खुंटी पिरगळतों तेव्हा खट् असा आवाज होतो. आणि पेटींत ' ओज ' शिरूं लागलें, तिला जरूर असलेलें विद्युत्प्रवाहाचें अन्न मिळूं लागलें, अशी सूचना मिळते. दुसरी खुंटी पिरगळून जेव्हा आपण मुंबअीच्या क्षिप्रतेच्या अंकावर पेटींत दिसणारें सूच्यग्र आणतों तेव्हा घराबाहेर जमलेल्या गर्दींतून आपल्याला हवें असलेलें माणूसच तेवढें दिंडीदरवाजाने आंत घ्यावें तसा प्रकार होतो. शकूनभागून आलेल्या पाहुण्याला पाय धुवावयास पाणी, प्यावयास गरमगरम चहा दिला म्हणजे तो जसा प्रफुल्लित होअून बोलूं लागतो तसाच प्रकार पेटींत शिरलेल्या तरंगाच्या बाबतींत होतो. पेटींत मांडलेल्या निरनिराळ्या सरणींतून ते जातात तेव्हा त्यांचें विवर्धन व्हावें, वैजिक स्वरूपांतून श्राव्य स्वरूपांत त्यांचें अुपार्जन व्हावें, आणि पेटींतल्या महावक्त्राच्या द्वारा तें आपल्याला अैकायला मिळावें अशी अेकंदरींत ग्रहणींत सोय असते.

"बंबअीसे बोल रहे हैं" हे शब्द मुंबअीच्या 'श्रोत्रां'त अुच्चारले असतां पुण्याच्या महावक्त्राकडून ते आपल्याला अेकवले जातात ते हे असे.

## परिशिष्ट १

### लेखांत आलेल्या पारिभाषिक शब्दांचे अिंग्रजी पर्याय

अवकाश Space.
आकाश Sky.
आकाशीय Antenna ; Aerial.
आयाम Length; तरंगायाम Wavelength.
अुपार्जन Detection; Demodulation.
कलास्थान (सांवाहिक) Broadcasting studio.
क्षिप्रता Frequency.
लघु-मध्यम-महा low-medium-high.
ग्रहणस्थान Receiving station.
ग्रहणी; सांवाहिक ग्रहणी Receiver; Receiving set.
चकती (श्रोत्राची) Diaphragm.
द्वारक Valve.
धारणी Condenser.
निर्वंधनी Inductor; Induotunce, Coil.
परिक्षेपण Broadcasting.
प्रेषणी Transmitting set; Transmitter.
प्रेषास्थान Transmitting station.
भूगत; भूमिगत Earth; Ground.
महावक्त्र Loud-speaker.
रोधनी Resister.
विवर्धन Amplification.
विवेचन Selection.
वैजिक सरणी Electric circuit.
श्रोत्र (Mike) Microphone.
संवह Aether.
– तरंग Aether vibrations; Aether waves.
सांवाहिक समनुयोग / बिनतारी संदेश } Redio (wireless) communication.

## परिशिष्ट २

### लेखांतील कांही प्रमुख पारिभाषिक शब्दांची शास्त्रीय अर्थव्याप्ति

अवकाश— पोकळी, जिला वस्तु (matter) व्यापूं शकते ती.

आकाश — 'भुअी'कडे आणि 'आकाशा'कडे या जोडीने अेकमेकांविरुद्ध दोन दिशा दाखविल्या जातात. आभाळाकडे वर पाहिलें असतां आसमन्तात् प्रकाशमान असें जें छत पसरलेलें दिसतें तें.

अनुक्रमणिका

संवह— हवेंतून शब्दसंचरण (किंवा ध्वनसंचरण) विपळागणिक ११०० फूट अितक्या वेगाने होतें हें सर्वविश्रुत आहे. पाण्यांतून ध्वनसंचरण याच्या चौपट वेगाने होतें. ध्वनसंचरण नुसत्या पोकळींतून– रिक्तांतून, *in vacuo* होअूं शकत नाही हें प्रयोगसिद्ध आहे.

नुसत्या पोकळींतून अुष्ण-प्रकाशादि तेजें मात्र सहज संचरण करूं शकतात हें प्रसिद्ध आहे. या अुष्मप्रकाशादि शब्दांत बिनतारी तरंगरूपी तेजाचा अन्तर्भाव होतो. हीं सर्व तेजें ज्या वेगाने संचरण पावतात तो ज्यौतिष आणि पार्थिव, दोन्ही प्रमाणांनी (प्रयोगादींनी), सिद्ध करतां येतो. तो विपळागणिक १८६००० मैल– २०० *प्रयुतचरण– अितका असतो. हीं तेजें केवळ अवकाशांतून संचरण पावत नसून जातांना त्यांना विपळागणिक १८६००० मैल अितक्या वेगाने आपल्यामधून संचरण करूं देणारें असें कांही तरी वहित्र (medium) सर्व अवकाश व्यापून राहिलें आहे असें मानणें बहुधा सोयिस्कर वाटतें. तेव्हा, अुष्मप्रकाशादि तेजें वि. ग. मै. १८६००० अितक्या वेगाने ज्यामधून संचरण करूं शकतील असें जें वहित्र तें संवह किंवा aether.

तरंग— सांवाहिक तरंग, पर्यय, क्षिप्रता, आयाम. तरंगरूप संचरणामध्ये अुपरिनिर्दिष्ट वेगाशिवाय आणखी अेक विशेष गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची ती ही की अमुक ठिकाणामधून तरंगाचें संचरण होत आहे हें म्हणण्याचा अर्थ असा– त्या ठिकाणीं कांही अेका प्रेरकाचा (force) प्रादुर्भाव होत असून तो सारखा पर्ययशील असतो, म्हणजेच या प्रेरकाला दिशा आणि मान हीं लक्षणें असून तीं सारखीं बदलत असतात. प्रेरकाचें मान शून्यापासून वाढत वाढत परमत्वाला जातें, पुन्हा कमी कमी होत जाअून शून्यावर येतें. तेथून त्या प्रेरकाची दिशा अुलटी होअून मान पुनरपि वाढत परमत्वाला पोचलें की पुन्हा कमी होत शून्यत्वाला येतें. विवक्षित स्थळीं अितका हा खेळ झाला म्हणजे अेक पर्यय (cycle) पुरा झाला. असे पर्यय पुनः पुनः होत राहणें यालाच म्हणावयाचें पर्ययशील असणें. अेका पर्ययाला लागणारा जो काल तितकाच दुसऱ्याला, तितकाच तिसऱ्याला, याप्रमाणे अेकसारखा अेक असे सहस्रावधि लक्षावधि पर्यय होत असतात.

संवहामधून विपळागणिक १,८६,००० मैल अितक्या वेगाने संचरण करूं शकणारे तरंग ते सांवाहिक तरंग. मग ते आपल्याला अुष्मरूपाने प्रतीत होवोत, किंवा प्रकाशरूपाने प्रतीत होवोत, किंवा बिनतारी ग्रहणीने ग्राह्य अशा प्रकारचे असोत, या सर्वांचा संचरणवेग समान असून त्यांचे प्रकार मात्र अनेक होतात ते भिन्न पर्ययकालामुळे. अेका पर्ययाला लागणारा काल जितका थोडा तितका पर्यय करण्याचा झपाटा अधिक. यालाच क्षिप्रता अधिक असें म्हणतात. अर्थात् विपळागणिक जितके अधिक पर्यय घडत असतील तितकी क्षिप्रता अधिक. म्हणजे विपळागणिक घडणारी पर्ययसंख्या हेंच क्षिप्रतेचें मान होय. सांवाहिक तरंगांतील विभिन्नतेचें लक्षण क्षिप्रता हेंच होय.

आता दुसऱ्या अेका दृष्टीने या तरंगांकडे पाहावयास हवें. अेकाच स्थळीं कालाच्या ओघांत काय काय घडत आहे असें पाहिलें तर अेकामागून अेक विशिष्ट क्षिप्रतेचे (झपाट्याचे) पर्यय घडत आहेत असा देखावा मनश्चक्षूला दिसतो. पण अेकाच क्षणीं किरणरेषेवर काय

* वरील विवेचनांत 'प्रयुत' हा शब्द Million या अर्थी वापरला आहे तो भास्कराचार्यांच्या लीलावतींतील असून तो पुन्हा सर्वत्र उपयोगांत आणण्यालायक आहे.

चरण = मीटर.

देखावा दिसतो असें पाहिलें तर निरनिराळ्या अवस्थांचा अेक संच, पुन्हा तसाच अेक संच, पुन्हा तसाच, असें होत होत १८६००० मैलांचा अेक किरण ज्ञानचक्षूने पाहिला असतां अेवढ्या टापूंत जितके अेकसारखे संच दिसतात तितकेच पर्यय मघाच्या देखाव्यांत अेका विपळांत होत होते. आता भिन्न भिन्न अवस्थांचा जो अेक संच म्हटला त्यांच्याच अेका विस्ताराला 'तरंगाचा आयाम' असें म्हणतात. १८६,००० मैल लांब किरणतन्तूला जर अेक 'संचर' असें म्हटलें तर त्यांत तितकेच आयाम, कीं जितके पर्यय अेका विपळांत त्या पहिल्या देखाव्यांत होत होते. असा दुहेरी देखावा चांगला पाहतां येअूं लागणें अवश्य आहे; अेक स्थानबद्ध, दुसरा क्षणबद्ध.

सूत्रबद्ध सांगायचें झाल्यास विपळागणिक कोणत्याहि अेका विवक्षित ठिकाणीं होणारे पर्यय म्हणजे क्षिप्रता. आयाम (तरंगायाम) म्हणजे अेका पर्ययकालांत आक्रमिलेलें अंतर.

वेग = क्षिप्रता X आयाम. [तरंगस्यहि वेगः स्यादायामक्षिप्रता गुणः ।]

---

# संलग्नसंस्थावृत्त

## वाङ्मयोपासक मंडळ, अहमदनगर

### वार्षिक सभा

नगर वाङ्मयोपासक मंडळाची सर्वसाधारण वार्षिक सभा बुधवार दिनाङ्क २७।३।४० रोजीं सायंकाळीं ५ वाजतां रा. ब. देशमुख ह्यांच्या अध्यक्षतेखालीं देशमुख दिवाणखान्यांत भरली होती.

अहवाल व ताळेबंद मंजूर झाल्यावर १९४० करता खालीलप्रमाणे कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें.

अध्यक्ष— रा. ब. न. बा. देशमुख. उपाध्यक्ष— १ सरदार नानासाहेब मिरीकर, २ ले. कर्नल प. कृ. चितळे. चिटणीस— श्री. द. वा. डावरे, श्री. प. प. पटवर्धन.

कार्याध्यक्ष— श्री. ग. कृ. फाटक, अेम्. अे., बी. टी.

कार्यकारी मंडळ—१ श्री. गो. रा. गायकैवारी, बी. अे., अेल्‌अेल्. बी.; २ श्री. शं. बा. आंबेकर, अेम्. अे., बी. टी.; ३ श्री. दादासाहेब धनेश्वर; ४ श्री. द. वि. आपटे, अेम्. अे., बी. टी.; ५ श्री. रा. ब. हिवरगांवकर, बी. अी., अे. अेम्. आय्. अी.; ६ सौ. सुशिलाबाअी सतर्भी, बी. अे.

हिशेबतपासनीस— श्री. बा. ना. दातार, बी. अे.

## २३ वें महाराष्ट्र साहित्य संमेलन, अहमदनगर. अहवालप्रकाशनसमारंभ

अहमदनगर येथे १९३९ च्या अीस्टरच्या सुट्टींत भरलेल्या २३ व्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाच्या समग्र अहवालाचा प्रकाशनसमारंभ मुंबअीचे सुप्रसिद्ध साहित्यिक व 'पूर्णिमा' पत्राचे संपादक श्री. मामासाहेब वरेरकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली बुधवार दिनाङ्क २७।३।४० रोजीं सायंकाळीं अहमदनगर शहरपालिकेच्या दिवाणखान्यांत मोठ्या समारंभाने साजरा झाला. शहरांतील बहुतेक वाङ्मयप्रेमी व सुशिक्षित समुदाय या समारंभास अुपस्थित होता.

---

# कांही जुने लोकाचार व कल्पना

[लेखक— चिंतामण गणेश कर्वे]

जुने लोकाचार व जुन्या कल्पना, हीं समाजशास्त्राच्या अभ्यासाला फार उपयोगी असतात. जुन्या लोकांच्या धार्मिक समजुती, त्यांचें व्यवहारचातुर्य, आरोग्य आणि पावित्र्य यांच्या रक्षणाविषयी त्यांनी घेतलेली काळजी, अशा लोकाचारांतून प्रतीत होतात. जुन्या समजुती आज जरी निरुपयोगी आणि निरर्थक वाटल्या, तरी त्यांचा पगडा मागील समाजावर केवढा होता, हें घरांतील वृद्धांना विचारल्यास कळून येणार आहे. प्रत्येक काळीं प्रत्येक समाजाला कांही तरी आचारनियम लागतातच. शरीर आणि मन यांच्या स्वास्थ्यासाठी, ते आवश्यकहि असतात. मात्र काळ बदलेल त्याप्रमाणे कांही नियम बदलावे लागतात; नाही तर ते हास्यास्पद ठरतात. असो.

मागील समाजाने असे नियम कां घालून दिले याचा शोध समाजशास्त्रज्ञ करीत असतात; व त्यावरून कांही सिद्धान्त बसवितात. तेव्हा अशा समाजशास्त्रीय संशोधनाला अुपयोगी पडावे म्हणून कांही लोकाचार किंवा जुन्या समजुती खाली देत आहें. यांत पुष्कळ भर घालतां येण्यासारखी आहे. प्रत्येक समजुतीचा हेतु, लेखकाने मनाने ठरवून दिलेला आहे. कांहींचीं कारणें देण्याचा प्रयत्न केला आहे. ही कारणमीमांसा अनेक विद्वानांच्या साहाय्याने निश्चित करणें जरूर आहे. या लोकाचारांसंबंधी चर्चा व्हावयास पाहिजे. हा अुपक्रम कसा आवडतो हें पाहून पुढे चालू ठेवतां येईल.

[संक्षेपांचा खुलासा — धा. = धार्मिक भावना. व्य. = व्यवहारचातुर्य. आ. = आरोग्यरक्षण. पा. = पावित्र्यरक्षण.]

१. जेवतांना दुसरा माणूस आपणांस शिवला तर डोळ्यांस पाणी लावतात. याला नेत्राचमन म्हणतात. (धा. पा. विटाळ जाण्यासाठी.)

२. सगळी सुपारी खात नाहीत. (आ. धा.)

३. मुसळ आडवें ठेवीत नाहीत. (व्य. धा. जातें आणि मुसळ या व्यवहारोपयोगी वस्तूंना पवित्र मानतात.)

४. विस्तवावर थुंकत नाहीत. (धा. अग्नि देव मानतात.)

५. दोघांमधून विस्तव नेत नाहीत. (व्य. भांडण होअील म्हणून.)

६. जेवतांना शिंक आली किंवा वायु सरला तर डोळ्यांस पाणी लावतात. (पा. नेत्राचमन.)

७. जांभअी आली तर चुटकी वाजवितात. (आ. जांभअी लवकर जावी म्हणून.)

८. अुंबरठ्यावर अुभे राहून शिंकत नाहीत. (आ. अुंबऱ्याची चौकट लागेल.)

९. मांजर, विधवा, बोडका, तेल वगैरे पदार्थ बाहेर जातेवेळीं पुढे आल्यास मागे फिरतात. फारच जरूरीचें काम असल्यास, अंमळ थांबून व जोड्याची बदल करून मग जातात. (धा.)

१०. तोंडाने दिवा मालवीत नाहीत. (आ. धा.)

११. मीठ पायांखाली पडूं देत नाहीत. (व्य.)

१२. आरशांत रात्रीच्या वेळीं आपलें रूप पाहत नाहीत. (पा. वेश्या अशा वेळीं आरसा वापरतात.)

१३. सुपाचा वारा घेत नाहीत. (धा. अशुभ.)

१४. पदराने विस्तवास वारा घालीत नाहीत. (आ.)

१५. पालीचा शब्द ऐकल्यास कृष्णाचें नांव घेतात. (धा.)

१६. झाडतांना केरसुणी पायास लागल्यास तिचा एक फडा मोडून टाकतात. (धा.)

१७. झोंडीस नेहमी गांठ देतात. (व्य. धा.)

१८. सकाळीं तेल किंवा तेली यांचें नांव घेत नाहीत. (धा.)

१९. कुवार, कुयोग, पूर्णिमा व अमावस्या असतां हजामत करवीत नाहीत. (धा.)

२०. जळता दिवा पडल्यास अशुभ मानतात. (धा. आ.)

२१. दोघां भावांत किंवा बापलेकांत जेवणास बसत नाहीत. (व्य. दोघांत वितुष्ट येऊं नये.)

२२. दिव्याची ज्योत दक्षिण दिशेस करीत नाहीत. (धा. दक्षिण ही मृत्युसूचक दिशा.)

२३. सहाणेवरून गंध लावीत नाहीत. (व्य.)

२४. जात्यावर बसत नाहीत. (आ.)

२५. शिवणेशीचा शब्द जेवतांना व संध्या करतांना ऐकत नाहीत. (धा. पा.)

२६. पाण्यांत तोंड पाहत नाहीत. (पा.)

२७. पळसाच्या पानावर चुना घेत नाहीत. (धा.)

२८. रात्रीं हिंग आणीत नाहीत. (आ.)

२९. लच्वी ओलांडीत नाहीत. (आ.)

३०. दही व गूळ एकत्र खात नाहीत. (आ. धा. दहीं व गूळ यांचें मिश्रण मद्या-प्रमाणे समजतात.)

३१. माप पालथें घालीत नाहीत. (व्य. दारिद्र्याचें लक्षण मानतात.)

३२. हातावर मीठ देत नाहीत. (आ.)

३३. पिठावर रेघा ओढीत नाहीत. (व्या.)

३४. पाणी जमिनीवर ठेवल्यावांचून पीत नाहीत. (धा.आयुष्य कमी होतें ही कल्पना.)

३५. डोक्यावर दिवा नेत नाहीत. (आ.)

३६. कोणी निजलें असतां त्यास ओलांडून जात नाहीत. (धा. पा. आयुष्य कमी होते ही कल्पना.)

३७. आपल्या हातानेच दुसऱ्याच्या हातावर पाणी घालीत नाहीत. (धा. आपलें पुण्य दुसऱ्यास जातें ही समजूत.)

३८. प्रयाणकालीं दहीं प्राशन करून जातात. (धा.)

३९. सोमवारीं तीळ खात नाहीत. (धा.)

४०. शुक्रवारीं चणे व शनिवारीं उडीद मुद्दाम खातात. (धा. आ.)

४१. दुधांत थोडेंसें तरी पाणी घालून मग तापवितात. (व्य. आ.)

४२. स्त्री ऋतुस्नात असतां तिच्या चवथ्या दिवशीं परगांवीं जात नाहीत. (धा.) (त्या दिवशीं भोग न दिल्यास भ्रूणहत्या होते ही कल्पना.)

४३. घरांत नखें टाकीत नाहीत. (आ. दारिद्य येतें ही कल्पना.)
४४. विस्तवाचें कोलीत फिरवीत नाहीत. (आ.)
४५. भांड्याचा आवाज होऊं देत नाहीत. (व्य. भांडणाची भीति.)
४६. तिन्ही सांजा तसेंच अमावास्येस विस्तव देत नाहीत. (आ. धा.)
४७. रात्रीस तवा घासीत नाहीत. (व्य.)
४८. कपडा अंगांत असतां शिवीत नाहीत. (आ.)
४९. दारास मुसळ लावीत नाहीत. (धा. व्य.)
५०. तूप व तेल अेका वेळीं आणीत नाहीत. (आ. व्य.)
५१. रात्रीं चुन्यांत पाणी घालीत नाहीत व कोणास देत नाहीत. (धा.)
५२. काथ, विधवा हीं नांवें रात्रीं अुच्चारीत नाहीत.
५३. पाणी, दूध, भिक्षा, तूप, मीठ व काथ हे पदार्थ हातावर देत नाहीत. (व्य.)
५४. हजामत करवून परगांवीं जात नाहीत. (आ.)
५५. रविवारीं ताक करीत नाहीत. (धा. ताक रवीने करावें लागतें.)
५६. कोरें धोतर हांतरीत नाहीत व पांघरत नाहीत. (आ.)
५७. कोरें वस्त्र परिधान करण्यापूर्वी प्रथम त्याचें सूत काढून देवावर वाहतात व सूर्यास नमस्कार करून मग परिधान करतात; व सर्व वडील मंडळीस नमस्कार करतात. (धा. पा.)
५८. तळहातावर काथ घेत नाहीत.
५९. रात्रीस मारलेला विंचू बाहेर फेकीत नाहीत. (व्य.)
६०. जातें व अुखळ यांमधून जात येत नाहीत. (आ.)
६१. भिंतीवर कोळशाच्या रेघा ओढीत नाहीत. (पा. व्य.)
६२. तुळशीचें लग्न झाल्याखेरीज चिंच, अुंस व आंवळे खात नाहीत. (आ.)
६३. दौतींत लेखणी घालून ठेवीत नाहीत. (व्य.)
६४. अुन्ह पाण्यांत थोडेंसें तरी विसण घालून मग स्नान करतात. (व्य.)
६५. शनिवारीं तेल व मीठ आणीत नाहीत. (धा.)
६६. पायरी अुतरतांना अीश्वरस्मरण करून सूर्यास नमस्कार करतात. (धा. सुखरूप परत येतां यावें म्हणून.)
६७. जात्याची तळी घराच्या भिंतीस लावीत नाहीत. (आ.)
६८. रात्रीस झाड कापीत नाहीत. (धा. जीवहत्या टाळण्यासाठी.)
६९. दोघेजण बरोबर स्नान करीत नाहीत. (आ.)
७०. मुलाचा बाप सोमवारीं हजामत करीत नाही. (धा.)
७१. हजामत करवितांना बोलत नाहीत. (आ.)
७२. पागोट्यावर पागोटें ठेवीत नाहीत. (व्य. पागोटें मोडेल).
७३. चुलीवर पदार्थ शिजत असतां तमाच घेअून खात नाहीत. (पा. आ.)
७४. अुंच स्थानीं बसलें असतां पाय हालवीत नाहीत. (आ. पडण्याचा संभव).
७५. बाहेर जातांना 'कोठे जातोस' असें कोणीं विचारिलें असतां जात नाहीत. (व्य. काम होत नाही अशी समजूत.)

---

अनुक्रमणिका

# कांही शब्दांचें व्युत्पादन

## चित्पावन कीं चित्तपावन ?

१. पुराण, दंतकथा इ०— परशुरामाने क्षत्रियांचा नाश करून सह्याद्रीच्या पश्चिमेची भूमि,— बाणाने समुद्र मागे हटवून निर्मिलेली,— ब्राम्हणांस दान दिली, असें आपण पुराणांत ऐकत आलों आहों. या वर्णनावरून साध्या भाषेत असें म्हणतां येतें की परशुरामाने पश्चिम-दिशेस समुद्रकाठीं वसाहतीस योग्य असा जमिनीचा पट्टा नवीन तयार केला. हें करण्यास त्याने चर काढून समुद्रकाठच्या दलदलीच्या प्रदेशांतून पाण्याचा निचरा केला असला पाहिजे. तसेंच, तेथील झाडेंझुडपें तोडून जमीन साफ करून नवीन भरहि टाकली असली पाहिजे. हीं अनेक कामें त्याने ब्राम्हणांच्या देखरेखीखाली मजुरीने किंवा अितर रीतीने पुष्कळ कामकऱ्यांकडून करून घेतलीं असावीं. समुद्र नेहमीच थोडथोडा अेका बाजूस वाढत असतो, तर दुसरीकडे हटत असतो. असें दिसतें की पूर्वी सह्याद्रीच्या पश्चिमेकडून समुद्र बराच मागे हटला होता. यामुळे अुघडी पडलेली जमीन परशुरामाने ब्राह्मणांच्या साह्याने वसतिक्षम केली. हे ब्राह्मण अर्थात् नवीन क्षेत्राचे धनी बनले. चित्पावन म्हणतात ते याच ब्राम्हणांना. यांना असें कां म्हणतात ?

२. ब्राम्हणांची कामगिरी— संस्कृत 'पू' धातूचा अर्थ शुद्ध करणें, साफ करणें, घासणें अि. आहे. मराठी शब्द पोतेरें यांत हाच धातु आहे.

डुकराच्या तोंडाला पोत्र असें म्हणतात. यांतहि 'पू' हाच धातु आहे. डुकर आपल्या तोंडाने जमीन अुकरतें. यावरून अुकरणें, खणणें अित्यादिहि 'पू'चा अर्थ अुघड होतो. खणणें अि० क्रिया परशुरामाच्या जोडीदारांस कराव्या लागल्या, हें वर सांगितलेंच आहे. नंदन, रमण अि० शब्दांतील अन हा प्रत्यय कर्तृवाचक आहे. हा प्रत्यय 'पू' या धातूस लागून पावन असें रूप बनतें व त्याचा अर्थ 'साफ करणारा' असा होतो. प्रस्तुत ठिकाणीं जमीन साफसूफ करण्यांत आली आहे. ती कशासाठी ? धान्य पिकविणें, खाण पाडणें, वस्ती करणें यांपैकी कशासाठी ? मुख्यतः वस्ती करण्यासाठी. पृथ्वी धान्यादि पिकवून प्राण्यांचें पोषण करिते,— म्हणून तिला विश्वंभरा म्हणतात. ती खाणींतून संपत्ति देते म्हणून वसुंधरा, तिजवर मनुष्यें राहतात म्हणून तिला धात्री, क्षिति अि० नांवें मिळालीं आहेत. यांतील क्षिति-मध्ये क्षि धातु आहे. त्याचा अर्थ 'वसती करणें' असा आहे. या शब्दाचा पावन शब्दाशीं समास होअून क्षितिपावन हा शब्द साधला आहे. म्हणजे क्षिति या शब्दाच्या विशिष्ट धात्वर्थावरून 'काय साफ केलें ?' याच्या कर्माचा तर बोध होतोच, पण त्याबरोबर 'कशाकरता साफ केलें ?' हेंहि कळतें. म्हणजे क्षितिपावन याचा अर्थ— 'वसाहत करण्यासाठी खणणें, जाळ्या तोडणें अि० साधनांनी भूमि तयार करणारा' असा सिद्ध होतो. हींच कामें परशुरामाच्या सहायक ब्राम्हणांनी केलीं आहेत. तेव्हा त्यांस क्षितिपावन ही संज्ञा अत्यंत समर्पक ठरते. या संज्ञेचें चित्पावन असें प्रचारांत रूप बनलें. तें कसें ?

३. चित्पावन— संस्कृतांत क्षुर् असा अेक धातु आहे. यावरूनच क्षुर, क्षौर अि० शब्द आले आहेत. क्षुरिका शब्द याच्याच गोतांतील आहे. याचेंच रूप छुरिका असें होवे.

असाच विकार होऊन क्षिति–चें छिति बनलें. या विकाराबद्दल लक्ष्मी (लछमी) सुद्धा साक्ष देईल. छ–चा च (छुच्छुंदरीची विकृति) चेचुंद्री या शब्दांत झालेला आढळतो. अशा विकाराने चिति बनले. चिति या शब्दांतील अन्त्य अि-कार प्रचारांत गळून चित् बनलें. रीति–रीत; लहरी–लहर या जोड्यांतहि हाच विकार आढळतो. (जाति–पङ्क्ति–त्रोटक) जात-पात तोडक-(मण्डळ) या समासांतहि असाच अि-कार लोपला आहे. मात्र हा लोप लेखनांत दिसत नाही अेवढेंच. उच्चारांतून तो निःसंशय गळाला आहे. चित्पावन-प्रमाणेच जातपात यांतील प-पूर्वीचा अ अनुच्चारित आहे. तेव्हा क्रमाने क्षितिपावन–चें चित्पावन होण्यांत लछमी, चेचुंद्री, जातपात हे तीन साक्षीदार आपणांस मिळतात व चित्पावन हें रूप व्युत्पत्तिशुद्ध ठरतें. मग चित्तपावन कोठून आलें ?

४. **चित्तपावन**— अेखाद्या शब्दाचा, विशेषतः सामासिक शब्दाचा, अर्थ होतां होअील तों त्याच्या घटकांतून काढण्याची मनुष्याची धडपड वारंवार दिसून येते. शब्दाचा अर्थ 'बाबावाक्यं प्रमाणं' म्हणून कोशावरून न मानतां तो अर्थ घटकांतून निघाला म्हणजे जिज्ञासु मनुष्याचें समाधान होतें. असाच प्रयत्नात चित्तपावन हें रूप बनलें आहे. दुःखी मनुष्याचें 'समाधान करणें' हा अर्थ सान्त्वन शब्दांत आहे; पण असा स्वतंत्र सिद्ध अर्थ घेण्यास आपण तयार नाहीं. आपण त्याचें रूप कल्पनाशक्ति चालवून शान्तवन असें ठरवितों. व यांतील शान्त हा अवयव विवक्षित अर्थास अनुकूल असल्याने, या अर्थाविषयी आपणांस समाधान होतें. असाच समाधानासाठी (वराचें) सीमान्तपूजन–चे स्थानीं आपण श्रीमन्त-पूजन हा शब्द योजितों. लाज-होम–चें लज्जाहोम करण्यांतहि हीच भावना दिसून येते. अशाच कारणामुळे, चित्पावन शब्दांतील चित्–चा अर्थ सामान्य मनुष्यास कळत नसल्याने, त्याचे ठिकाणीं त्याने कांहीतरी अर्थबोध करणारा चित्त हा शब्द योजिला. निरर्थक अवयवापेक्षा सार्थ अवयव बरा. या दृष्टीने चित्तपावन असें रूप प्रवर्तण्यांत आलें आहे.

५. **भ्रमभूलक रूपान्तर**— दुष्ट–चें द्रुष्ट, धिकार–चें धिःक्कार अशीं रूपें आढळतात. पहिल्या रूपांत र् घुसला आहे. त्यास मुळांत आधार मुळीच नाही. तरी पण दुष्ट मनुष्याविषयी वक्त्याच्या मनांतील तळतळाट व्यक्त करण्यास र हा अनुकूलच आहे. दुष्ट या उच्चारापेक्षा द्रुष्ट याच उच्चाराने मनाचा जळफळाट अधिक स्पष्ट होतो. अर्थात् द्रुष्ट हें रूप भ्रममूलक असलें तरी, विवक्षित अर्थास पोषक असल्याने रक्षणीय आहे. अशी स्थिति धिःकार या रूपाची नाही. मनांतील तुच्छता-बुद्धीच्या आविष्कारास क–कार–द्वय युक्त साधात धिक्कार हेंच रूप चांगली उठावणी देतें. हें कार्य धिःकार या शेळपट रूपाने होत नाही. म्हणून धिक्कार हेंच रूप वापरणें प्रशस्त ठरतें. अर्थात् येथे भ्रममूलक धिःकार हें रूप विवक्षित अर्थबोधास घातक होत असल्याने सर्वथा त्याज्य आहे. सारांश, भ्रममूलक रूपान्तर राखणें कीं टाकणें हें त्याच्या ध्वनीचें व अर्थाचें संपूर्ण शब्दार्थाशीं जें नातें त्यावर अवलंबून आहे. या दृष्टीने चित्पावन-चा विचार व्हावा.

६. **अेका प्रदेशाचें नांव**— अितिहासज्ञ असें सांगतात की 'चित्तपावनस्थ ब्राम्हण' असा शब्दप्रयोग जुन्या लेखांतून आढळतो. यांत चित्तपावन हें 'कोकणांतील अेका भागास' दिलेलें नांव आहे. या गोष्टीची संगति चित्पावनांनीं केलेल्या वसाहतीशीं लागते काय ? देशावरून लोकांस नांव पडण्यापेक्षा, लोकांवरून देशास नांव पडल्याचींच अुदाहरणें बहुतर आढळतात. 'तस्य निवासः' या पाणिनि-प्रणीत सूत्रावरून शिबि या नांवाच्या लोकांवरून प्रांतास शैब असें नांव मिळालें आहे. या नांवाबरोबर शिबि असेंहि नांव आढळतें. तेव्हा, चित्पावन

हें नांव आपल्या पूर्वजांस त्यांच्या कृतीवरून अगोदर मिळालें असून त्यावरून त्यांनी वसविलेल्या प्रदेशास चित्पावन (किंवा चित्तपावन) हें नांव नंतर मिळालेलें असणें हेंच अयुक्तिक दिसतें. 'आधेयावरून आधारास' नांव मिळाल्याचीं अुदाहरणें प्रचारांतहि आहेत. त्र्यम्बकग्राम, ओंकार-पुर, जगन्नाथपुरी यांस आपण क्रमानें त्र्यम्बक, ओंकार, जगन्नाथ अशाच नांवांनी प्रायः ओळखतों. किर्लोस्करवाडी या स्टेशनास अुद्या कोणीं नुसतें किर्लोस्कर म्हटल्यास तें मुळीच चमत्कारिक भासणार नाही. किर्लोस्कर-खबर या नांवांतहि किर्लोस्कर हा शब्द रहिवाशांवरून त्यांच्या वसतीस लावण्यांत आला आहे. प्रस्तुत मासिकांत खबर मुख्यतः असते ती किर्लोस्करांची नव्हे, तर त्यांनी वसविलेल्या जागेची. यावरून किर्लोस्कर साक्ष अशी देतो की मनुष्याचें नांव त्याच्या वसाहतीस देण्यांत येतें. या साक्षीवरून पुढील वृत्तक्रम सिद्ध होतो. कोकणस्थांच्या पूर्वजांनी परशुरामाबरोबर येअून समुद्रकांठीं नवीन वसाहत केली. अेतदर्थ केलेल्या खटपटीवरून त्यांस चित्पावन हें नांव मिळालें. त्यांचा निवास झालेल्या कोकणपट्टी-सहि चित्पावन हेंच नांव पडलें. पुढे तेथील या लोकांचा अुल्लेख प्रांतावरून करतांना 'चित्त-पावनस्थ ब्राम्हण' असा प्रसंगीं झाला. यांत चित्पावनाची आरंभीं केलेली व्युत्पत्ति सर्वथा निर्बाधच राहते. 'कोकणस्थांनी समुद्रापासून भूमि संपादून वसाहत केली' या अितिहासास प्रदेश-वाचक चित्तपावन हें नांव विरोधी ठरत नाही.

७. **निगमन**— क्षिति म्हणजे वसाहतीस योग्य अशी भूमीची अवस्था. ही अवस्था आणण्यास लागणारी खण-तोड अि. क्रिया करणारा तो पावन. यावरून क्षितिपावन म्हणजे जागा साफ करून तींत वसाहत करणारा, म्हणजेच अेका अर्थानें Pioneer. या दीर्घ यत्नसाध्य गोष्टीचें दर्शक चित्पावन असें साभिमान नांव कोकणस्थांस मिळालें. पूर्वेतिहासाशीं संवादी असलेल्या वरील व्युत्पत्तीकडे लक्ष्य न गेल्यानें अथवा अेखाद्या अन्य कारणानें झालेलें चित्तपावन हें रूप विकृत असून, पूर्वेतिहासाशीं मिळून नसल्यानें अुपयोगाई नाही.

गोविंद कृष्ण मोडक

---

## साभार स्वीकार

१. **रुग्णविलाप**— कवि मुकुंदराय; प्रका. श्री. शं. रा. दाते, ६२४ सदाशिव पेठ, पुणें २; मूल्य ४ आणे.

२. **तिसरा प्रवाह**— ले० श्री. पां. गो. लोहोकरे; प्रका० श्री. हे. ग. करमरकर, २० नारायण पेठ, पुणें २; मूल्य १। रु.

३. **पुनर्भेट** (भाग ५)— ले० श्री. य. गो. जोशी; प्रका० ल. ना. चाफेकर, आर्य-संस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १। रु.

४. **ज्ञान हें विष का अमृत ?**— ले० प्रो. वा. म. जोशी; प्रका० श्री. ना. त्र्यं. भिडे, माडर्न बुक डेपो, पुणें २; मूल्य १० आणे.

५. **सुश्लोककुमार**-(श्रीकालिदासकृत कुमारसंभव महाकाव्याचा मराठी श्लोकबद्ध अनुवाद. मूळ संस्कृत कुमारसंभवासह व सुंदर रंगित चित्रांसह.) अनुवादक— रामचंद्र चिंतामण श्रीखंडे, अेम्. बी. बी. अेस्.; अुपोद्घातलेखक—हिज् हायनेस् श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि, बी. अे., राजेसाहेब, औंध; पृष्ठसंख्या ३२+१६०; मूल्य २ रु.

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# १९३९ चें अितिवृत्त

**सभासद्**— वर्षारंभीं पटावर अेकूण ७९३ सभासद होते. या वर्षात ९ तहहयात व १९९ साधारण असे २०८ नवीन सभासद परिषदेस लाभले; परंतु यांपैकी ३ सभासद वर्गबदलीने वरील वर्गात समाविष्ट झाल्याने नवीन सभासदांची खरी संख्या २०५ ही आहे. मृत्यूमुळे १ हितचिंतक, २ तहहयात व ६ साधारण असे पुढील ९ सभासद कमी झाले— मिरजेचे राजेसाहेब श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन, प्रा. डॉ. माधवराव पटवर्धन, श्री. कृष्णाजी नारायण भिडे, श्री. अ. वि. पटवर्धन, श्री. ग. वा. हर्डीकर, बॅ. के. ग. देशपांडे, प्रो. स. ना. दातार, श्री. त्र्यं. ना. गोडबोले, श्री. द. बा. पेणकर. ६२ सभासदांचे राजीनामे स्वीकारण्यांत आले. वर्षअखेरीस पटावर नोंदलेले सभासद येणेंप्रमाणे आहेत—

अुपकर्ते १, आश्रयदाते ३, साहाय्यक १, हितचिंतक १०, तहहयात १२३, साधारण ७८९; अेकूण ९२७. याप्रमाणे या वर्षात सभासदांची संख्या मात्र १३४ ने वाढली आहे.

**आर्थिक परिस्थिति**— निधिधारकांकडे तहहयात सभासदाची वर्गणी म्हणून रु. ४० व अिमारतीसाठी आलेल्या देणग्यांची रक्कम रु. ५५२–१५–६ असे अेकूण रु.५९२–१५–६ पाठविण्यांत आले. आता वर्षाच्या शेवटीं शिल्लक ३७८–४–११ राहिली आहे, यापैकी पैठणकर पारितोषिकाची रक्कम रु. १०० व कारकुनाचा प्राव्हिडंट फंड रु. ४२ असल्यामुळे केवळ शिल्लक रु. २३६–४–११ आहे.

**अिमारत**— अितिवृत्तवर्षी अिमारतनिधीसाठी ४९५ रुपयांच्या देणग्या आल्या त्या येणेंप्रमाणे—

श्री. ना. बा. गद्रे, पुणें, १०; श्री. द. वि. पिसोळकर, हैदराबाद, ४५; डॉ. के. वा. साठे, बेळगांव, ५०; श्री. शं. ल. गोगटे, १०; डॉ. ह. रा. दिवेकर, अुज्जयिनी, ५०; श्री. वा. दा. गोखले, पुणें, ५०; श्रीमंत सौ. इंदिरा महाराणीसाहेब होळकर, इंदूर, २००; श्री. रा. ग. प्रधान, हैदराबाद, २०; श्री. श्री. म. पळणिटकर, हैदराबाद, १०; श्री. म. वि. गोखले, पुणें, ५०.

अिमारतीच्या गच्चीवरील जागा अुपयोगांत आणण्यास पूर्वी योजिल्याप्रमाणे जिना बांधण्यांत आला त्यास खर्च रु. ४२५ आला.

**संमेलन**— वाङ्मयोपासक मंडळ, अहमदनगर, या संलग्न संस्थेकडून ता. ८, ९ व १० अेप्रिल १९३९ या दिवशीं अहमदनगरांत महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें २३ वें अधिवेशन भरविण्यांत आलें. संमेलनांत झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तान्त निराळा प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

**परीक्षा**— नोव्हेंबर महिन्यांत प्राज्ञ व विशारद या परीक्षा घेण्यांत आल्या. प्राज्ञ परीक्षेस ६१ व विशारद परीक्षेस १२ असे अुमेदवारांचे अर्ज आले होते. परंतु अनुक्रमें ४४ व ८ अितकेच अुमेदवार परीक्षेस बसले. यांपैकी प्राज्ञ परीक्षेत ३७ व विशारद परीक्षेत ५ अुमेदवार यशस्वी झाले. अुमेदवारांच्या सोयीसाठी परिषदेच्या कार्यालयांत व मुंबअीस मराठी साहित्यसंघ या संलग्न संस्थेमार्फत वेळोवेळीं व्याख्यानांचा अुपक्रम करण्यांत आला होता.

**सभा**— साधारण सभा १ नियामक मंडळाच्या २ व कार्यकारी मंडळाच्या १० सभा झाल्या.

व्याकरणसमिति— या समितिच्या कामाचा त्रोटक वृत्तान्त स्वतंत्रपणें प्रसिद्ध झाला आहे. परिभाषा व शब्दांच्या जाति यांविषयीची चर्चा पुरीं झाली असून संयुक्त क्रियापदांच्या चर्चेस आरंभ झाला आहे.

नवीन उपक्रम— पूर्वी स्वतंत्रपणें अस्तित्वांत असलेल्या परिभाषामंडळाच्या सदस्यांचें परिषदेतर्फे परिभाषाचर्चामंडळ नेमण्यांत आलें आहे.

चर्चा— 'आधुनिक भारत', 'एकलें बीज', 'पडसाद', 'तुटलेले दुवे' या चार पुस्तकांवर सामुदायिक चर्चा करण्यांत आली.

अितर— श्रीमंत प्रतापसिंहमहाराज गायकवाड, बडोदें, यांच्या राज्यारोहणप्रसंगीं परिषदेच्या शिष्टमंडळाने बडोद्यास जाअून श्रीमंत महाराजांस मानपत्र अर्पण केलें.

नेहमीप्रमाणे वसंतऋतुनिमित्य परगांवांहून आलेल्या साहित्यिकांस निमंत्रण देअून परिषदेच्या सभासदांचें स्नेहसंमेलन भरविण्यांत आलें.

श्री. म. भा. भू. ज. र. आजगांवकर, वे. शा. सं. विद्याभूषण श्री. रंगाचार्य रड्डीशास्त्री यांच्या सत्कारसमारंभप्रसंगीं परिषदेने अितर संस्थांशीं सहकार केला.

कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या शोचनीय मृत्यूबद्दल अितर संस्थांच्या सहकाराने दुखवट्याची जाहीर सभा भरविण्यांत आली. या सभेंत कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांचें योग्य असें स्मारक करण्यास अेक अधिकृत समिति नेमण्यांत आली.

---

# मराठी व्याकरणसमिति

## वृत्तान्त

या समितीच्या आरंभापासून आजपर्यंतच्या कार्याचा वृत्तान्त थोडक्यांत देत आहें.

१९३६ च्या डिसेंबरमध्ये मराठी व्याकरणपरिषद् पुणें येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेने भरविली. त्या परिषदेने मराठी व्याकरणांतील अनेक वादग्रस्त, अनिश्चित व नवोद्भूत प्रश्नांची चर्चा करून त्यासंबंधी आपले निर्णय जनतेपुढे विचारार्थ मांडण्यासाठी अेक समिति नेमिली. तिच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यालयांतच आजवर सुमारे तीस बैठकी झाल्या. त्या प्रसंगीं सामान्यतः खालील सभासद येत असत—

१ डॉ. वा. गो. परांजपे, २ डॉ. प. ल. वैद्य, ३ प्रो. ग. ह. केळकर, ४ श्री. गो. कृ. मोडक, ५ श्री. य. ग. फफे, ६ श्री. रा. दा. देसाअी, ७ श्री. नी. शं. नवरे.

या समितीचे अध्यक्ष श्री. रंगाचार्य रड्डी हे दोन तीन सभांना वाअीहून अगत्याने आले होते.

चर्चा— आजपर्यंत पुढील विषयांसंबंधी चर्चा झाली.

(१) परिभाषा. मराठी ही स्वतंत्र भाषा समजून शक्य तों संस्कृत व्याकरणाची परिभाषा घ्यावी.

(२) शब्दांच्या जाति. सव्यय व अव्यय आणि त्यांचे पोटविभाग.

सांप्रत संयुक्त क्रियापदांविषयी चर्चा चालू असून अुरलेल्या सर्व विषयांची चर्चा येत्या 'मे'च्या सुट्टींत ओळीने आठवडाभर सभा भरवून पुरी करण्याचें योजिलें आहे.

रा. दा. देसाअी
कार्यवाह, मराठी व्याकरणसमिति.

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## जमाखर्च (१९३९)

### जमा

१८६१-१२-११ शिल्लक-मागील अखेर
४०—०—० तहह्यात सभासद वर्गणी
१५३६-१४—० साधारण सभासद वर्गणी
१९३९अखेरपर्यंतची
१४८६-१४-०
१९४० ची ५०
१५३६-१४-०
४९५—०—० इमारतनिधि देणगी
४४-१०—० पत्रिका वर्गणी
६५—४—० संलग्न संस्था वर्गणी
७६—४—० ग्रंथविक्री
४३८-१३—३ परीक्षा शुल्क व अितर
१३—०—० किरकोळ
७३०—४—० व्याज
अिचलकरंजी ट्रस्ट ६०-०-०
ट्रस्टी ६५०-०-०
खजिनदार २०-४-०
७३०-४-०
२१—०—० प्रॉव्हि.फंड खातें

१३३२२-१४-२ अेकूण

### खर्च

९४२—८-९ कचेरीखर्च
पगार ५६८—०-०
जागाभाडें १५—०-०
म्युनि.कर २८—४-०
वीज १४-१०-३
कार्यालय टपाल ७७-१४-०
लिखाअी १३—७-०
किर. छपाअी
व
पुस्तक बांधणी
१८२-१४-०
सादिल ४२—७-६
९४२—८-९
१३८६-७-० पत्रिकाखर्च
छपाअी १२११—९-०
टपाल १७०-१४-०
किरकोळ ४—०-०
१३८६—७-०
१६२-१-३ प्रवास, प्रचार
५८-०-३ किरकोळ खर्च
३१-०-३ संमेलनखर्च
९१-१४-० श्रीमंत गायकवाड सरकार मानपत्रखर्च
१९९-१-६ निवडणूक
१-२-० वर्गणीवसूलीचा खर्च
१-१४-० चेकवरील बट्टा
४२-०-० प्रॉव्हि.फंड खर्च
१९४-११-९ परीक्षांबाबतचा खर्च
७-४-० वसूल न होणारी रक्कम
२६-०-० शाखा सभा
१०१७८-१३-५ शिल्लक-पुढील सालाकरिता

१३३२२-१४-२ अेकूण

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## जमाखर्चाचा आढावा (१९३९)

| देणें | | येणें | |
|---|---|---|---|
| १०१७८–१३–५ | शिल्लक | ७८६६––८–६ | अिमारत |
| १००––०–० | पैठणकर पारितोषिक देणगी | ५८४––९–३ | सामान |
| ४२––०–० | कारकून प्रॉव्हि. फंड | १३६०––७–३ | ट्रस्टी तहहयात सभासद वर्गणी |
| | | १२७–१५–६ | ट्रस्टी अिमारतनिधि देणगी |
| | | ३––०–० | श्री. ग. स. जोग, बेळगांव |
| | | ३३४–१०–७ | खजिनदार (बँक ऑफ महाराष्ट्र) |
| | | ५–१५–४ | चिटणीस (पुणें सें. को. ऑ. बँक) |
| | | ३७–११–० | रोख शिल्लक |
| १०३२०–१३–५ | अेकूण | १०३२०–१३–५ | अेकूण |

महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें, कचेरीचे तारीख ३१ डिसेंबर १९३९ अखेर पुऱ्या होणाऱ्या वर्षाचे हिशेब मीं तपासले. हिशेब चांगल्या प्रकारें व व्यवस्थितपणें ठेविले आहेत. मला पाहिजे असलेली माहिती व खुलासे मिळाले. जमाखर्चाचे तक्ते परिषदेच्या पुणें कचेरीच्या येण्यादेण्याची व जमाखर्चाची वस्तुस्थिति दाखवीत आहेत. मात्र परिषदेच्या निधिधारकां कडील हिशेब आल्याशिवाय व ते धरून जमाखर्चाचे तक्ते तयार केल्याशिवाय 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'चे असे हिशेब तयार होणार नाहीत. अिमारत व सामान यांवरील झीज दर साल काढली पाहिजे. ती काढण्यास अजून सुरुवात केलेली नाही ती करावी.

म. वि. गोखले
हिशेब तपासनीस

१७–२–१९४०.

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## अंदाजपत्रकाशीं जमाखर्चाचा पडताळा (१९३९)

| अुत्पन्न | अंदाजपत्रका-प्रमाणे | प्रत्यक्ष | अंतर | खर्चबाब | अंदाजपत्रका-प्रमाणे | प्रत्यक्ष | अंतर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| साधारण सभासद वर्गणी | १८०० | १५३६ | –२६४ | कचेरीखर्च | ९१७ | ९४२ | + २५ |
| पत्रिका वर्गणी | १०० | ४४ | – ५६ | पत्रिकाखर्च | १७०० | १३८६ | –३१४ |
| संलग्न संस्था वर्गणी | ६० | ६५ | + ५ | संमेलनखर्च | ५० | ३१ | – १९ |
| ग्रंथविक्री | ४० | ७६ | + ३६ | शाखासभांस द्यावयाची रक्कम | १५० | २६ | –१२४ |
| परीक्षा (शुल्क इत्यादि) | २०० | ४३८ | +२३८ | प्रवासप्रचार | १७५ | १६२ | – १३ |
| पत्रिका जाहिराती | ३०० | ० | ... | अुपसमित्या व संपादकमंडळ | ५० | ० | ... |
| किरकोळ | ७ | १३ | + ६ | परीक्षाखर्च | १५० | १९४ | + ४४ |
| ट्रस्टींकडील व्याज | ८०० | ६५० | –१५० | सामान | १२५ | ५४ | – ७१ |
| अिचलकरंजी ट्रस्ट व्याज | ७० | ६० | – १० | टंकलेखनयंत्र | ३१० | ३१० | ० |
| मुंबअी संमेलन देणगी | २०० | ० | ... | किरकोळ खर्च | ६० | ५८ | – २ |
| प्रॉव्हि. फंड | ० | २१ | + २१ | परिषद् अितिहास | २०० | ० | ... |
| | | | | निवडणुकीचा खर्च | २५० | १९९ | – ४४ |
| | | | | श्रीमंत गायकवाड सरकार मानपत्र | ० | ९१ | + ९१ |
| | | | | प्रॉव्हि. फंड | ० | ४२ | + ४२ |

# अंदाजपत्रक (१९४०)

| उत्पन्न | | खर्च | | | गतवर्षातील खर्च |
|---|---|---|---|---|---|
| ७५०-०-० | व्याज (ट्रस्टींकडून) | ९५०-०-० | कचेरीखर्च | | ९४२-०-० |
| ६०-०-० | व्याज अिचलकरंजी | | पगार | ५९० | |
| | ट्रस्टकडून | | प्रॉव्हि. फंड | | |
| १७००-०-० | साधारण सभासद | | व इतर | ६५ | |
| | वर्गणी | | मुअीभाडें | १६ | |
| ७५-०-० | पत्रिका वर्गणी | | म्युनि. कर | २९ | |
| ६०-०-० | संलग्न संस्था | | वीज | २० | |
| | वर्गणी | | टपाल | १०० | |
| २००-०-० | मुंबअी संमेलन | | लिखाअी | २० | |
| | देणगी | | किरकोळ छपाई | | |
| ४०-०-० | ग्रंथविक्री | | व पुस्तकबांधणी | ६० | |
| ३००-०-० | परीक्षा (शुल्क इ.) | | सादिल | ५० | |
| ५०-०-० | पत्रिका जाहिराती | | | —— | |
| | | | | ९५० | |
| | | १५००-०-० | पत्रिकाखर्च | | १३८६-७-० |
| | | | छपाअी | १२०० | |
| | | | टपाल व | | |
| | | | किरकोळ | ३०० | |
| | | | | —— | |
| | | | | १५०० | |
| | | ५०-०-० | संमेलनखर्च | | ३१-०-० |
| | | १००-०-० | शाखासभांस | | |
| | | | द्यावयाची रक्कम | | २६-०-० |
| | | २००-०-० | प्रवास, प्रचार | | १६२-१-३ |
| | | २५-०-० | अुपसमित्या व | | |
| | | | संपादकमंडळ | | ०-०-० |
| | | १००-०-० | परीक्षा | | १९४-११-९ |
| | | ५०-०-० | सामान | | ५४-४-० |
| | | ६०-०-० | किरकोळ खर्च | | ५८-०-३ |
| | | २००-०-० | परिषद् अितिहास | | ०-०-० |
| ३२३५-०-० | | ३२३५-०-० | | | |

[ म. सा. प. अङ्क ५३, पृ. ६१ वरून पुढे चालू. ]

(१) 'फेड अिन्' हा अेक महत्त्वाचा प्रकार आहे. कॅमेऱ्याच्या प्रमुख युक्त्यांपैकी ही अेक आहे. अगदी अंधारांतून हळू हळू सूर्य अुगवला म्हणजे जसें वाटतें, तोच परिणाम याचाहि होतो. पडद्यावरील पूर्ण अंधार कमी कमी होत जाअून, प्रकाश वाढत जातो, आणि चित्र पूर्ण-पणें दिसूं लागतें. याच्या बरोबर अुलट फेड आअुट.

(२) 'फेड आअुट्' म्हणजे पडद्यावर दिसत असलेल्या चित्रावरील प्रकाश हळू हळू कमी होत जाअून शेवटीं पूर्णपणें अंधार पसरणें. याचा अुपयोग अनुक्रमें सूत्राच्या सुरुवातीस आणि शेवटास करतात. 'फेड आअुट'नंतर 'फेड अिन्' दाखविला म्हणजे मध्यंतरीं बराच काल गेला असें सूचित होतें.

(३) 'डिझॉल्व्ह किंवा मिक्स' : यांत अेक चित्र हळू हळू नाहींसें होत जाअून त्याच्या जागीं दुसरें चित्र येतें. परंतु प्रत्येक चित्र स्वतंत्रपणें प्रथमपासून शेवटपर्यंत राहतें.

(४) 'सुपरअिंपोझिंग' : ही सुद्धा अशाच प्रकारची अेक युक्ति आहे. डिझॉल्व्हमध्ये अेका लहानशा तुकड्यावरच दोन्ही चित्रें अेकमेकांवर असण्याची क्रिया दिसते; परंतु सुपर-अिंपोझिंगमध्ये ती बऱ्याच अंतरापर्यंत चालूं शकते, आणि वाटेल तेथे त्या दोन चित्रांपैकी अेक फेड आअुट करतां येतें. या फेड आउटचा परिणाम तें चित्र हळू हळू अदृश्य झालें असें दिसण्यांत होतो.

(५) मास्क : ही युक्ति सबंध चित्रापैकीं थोडासाच भाग दाखविण्यासाठी अुपयोगात आणतात. मास्क हळू हळू मोठें करून किंवा अुलट लहान करूनहि फेड अिन किंवा फेड आअुट सारखा परिणाम दाखवितां येतो.

कॅमेरा त्याच्या स्टँडमध्ये घट्ट अडकविला म्हणजे तो त्याच्या आधारफळीसह अिकडे तिकडे फिरूं शकतो. काम करणाऱ्या पात्राची प्रत्येक हालचाल कॅमेऱ्यांतून दिसणाऱ्या चौ-कटीच्या (Frame) आवाक्यांत राहावी म्हणून कॅमेरा फिरवावा लागतो, तो आडव्या पातळींत फिरवला म्हणजे 'पॅन करणें' म्हणतात.

(६) पॅन करणें : यामुळे अेकाच आडव्या पातळींतील सर्व हालचालींचें बदलतें दृश्य (Panorama) दृष्टिकोनांत ठेवतां येतें.

(७) टिल्टिंग करणें : बसलेलें पात्र अुभें राहतें त्या वेळेस कॅमेराहि त्याच्याबरोबर अुचलावा लागतो. अशा अुचलण्याला टिल्टिंग करणें असें म्हणतात.

(८) 'ट्रॉली किंवा ट्रक् शॉट' : अेखाद्या पात्राची प्रत्येक हालचाल जवळून निरीक्षण करावयाची असेल आणि त्या पात्राचे हावभाव सारखे चालतांना व्हावयाचे असतील किंवा दृष्टिकोनांत दिसणारें चित्र हळू हळू मोठें किंवा लहान होत जावें अशी अिच्छा असेल तर कॅमेरा अेका गाडींत— हिला ट्रॉली म्हणतात — घालतात आणि ही गाडी कॅमेऱ्यासमोरील पात्राबरोबर फिरते किंवा पुढे मागे जाते (Trucking), आणि तो अुद्देश साध्य होतो. या रीतीने घेतल्या जाणाऱ्या चित्रावलीला 'ट्रॉली' किंवा 'ट्रक् शॉट' असें नांव आहे.

(९) 'क्रेन शॉट्' : तसेंच क्रेनमध्ये कॅमेरा ठेवून घेतलेल्या शॉटला 'क्रेन शॉट' असें म्हणतात.

(१०) 'फॉलो शॉट' : 'पॅन', 'टिल्ट', 'ट्रॉली' किंवा 'ट्रक' व 'क्रेन' यांपैकी कांही किंवा सर्वांच्या मिश्रणाने मिळून 'फॉलो शॉट' होतो. या सर्वांच्या साहाय्याने पाहिजे ती व्यक्ति अगर वस्तु कॅमेऱ्याच्या दृष्टिकोनांत सारखी ठेवतां येते— तिला 'फॉलो' करतां येतें.

या सर्व परिभाषेचा अुपयोग ठिकठिकाणीं करून चित्रकथा लिहावयाची असते. त्यासाठी कागद अेका विशिष्ट तऱ्हेने छापवून घेतलेले असतात.

| कथेचें नांव : | | स्थलनिर्देश : | |
|---|---|---|---|
| भाषा : | | कालनिर्देश : | |
| दृश्य नंबर : | | व्यक्तिनिर्देश : | |
| चित्र-क्रमाङ्क | चित्रवर्णन | संवाद व अितर खुलासा | पार्श्व-संगीत |

अशा कागदांवर प्रत्येक शॉट्चें स्वतंत्र वर्णन लिहून काढावें लागतें. तें लिहितांना मुळीसुद्धा हयगय करतां कामा नये. समजा, अेखाद्या ठिकाणीं फेड अिन् घालावयाचा आहे व तसें लिहावयाचें राहून गेलें; तर तो शॉट् चित्रीकरणाच्या वेळीं फेड अिन् करावयाचा राहून जाअील, आणि मग सगळ्या तुकड्यांची जुळवाजुळव करतांना अेडिटरच्या लक्षांत ती चूक येअील; पण त्या वेळीं ही चूक दुरुस्त करणें अशक्य होअून बसलेलें असेल आणि चूक तशीच कायम ठेवल्याने कथेची सुसंबद्धता तुटेल. म्हणून तंत्राचा अुपयोग करून चित्रकथा संपूर्ण लिहावयास पाहिजे.

अगदी पहिल्या पृष्ठावर कथेचें मुख्य शीर्षक. मूळ कथेचें 'तो आणि ती' हें नांव वाङ्मयदृष्ट्या कितीहि सुंदर असलें तरी चित्रकथेसाठी नवीन म्हणून गुलाबाच्या फुलाला ज्यांत प्राधान्य आहे असें नांव निवडणें अुत्तम. आता सारी कथा या गुलाबाच्या फुलाभोंवतीं गुंफावयाची. प्रथमच अेक गुलाबाचें फूल दाखवायचें आणि त्याच्यावर गुलाबाचें फूल हीं अक्षरें सुपरअिंपोझ करावयाचीं. आणि नंतर हळू हळू अेकेका पाकळीवर अेकअेका तंत्रज्ञाचें नांव लिहावयाचें. सौन्दर्य आणि परिणामकारकता या दोन दृष्टींनी ही निवड अर्थातच विषयानुसार करावयाची असते.

| कथेचें नांव — गुलाबाचें फूल<br>भाषा — मराठी<br>दृश्य क्रमांक — १ | | | |
|---|---|---|---|
| चित्र-क्रमाङ्क | चित्रवर्णन | संवाद वगैरे | पार्श्व-संगीत |
| १ | गुलाबाच्या फुलाचा क्लोजप् लांबी दहा फूट | प्रथम फक्त फूल नंतर हळू हळू | ट्रेड मार्क संगीत |
| २ | अुपशीर्षकें प्रत्येकीं सहा फूट | अेकेका पाकळीवर अेकेक याप्रमाणे | पुढे |
| ३ | नट व नटी यांचीं नांवें प्रत्येकीं ६ फूट | अेकदम सर्व पाकळ्यांवर | चालू |

आतां कथेकडे वळावयाचें आहे. तेथेंहि गुलाबाच्या फुलालाच महत्त्व आहे. शीर्षकांना महत्त्व नाहीं असें वाटण्याचा बराच संभव आहे. परंतु प्रेक्षकांची स्थिरस्थावर होअून त्यांचें लक्ष कथेकडे लागण्यास तेवढा वेळ लागतोच. दुसरें, काम करणाऱ्या व्यक्तींनाहि आपापलीं नांवें पडद्यावर प्रकाशित झाल्याने मानसिक समाधान, श्रमांचें सार्थक व अुल्हास वाटतो. शीर्षकां-नंतर कथेच्या प्रस्तावाला व विकासाला सुरवात करावयाची असते.

> ४ ट्रॉली विग क्लोज टु मिडियम लॉंग शॉट : गुलाबाचें फूल हळू हळू मिटतें आणि त्याची सुंदरशी कळी होते. ही कळी दूरदूर जात आहेसें वाटतें. पुढे प्रेक्षकास कळून येतें की ती अेका तरुणीच्या वेणींत खोवलेली आहे. तरुणीची वेणी अत्यंत चित्तवेधक पद्धतीने घातलेली असून तिचा चेहेरा जरी प्रेक्षकाला दिसत नसला तरी अेकंदर ढब आकर्षक आहे.

या वेळीं संगीत हळू हळू त्या तरुणीची घाअी निर्देशित करणारें असावें आणि पुढे पुढे रस्त्यावरील गजबजाटांत तें मिसळून जावें.

> ५ पॅन शॉट : कॅमेरा खूपसा पॅन करून 'तो'पर्यंत आणणें. 'तो' अेकदम चमकतो आणि शेजारच्या गृहस्थांच्या डोक्यावरून या बाजूने त्या बाजूने वाकून पाहतो.
>
> ६ पॅन शॉट : ती भरभर पुढे जात आहे. अेकंदर घाअी-वरून कसल्यातरी कामांत ती दंग आहे. तिला अिकडे तिकडे पाहावयालाहि वेळ नाही असें दृश्य.

या सर्वांच्या साहाय्याने तो तिच्या मागे लागला आहे हें प्रेक्षक समजूं शकेल. त्यानंतर आलटून-पालटून 'ती' व 'तो' दाखवीत राहावयाचें; कधी अगदी जवळ आलेली तर कधी 'तो'च्या समोर सायकल आल्यामुळे तो जरा मागे पडतो व पुनः अंतर वाढतें; अशा प्रकारें प्रेक्षकांच्या मनाला सारखें दोन्हीकडे खेचून धरून पुढे काय होणार याची अुत्कंठा लावून ठेवतां येते. मात्र काळजी घ्यावयाची ती अशी की कोठेहि 'ती' कोण आहे हें 'तो'ला समजूं नये. शेजारपाजारचे आणि रस्त्यावरील लोक मात्र हें सर्व पाहून कुचेष्टा करीत असावेत.

चित्रकथेच्या प्रत्येक नवीन पृष्ठावर चित्राची वेळ आणि स्थळ यांची नोंद अवश्य असावी. शिवाय प्रत्येक स्थलान्तराने आणि कालान्तराने नवीन पानास सुरुवात करावी. कारण अेक तर अशाने त्यांचा बोध चट्कन् होतो; आणि दुसरें पाहिजे तशा सोयीने चित्रकथेचे विभाग करतां येतात. साहजीकच ही गोष्ट दिग्दर्शक आणि अितर तंत्रज्ञ यांना सोअीची पडते. आणि थोडासा होणारा कागदाचा व्यय पुष्कळच त्रास आणि घोटाळा वांचवितो.

प्रत्येक शॉट ठरविण्यापूर्वी (१) या शॉटमध्ये काय सांगावयाचें अथवा दाखवावयाचें आहे, (२) हा शॉट अवश्य आहे काय, (३) त्यासाठी दृष्टिकोन कशा प्रकारचा घेतला असतां जें सांगावयाचें आहे तें अधिक परिणामकारक करतां येअील, (४) कॅमेऱ्याचें चित्रवस्तूपासून अंतर किती, (५) यांतून स्वभावरेखन, कथासूत्र, वातावरण किंवा रस यां-पैकी कशाचा परिपोष होत आहे, (६) हा स्वाभाविकपणें कथेंत येत आहे ना, (७) हा शॉट नेमका संपावयास पाहिजे तेथेच संपतो आहे ना? कीं कंटाळवाणा होतो आहे, (८) याच्यापुढील शॉट कोणता आहे, या प्रश्नांचीं अुत्तरें मिळवावीं लागतात. आणि तेवढीं

मिळाली की आपोआपच त्यांतील संवाद, त्याचा प्रकार, तो कोठे तोडावयाचा, आजूबाजूची परिस्थिति कशी पाहिजे, पार्श्वसंगीत कोणतें हें सर्व कळतें. संवयीने या प्रश्नांचीं उत्तरें मनांतल्या मनांत आपोआप मिळत जातात. निर्मितीचे कष्ट थोडेथोडके नाहीत पण अनुभव आणि प्रयत्न यांनी सहजसाध्य होणारे आहेत. स्फूर्ति हाहि भाग कांही मदत करतो. पण नव्वद टक्के घाम गाळावा तेव्हा दहा टक्के स्फूर्तीचा ओलावा त्यांत भरीला पडून परिपूर्णता यावयाची.

नुसती गोष्ट सांगणें अेवढेंच ध्येय न ठेवतां ती कौशल्याने सांगणें, चित्ररूपांत स्पष्टपणें ती डोळ्यांसमोर अुभी करणें हा चित्रकथालेखकाचा हेतु असावा लागतो. कलात्मकता हें चित्रकथालेखनाचें वैशिष्ट्य होय. स्वाभाविकसें भासणारें कृत्रिम वातावरण आणि नैसर्गिकसें वाटणारें विचारपूर्ण स्वभावरेखन यांनी नटलेली चित्रकथा अुत्तम होते. वातावरणाची अुत्पत्ति मौलिक असेल, मौजेची असेल, प्रेक्षकाच्या मनाला तंतोतंत पटणारी असेल, तर त्यांतच अर्धे-अधिक यश येअील. आणि स्वभावरेखन खऱ्या सृष्टींतील असेल, त्यांत सूक्ष्म निरीक्षणाच्या छटा प्रकट होत असतील, तर पूर्ण यश प्राप्त झाल्यावांचून राहणार नाही. स्वभावलेखन आणि वातावरण या दोन गोष्टी अेकदा नक्की झाल्या म्हणजे कथेचें स्वरूप अिष्ट आकाराविरुद्ध जाअू शकत नाही. कथेंतील घटनांमध्ये विकाससंगति आणि सुसंबद्धता असली म्हणजे पात्रांचे स्वभावच आपल्याशीं संगत असलेले विचार आणि घटना यांची वाढ आपल्या ताब्यांत ठेवीत असतात. शेवट करतांना विशेष काळजी घ्यावी लागते.

'तो' 'ती'च्या मागे लागला आहे. अगदी शेवटीं तो तिला गांठतो. त्याच वेळीं तिच्या वेणींतील गुलाबाची कळी खाली पडते.

दृश्य १० वें. वेळ : तीच. स्थळ : रस्त्याच्या कोपऱ्याजवळील भाग.

शॉट क्रमांक

१ क्लोझ अप् : गुलाबाचें फूल.

२ क्लोझ अप् टु क्लोझ शॉट (ट्रॉली) : फूल पडलेलें पाहून तो आनंदित होतो व मोठ्या सपाऱ्याने लोकांना बाजूला सारीत पुढे येतो. पण 'तो' त्या फुलाजवळ पोंचेपर्यंत 'ती खाली वाकलेली असते.

३ सेमी क्लोझ अप् : दोघेंहि फूल अुचलण्याकरिता खाली वाकतात (कॅमेराहि टिल्टेड् डाअून). त्याचा हात फुलाजवळ अगोदर पोंचतो आणि तो फूल अुचलतो (कॅमेरा टिल्टेड् अप्). दोघेंहि सरळ अुभीं राहतात.

४ क्लोज अप् : तो फुलाकडे आनंदाने पाहतो. फुलाचा हळूच वास घेतो.

५ क्लोज : 'ती' बावरलेली नजर त्याच्याकडे वळवते.

६ क्लोज् अप् टु क्लोज शॉट (ट्रॉली) — 'तो' 'ती'शीं बोलण्यास सुरुवात करतो. "अहो मिस्, हें तुमचं—".

फूल पुढे करतो (तिला देण्यासाठी जवळ जाऊं लागतो).
(ट्रॉली मागे नेणें.)
ती मागे वळते आणि तिला पाहतांच 'तो' चकित होऊन
जवळ जवळ ओरडतोच. "कोण ! ताओ ! तूं !"

या शॉट्मध्ये ती त्याची बहीण असते हें तर प्रेक्षकांना कळलेंच पण तें असें अचानक-रीत्या कळविल्यामुळे प्रेक्षकाच्या आतापर्यंत अधीर झालेल्या मनाच्या शंकांचें अेकदम समाधान व निरसन होऊन आपला अपेक्षाभंग किती चमत्कारिक रीतीने झाला यांतच त्यांना आनंद वाटेल आणि त्याच वेळीं त्याला मूर्च्छा येते असें दृश्य घेऊन फेड आऊट करून कथा समाप्त केली म्हणजे प्रेक्षकांच्या कुतूहलाच्या समाधानाची परिपूर्ति होअील.

चित्रकथा लिहितांना प्रेक्षकांचें मनोरंजन हा लेखकाचा मुख्य अुद्देश असून अितर गौण असतात; पण ही मनोरंजक कथाहि दिग्दर्शक आपल्या सोयीप्रमाणे थोडीशी बदलून घेतोच. हल्लीच्या सिनेमातंत्राप्रमाणे लॉंग शॉट, मिड् शॉट हे क्वचितच अुपयोगांत येतात. अेकदा सगळी सजावट व निरनिराळ्या व्यक्तींच्या जागा दाखविण्याकरिताच मीडियम् लॉंग शॉट वापरतात, पुढे क्लोज अप्, क्लोज शॉट आणि ट्रॉली शॉट्स यांवरच सारा भर असतो. दोन माणसें बोलत असल्याचें दाखवावयाचें असलें तर प्रथम अेकदा दोघेंहि अेकाच शॉट्मध्ये घेतल्यावर पुढे त्यांपैकी कोणाहि अेकाचा क्लोज अप् घातला व प्रतिचित्र म्हणून दुसऱ्याचा घातला तरी चालतें. शक्य तोंवर कॅमेऱ्याचे दृष्टिकोन अशा रीतीने बदलावयाचे असतात की चित्र कंटाळ-वाणें न होतां अुलट अधिक परिणामकारक व निरनिराळ्या बाजूंनी पाहिल्यासारखें वाटावें. कथा मनोरंजक झाली की कथालेखकाचें काय साध्य झालें.

५

चित्रकथा लिहून तयार झाली. आता तिची पुढली व्यवस्था ! त्यासाठी ती प्रथम दिग्दर्शकाच्या हातांत पडते. आणि मग ती किती खर्चात, कशी बसवितां येअील याचा विचार दिग्दर्शक आणि व्यवस्थापक मिळून करतात. त्या दोघांचा हस्तक म्हणून असिस्टंट डायरेक्टर ही व्यक्ति असते. दिग्दर्शकाचा सहायक हा जरी त्याचा मोठ्या मानाचा किताब दिसत असला तरी देशी स्टूडिओंतून त्याच्या अितकी अपमानास्पद परिस्थिति दुसऱ्या कुणा-लाहि अनुभवावी लागत नाही. त्याचें काम दिग्दर्शकासाठी सर्व पूर्वतयारी आपल्या हुकुमानें करवून घेणें हें असलें तरी वेळ आली म्हणजे सर्वांच्या शिव्या मात्र त्यालाच खाव्या लागतात. तालमी घेणें, आज्ञापत्रकें काढणें हीं कामें तो करतोच पण त्यांशिवाय दिग्दर्शकाची दृष्टि अधू असेल तर त्याचा चश्मा, नायकाची सिगारेट आणि नायिकेच्या बांगड्या यांची ठेवसुद्धा त्याच्याचजवळ असते आणि त्यांचा हुकूम होतांच त्याला ती आणून हजर करावी लागते.

दिग्दर्शक नटनटींची निवड करण्यांत आपलें लक्ष घालतो तेव्हा पाहावयाची पहिली गोष्ट म्हणजे नटाचा चेहरा छायाचित्रणानुकूल आहे कीं नाही. कारण नटाचा चेहेरा पडद्या-वर दिसतांच प्रेक्षकांना त्याबद्दल कांही तरी नावीन्य किंवा वैशिष्ट्य वाटलें पाहिजे : मग तें त्याच्या सौंदर्यामुळे असो, चमत्कारिकपणामुळे असो अथवा आणखी अेखाद्या असामान्य गोष्टीमुळे असो. प्रत्येक अुमेदवाराचा ज्यांत त्याला थोडी हालचाल करावयास लावलेली आहे असा अेखादा मिडियम्, अेखादा लॉंग शॉट, अेखादा क्लोजअप् घेऊन आणि दुसरे कांही स्टिल्

फोटो घेऊन त्याच्या साहाय्याने योग्य पात्रांची निवड करण्यांत येते. चित्रपटव्यवसायांत नट-नटींना स्वतःला असा फारसा वाव नाही; दिग्दर्शकाच्या हातांतलीं तीं बाहुलीं असतात. भूमिकेच्या स्वभावरेखनाशीं साधारण जुळता असा चेहेरा व आवाज, अुंची वगैरे दृष्टींनी नट ठीक असला म्हणजे झालें. त्याच्या हावभावांना आणि चेहेऱ्यावरील भावदर्शनाला वाव नाही असें नाही पण भूमिका चांगली करतां येण्यापेक्षा भूमिका तिच्या अपेक्षेबरहुकूम दिसणें हें चित्रपटांत परिणामकारकतेच्या दृष्टीने अधिक प्राथमिक महत्त्वाचें आहे. या दृष्टीने योग्य अशा नटनटींची निवड करणें हें झालें दिग्दर्शकाचें काम.

याच वेळीं व्यवस्थापक दुसरीकडे कामगारांचा संच आणि स्टूडिओ यांच्या व्यवस्थेंत दंग असतो. कारण त्याला मिळतील तेथून वाकबगार व जाणतीं माणसें आणवून त्यांच्याकडून सुसंघटित कार्य करवून घ्यावयाचें असतें. प्रत्येक गोष्ट आणि प्रत्येक व्यक्ति केवळ आपापल्या परीने चांगली असून चालत नाही. सर्व गोष्टी अेकमेकांवर थोड्याफार प्रमाणांत अवलंबून असल्यामुळे सर्वांच्या सहकार्यांत आणि सगळ्यांच्या गुणांची यथाप्रमाण योग्य सांगड घालण्यांतच सारें यश सांठलेलें असतें. ही सांगड दिद्गर्शक आणि व्यवस्थापक हे दोघे मिळून घालतात.

नटनटींची निवड करण्यांत येते त्याच वेळीं कामगारवर्ग निवडला जातो. या कामगारांचे पांच सहा विभाग पडतात व प्रत्येक विभागावर अेक अेक मुख्य असतो. त्याच्याकडे त्याच्या विभागाची सर्व जबाबदारी असते आणि या सर्वांवर देखरेख करणारा व्यवस्थापक. पैशाचा हिशेबी आयव्यय, कामगारवर्गाचा संतोष आणि दिद्गर्शकाच्या सोयी यांची जबाबदारी त्याचेवर असते. ज्या संस्थेचा तो व्यवस्थापक असतो त्या संस्थेचें काम सुरळित चाललेलें असलें म्हणजे त्याची जबाबदारी संपली.

कामगारवर्गांतील पहिल्या विभागाचा मुख्य अधिकारी कलादिद्गर्शक होय. स्टूडिओंतील सर्व कलाविभाग त्याने जबाबदारीने पाहावयाचा असतो. स्थलाची अुभारणी, ठिकठिकाणचें रंगकाम, चित्रकाम, मातकाम यांच्यावर देखरेख त्याचीच असते. बाहेरगांवचीं प्रेक्षणीय स्थळें, नदीकिनारा, बगीचा वगैरे दृश्यांच्या निवडींतहि त्याला बराच अधिकार असतो. त्याशिवाय नटनटींच्या कपड्यांच्या फॅशन्स, रंग, दृश्यस्थलांची सजावट व त्यांतील सामानाची मांडणी अित्यादि सगळें काम त्याच्याच देखरेखीखाली चालतें.

मुख्य काम स्थलाची अुभारणी. ती कोणकोणत्या दृष्टिकोनांनी नाट्यप्रसंग चित्रित करावयाचे आहेत, यावर अवलंबून असते. स्थलाचा कोणता भाग खरोखर अुभा करावयाचा आणि किती भागाचा आभास नुसत्या पार्श्वभूमीने आणि रंगीत कपड्यांनी अुत्पन्न करावयाचा हेंहि तोच ठरवितो. त्याच्या हाताखाली सुतार, मूर्तिकार, चित्रकार असतातच पण त्यांच्याकडून स्थलाची पाहिजे तशी कालप्रसंगानुरूप आणि नयनमनोहर अुभारणी करून घ्यावयाची जबाबदारी त्याच्यावरच असते.

स्थलाची अुभारणी करतांना चारहि भिंती अेकदम अुभ्या करून भागत नाही. कारण त्या चार भिंतींच्या आंत कॅमेरा, दिवे, कॅमेरामन, दिग्दर्शक, नट, नटी आणि अितर अेकशें अेक गोष्टी राहावयाच्या असतात. यासाठी निरनिराळे अेका स्थलाचे विभाग मांडावे लागतात. आपण कल्पना करूं या की ज्याच्या चार भिंतींत चार दरवाजे आहेत असा अेक दिवाणखाना आहे. पहिल्या भिंतींतील दरवाजा 'ताअी'च्या खोलींत अुघडतो, तिच्यासमोरच्या दुसऱ्या भिंतींतील दरवाजा 'बाबां'च्या खोलींत नेतो, तिसऱ्या भिंतींत 'बाबां'च्या खोलीचाहि दरवाजा आहे आणि तिच्या समोरील चौथ्या भिंतींतील दरवाजा हा 'दादा'च्या

खोलीचा दरवाजा आहे. आताच्या अेका दिवाणखान्याच्या या चारहि भिंती निरनिराळया प्रकारच्या आहेत. शिवाय त्यांतील दरवाजांचा संबंध निरनिराळया व्यक्तींशीं आहे. अशा प्रकारचा दिवाणखाना त्याचे दोन विभाग करून मांडावा लागेल. अेका विभागांत ताअी आणि दादा यांच्या खोलीचीं दारें आणि जरूर तेवढी भिंत, आणि दुसऱ्या विभागांत बाळ आणि बाबा यांच्या खोलीचीं दारें, आणि अुरलेल्या भिंती. यांच्या साहाय्याने खोलीच्या प्रत्येक कोपऱ्यांतील दृश्य पहिल्या अथवा दुसऱ्या विभागांत कोठेतरी घेतां येअीलच. भिंती खरोखरीच्या नसतात तर केवळ पडदे रंगवून तसला आभास अुत्पन्न केला जातो हें सांगावयास नकोच. परंतु अेवढे दोन भाग मांडूनहि भागेल असें नाही; कधी कधी चित्रक्षेत्रांत बाळ दादाच्या खोलींतून बाहेर पडतो आणि आपल्या खोलींत शिरतो असा अेखादा ट्रॉली शॉट असून बाळला मिडियम् क्लोज अपमध्ये ठेवावयाचें असेल, तर तो शॉट मध्ये तोडावा लागेल. आणि तसें केलें म्हणजे ट्रॉली शॉटचा अुद्देश असफल होअील. यासाठी निराळाच मार्ग स्वीकारणें जरूर होतें. दादाच्या खोलीच्या बाळकडील दरवाजापासून बाळच्या खोलीच्या दादाच्या खोलीकडील दारापर्यंतचा दिवाणखान्याचा भाग पुनः निराळा मांडतात आणि मगच हा ट्रॉली शॉट परिणामकारक रीत्या घेतां येतो. दिवाणखान्याच्या भिंती नुसते पडदे किंवा तात्पुरत्या लाकडाच्या फळया ठोकून केलेल्या असल्यामुळे साहजिकच त्या बदलण्यास व हालविण्यास मुळींच वेळ लागत नाही.

याचप्रमाणे प्रत्येक घर किंवा खोली यांचा आंतील भाग आणि बाहेरील भाग निरनिराळा मांडावा लागतो. कारण खोलीच्या आंतून बाहेर येणारी व्यक्ति दाखविण्यासाठी जे दृष्टिकोन वापरावे लागतील ते खोलीच्या आंत मावूं शकतीलच असें थोडेंच आहे.

कांही वेळां भास अुत्पन्न करण्याची आणखी अेक युक्ति अंमलांत आणावी लागते. समजा अंगणांत असलेलें अेक झाड अेका दारांतून कॅमेऱ्याच्या दृष्टिकोनांत येत आहे. दृष्टिकोन सरळ दाराकडे धरला म्हणजे तें दाराच्या मधोमध येतें. पण आता आपण कांही विशिष्ट कारणांसाठी दृष्टिकोन अेका बाजूने घेतला आणि दार दृष्टिकोनांत ठेवलें तर मूळच्या जागीं असलेलें झाड दिसेनासें किंवा अेका बाजूला गेल्यासारखें दिसेल; आणि वास्तविक जरी कॅमेऱ्याचा दृष्टिकोन बदलला असला तरी पडद्यावर दाराचीच जागा बदलल्यासारखी वाटेल; कारण प्रथम दार पाहतांना त्यांतून मधोमध दिसत असलेल्या झाडावर प्रेक्षकाची दृष्टि केंद्रित झालेली होती. हा भास अुत्पन्न होअूं नये म्हणून झाडच दृष्टिकोनाच्या विरुद्ध दिशेला सरकवून घ्यावें लागतें; ते अितकें की त्या ठराविक दिशेने पाहिल्यावर तें दाराच्या मधोमध दिसेल. हा त्रास वांचविण्याकरिता कथा लिहितांनाच अशा दृष्टिकोन घेण्याचे वेळीं दार बंद राहील अशी व्यवस्था करणेंहि शक्य असतें. पण झाड हलविणें हाच मार्ग अधिक सोपा व परिणामक्षमतेची कमी हानि करणारा.

कलादिग्दर्शकाला या कामांत कॅमेरामनची चांगलीच मदत मिळते. कारण कोणता रंग फिल्मवर किती काळा येअील आणि कोणता किती पांढरा येअील किंवा कॅमेऱ्याच्या दृष्टिकोनांतून काय कसें दिसेल याची कल्पना त्याच्याअितकी दुसऱ्या कोणालाच नसते.

स्थलाची अुभारणी झाली म्हणजे त्या स्थळीं ठेवावयाच्या अितर वस्तूंची जमवाजमव करून, दिग्दर्शकाचा मदतनीस आणि कलादिग्दर्शक यांच्या सूचनेप्रमाणे त्या मांडण्याच्या कामावर अेक दुय्यम व्यवस्थापक असतो. त्याच्या ताब्यांत टेबल, खुर्च्या, सतरंज्या, देवळांतल्या घंटा, यांपासून तों तहत गाअी, म्हशी, मांजरें येथपर्यंतचें सर्व 'सामान' असतें.

कलादिग्दर्शकावर पुष्कळदा आणखी एक महत्त्वाची जबाबदारी असते. अेखाद्या शहराला आग लागणें, नदीकिनारीं वसलेलें गांव बुडून जाणें, असलीं दृश्यें चित्रित करावयाचीं असतील तर शहराला आग लावणें किंवा नदीला पूर आणणें हें शक्य नाही. त्यासाठी लहान प्रमाणावर शहरें व गांवें हीं तयार करावीं लागतात. यांचें अगदी जवळून चित्रीकरण केलें म्हणजे खऱ्या खऱ्या शहर गांवांचा आभास अुत्पन्न करतां येतो. नटनटींचे त्या त्या पात्रांसाठी लागणारे वेषहि तज्ज्ञांच्या सहकार्यानें कलादिग्दर्शकच निवडतो. आधुनिक कालांत त्यांची फारशी जरूरी नसली तरी अैतिहासिक आणि पौराणिक कालांतील पोशाख, आयुधें, अलंकार, पेटे, पगड्या, मुकुट किंवा असल्याच अितर चमत्कारिक चिजा योग्य प्रकारें तयार व्हाव्या लागतात.

कलादिग्दर्शकानंतर दुसरी महत्त्वाची व्यक्ति म्हणजे मेक अप् मॅन. केवळ मेक अप् करून अेखादा नट अमुक अेकाशीं बराच सारखा दिसतो म्हणूनहि दिग्दर्शकाने त्याची निवड केलेली असते. पण बराच सारखा दिसणारा नट हुबेहूब पाहिजे तसा दिसावा म्हणून मेक अप् मॅनची गरज भासते. तरुण चेहरा मेक अप् केल्याने पाहिजे तसा वृद्ध दिसूं शकतो : डोळ्यांचीं वर्तुळें काळीं केल्याने; कपाळावर व गालांवर सुरकुत्या पाडल्याने नवीन मनुष्य निर्माण करतां येतो. दाढीमिशा लावलेला मेडअप् चेहरा आणि नेहमीचा साधा चेहरा यांत हाच तो हें ओळखूं येण्याअितकें सुद्धा साम्य अुरत नाही. मास्टर विनायक यांचे सैरंध्री किंवा देवतामधील मेकअप् हीं याचीं अत्युत्कृष्ट अुदाहरणें आहेत. फ्रेड्रिक मार्चचा 'डॉ. जेकील अँड मिस्टर हाअिड' किंवा पॉल म्युनीचे 'अेमिल झोला' आणि 'गुड अर्थ' हे चित्रपट ज्यांनी पाहिले असतील त्यांना तर मेक-अप् मॅनच्या कलेचा चांगलाच परिचय असेल. मेक अप् मॅनने केलेला मेक अप् प्रथम कॅमेरा-मनला पसंत पडावा लागतो. चित्रपटनिर्मितीच्या कामांत कॅमेरामन ही अेक अत्यंत महत्वाची व्यक्ति असते. तो कॅमेऱ्याची रचना, त्याचें तंत्र सगळें कांही जाणतो. शिवाय त्याला लॅबोरेटरी-चेंहि बरेंच ज्ञान असतें. तेथे डेव्हेलपिंग, प्रिंटिंग कसें होणार आहे याचाहि संबंध त्याच्या कामाशीं असतोच. आणि शूटिंग चालू असतांना त्याचे अधिकार दिग्दर्शकाच्या खालोखाल असतात. पडद्यावर काय कसें दिसेल याची कल्पना त्याच्याअितकी दुसऱ्या कोणालाच नसते. त्याला कलादिग्दर्शकाची आणि कलादिग्दर्शकाला त्याची सर्व कामांत मदत होअूं शकते. शिवाय दिवे आणि प्रकाशरचनेच्या बाबतींत विद्युत्तज्ज्ञाचेंहि सहकार्य त्याला घेतां येतें.

ध्वनीचें चित्रीकरण करण्यासाठी अेक साअुंड अिंजिनीयर असतो. नटनटींचे संवाद, गाणीं व निरनिराळे आवाज फिल्मवर चित्रित करणें हें त्याचें काम असतें.

शूटिंग चालू असतांना टिपणें घेण्यासाठी अेक व्यक्ति असते. परदेशांत ही बहुधा मुलगी असते आणि तिला कंटिन्युअिटी गर्ल म्हणतात. आपल्याकडे असिस्टंट डायरेक्टर किंवा ओडिटरच हें काम करतो.

लॅबोरेटेरीमध्ये निगेटिव्ह आणि पॉझिटिव्ह फिल्म डेव्हेलप करणें आणि निगेटिव्हवरून पॉझिटिव्ह छापून तयार करणें वगैरे कामें होतात.

अेतद्देशीय बोलपटांसाठी अेक संगीतदिग्दर्शक पदें बसविणें, त्यांच्या चाली ठरविणें यांसाठी अवश्य असतो. कारण गाणीं हा देशी बोलपटांचा आत्मा आहे. पार्श्वसंगीताचीहि रचना संगीतदिग्दर्शकच करतो.

[ अपूर्ण.

# संपादकीय

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा हा तेराव्या वर्षाचा दुसरा अंक, आपल्या हातीं देतांना मला अत्यंत आनंद होत आहे. संपादकाच्या स्थानीं माझी योजना झाल्यापासून, या वर्षाचा पहिला अंक निघण्याच्या वेळेपर्यंत, फारच थोडा अवधि बाकी असल्यामुळे, त्या अंकाचें संपादन व प्रकाशन, कांहींसें गडबडीने करूनहि विलंबानेच करावें लागलें; परंतु या अंकाचें प्रकाशन मात्र ठरल्यावेळींच करण्याचा प्रयत्न केला आहे.

पहिल्या अंकांतील 'संपादकीय' लिहितांना, "संपादकाच्या पदावर कोणीहि व्यक्ति असली, तरी तिच्या अभिरुचीला व कल्पकतेला, कांही ना कांही स्वभावविशिष्ट मर्यादा असणारच; साहजिकच कुणाहि संपादकाकडून झालेल्या मजकुराची व विषयांची निवड व मांडणी, सर्वच्या सर्व वाचकांना सारखीच रुचेल किंवा योग्य वाटेल, अशी अपेक्षा करणें व्यर्थ आहे" असें मीं म्हटलें होतें.

माझ्या या विधानाचें प्रत्यंतर, कांही अंशीं मला त्या पहिल्याच अंकाच्या बाबत आलें. त्या अंकांत श्री. त्र्यं. शं. शेजवलकर यांच्या लेखसंग्रहाच्या प्रस्तावनेंतून अुद्धृत केलेल्या भागाने, कांही साहित्यिकांना विषाद वाटला; व त्यांनी तो प्रत्यक्ष भाषणांत, वा पत्रद्वारें माझ्याजवळ व्यक्तहि केला. 'आशा', 'ज्ञानप्रकाश' वगैरे पत्रांतून त्या लेखाबाबत टीकाहि आली; परंतु 'सह्याद्री' मासिकाच्या अेप्रील महिन्याच्या अंकांत कुणी अेका 'बुरुजावरून अैक-णाऱ्या' बुरखेवाल्याने जो थयथयाट केला आहे, तो मात्र अजब आहे. श्री. शेजवलकर यांच्या लेखाने खळबळाट अुडावा, ही गोष्ट अनपेक्षित नव्हती; परंतु त्यामुळे कुणी अेखादा बुरखे-वाला साहित्यिक, शिष्टसंप्रदाय आणि सदभिरुचि विसरून जाअून, निरर्गल शिव्या देण्या-अितका वेडापिसा होअून जाअील, असें मात्र मला कधीच वाटलें नव्हतें.

वास्तविक पाहतां, 'सह्याद्री'तील तो लेख टोपणनांवाखाली यावयास नको होता. तो लेख टोपणनांवाखाली येअूं देअून सह्याद्रीच्या संपादकांनी, त्या लेखांत ज्या मान्यवर साहित्यिकांची बाजू आपण पुढे मांडण्याचा प्रयत्न करीत आहोंत, असा आभास लेखकाने निर्माण केला आहे, त्यांनी मोठा अन्याय केला आहे. साहित्याचार्य तात्यासाहेब केळकर किंवा 'केसरी'चे विद्वान संपादक श्री तात्यासाहेब करंदीकर, यांपैकीच कोणींतरी हा लेख लिहिला असावा, असा या टोपणनांवाच्या आडपडद्यामुळे, कांही लोक कयास बांधण्याचा संभव आहे; किंबहुना तसा कयास कांही साहित्यिकांनी 'मनच्या मनिंची खूण' ओळखून निश्चितपणें बांधला आहे, असें मला प्रत्यक्ष आढळून आलें आहे. अर्थात् व्यक्तिशः माझा स्वतःचा या कल्पनेवर मुळीच विश्वास नाही. श्री. तात्यासाहेब केळकर किंवा श्री. तात्यासाहेब करंदीकर, यांच्यासारखे धकाधकीच्या मामल्यांतून तपेंच्या तपें कार्य करीत आलेले धीरगंभीर पुरुष, 'बुरुजावरून अैकणाऱ्या'च्या लेखणींतून अुतरलेल्या लेखासारखा शिवराळ, ओंगळ, अुथळ, अश्लील, पोरकट लेख लिहिण्याअितके खाली अुतरूं शकतील, अशी मला कल्पने-साठीहि कल्पना करतां येत नाही. परंतु ज्या अर्थी कांही व्यक्ति, अगदी आंतरिक खातर-जमेने, असें अनुमान बांधूं शकतात, अितकेंच नव्हे तर तसें अुघडपणें बोलूनहि दाखवितात, त्या अर्थी 'सह्याद्री'च्या संपादकमहाशयांनी हा लेख टोपणनांवाखाली येअूं द्यावयालाच नको होता, असें म्हणण्याखेरीज दुसरें गत्यंतरच नाही.

'बुरुजावरून अैकणाऱ्या' या बुरखेवाल्याच्या त्या लेखांत श्री. शेजवलकर व पत्रिकेचे

संपादक या दोषांवरहि मनसोक्त तोंडसुख घेण्यांत आलें आहे. "पठाणाचा जुलूम असह्य झाला म्हणजे त्याचाहि कान धरणारा गुरु भेटतो" असें हा लेखक अेके ठिकाणीं म्हणतो. श्री. शेजवलकर यांचा लेख स्वतःच्या सहीखाली असल्यामुळे त्या 'पठाणा'चा चेहेरा, पाहणाऱ्यांच्या नजरेपुढे आहे, पण या कान धरण्याच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगणाऱ्या गांवगुंडाला मात्र, आपल्या तोंडावरून बुरखा घेअून तें लपविण्याची आवश्यकता वाटली आहे. यावरून हें कान धरणें नसून हा अंधारांत राहून लुगा वार करण्याचा भेकडपणा आहे, यापलीकडे त्याला ज्यास्त महत्त्व नाही, हें अुघड आहे. श्री. शेजवलकर यांच्यावर जे आक्षेप घेतले आहेत व त्यांना जी शिवीगाळ करण्यांत आली आहे, तिचा समाचार घेण्यास ते समर्थ आहेत. येथे फक्त संपादकीय धोरणाबाबत विचार करणेंच प्रस्तुत होय.

कोणत्याहि विवाद्य लेखनाबाबत जो संपादकीय शिष्टसंप्रदाय असतो, त्याप्रमाणे "श्री. शेजवलकर यांच्या विधानांचा निरास करण्यासाठी कोणी तात्त्विक भूमिकेवरून त्यांच्या चिकित्सेचा व निदानांचा अुत्तरपक्ष केला तर तें अत्यंत अुद्बोधक व अुपयुक्त होअील" असें आमंत्रण मीं दिलें होतें; हें हा 'बुरजावरचा बुरखेवाला' नाकारूं शकत नाही. मात्र त्यांतून पळवाट काढण्यासाठी तो असा कांगावा करतो की, "संपादकीय स्वातंत्र्य अबाधित असतें, यामुळे माझें हें अुत्तर त्या त्रैमासिकाकडे पाठविल्यास तें, 'तात्त्विक' भूमिकेवरून लिहिलेलें नाही, असा त्यावर संपादकीय शेरा पडून तें साभार परत होण्याचा संभव आहे, म्हणून, 'सह्याद्री'चा आश्रय केला आहे." 'तात्त्विक भूमिकेवरून लिहिलेलें नाही' म्हणून आपलें अुत्तर साहित्यपत्रिकेच्या संपादकांकडून परत आलें असतें, अशी तें नाकारलें जाण्याच्या कारणाची कल्पित वडेजावी आपल्या लेखावर लादून, या 'बुरुजावरून अैकणाऱ्या'ने अुगीचच स्वतःच्या लेखाला मोराचीं पिसें चिकटवून घेण्याचें अवडंबर केलें आहे. त्या लेखांत, श्री. तात्यासाहेब केळकर व श्री. तात्यासाहेब करंदीकर, यांची बाजू मांडण्याचा जो आव आणला आहे, तो नसता, तर सह्याद्रीसारख्या सभ्य मासिकाच्या कचेरींतहि या लेखाची वशिल्याची वर्णी न लागतां, त्याची केराच्या टोपलींतच बोळवण झाली असती. श्री. तात्यासाहेब केळकर किंवा श्री. तात्यासाहेब करंदीकर यांच्या नजरेस हा लेख पडला असता तर त्यांनी, श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या 'तोतयाचें बंड' या नाटकांतील नाना फडणीस ज्याप्रमाणे रामचंद्र नाअीकाला "शेषाचा भार हलका करायला सरड्याने धावून येण्याची गरज नाही," असें सांगतो त्याप्रमाणेच लेखकाला सांगितलें असते; परंतु बहुधा कुणा तरी दुय्यम व्यक्तीच्या, श्री. तात्यासाहेब केळकर व श्री. तात्यासाहेब करंदीकर यांना खूष करण्याच्या दुर्दम्य अुत्साहाच्या भरांत गफलतीने हा लेख 'सह्याद्री'त समाविष्ट झालेला असावा. कारण, अुदाहरणार्थ त्या लेखांतील कांही मासलेवाअीक वाक्यें पाहा :—

"अुपडें पडणारें बालक जसें आपले हात घाणींत भरतें तसे या लेखाने आपले हात शे०नी घाण केले आहेत.", "प्रस्तुतचा लेख लिहिण्यांत मला लोभ नाही, कारण शेजवलकर मला काय काढून देणार!", "तरी धर्माला, शे०नी असें नाही म्हटलें की, जो दोन बापांचा असेल त्यालाच माझा लेख पटणार नाही", "शेजवलकर दांत काढून सांगतात—", "... करंदीकर आपल्या पितरांचीं श्राद्धें करतात आणि शे०ना मात्र आपले बाप सोडून परक्यांचे पितर तर्पणाला आणावेसे वाटतात.", "वासनांच्या अतृप्तीमुळे पिशाचयोनींत शिरून लोकांना अुपद्रव करणारा शे०चा आत्मा, या बलिदानाने तरी गति घेवो.", "पण खुंटावर बसूनहि आमंत्रण न येणारा न्हावी मग घरच्या घरीं मडक्याला काजळ फासून त्याची हजामत करीत

बसतो म्हणतात तसें शे०चें झालें आहे." यांशिवाय मूलभूत या शब्दाचा पदविच्छेद करून, त्यावर केलेला, "शे०चें इतिहासकार्य 'मूल' म्हणजे बालिश असतें व 'भूत' म्हणजे भेसूर असतें." हा पोरकट कोटिक्रम; अवतरणें देतांना मधून मधून कंसांत घुसडलेले "अरेरे, किती कोवळें मन !", "ऐका, ऐका !", "किती शहाणपणाची सूचना !" वगैरे, यांसारखे उद्गार व बीभत्स आणि अश्लील शब्दप्रयोग ज्या लेखांत येऊं शकतात तो सदभिरुचीचा खून करणारा, ओंगळ, अश्लील, शिवराळ, पोरकट लेख, केवळ 'तात्त्विक भूमिकेवरून लिहिलेला नाही,' एवढ्याच कारणासाठी पत्रिकेच्या संपादकाला परत करावा लागला असता कीं काय, याचा वाचकांनीच विचार करावा.

. आपण आपला लेख पत्रिकेकडे न पाठवितां, 'सह्याद्री'कडे कां पाठविला, याचें लेखकानें जें समर्थन केलें आहे, त्याचा पोकळपणा वरीलप्रमाणे दाखविल्यावर आता त्याच्या अितर आक्षेपांकडे वळतों.

त्याचा पहिला आक्षेप म्हणजे, "महाराष्ट्रांतील यच्चयावत् साहित्यिक वर्गावर अशा प्रकारचा हल्ला करणारा हा लेख पत्रिकेंत यायला नको होता." दुसरें विधान म्हणजे, "शेजवलकरांचा हा लेख पत्रिकेंत आला तो नव्या संपादकीय कारकीर्दीला अशुभ शकुन झाला." तिसरें म्हणजे, श्री. शेजवलकर यांचा तो लेख, "मुद्दामच त्यांच्या अनुमतीने अुद्धृत केला आहे" असें म्हटलें तें कां ! "त्या लेखाशिवाय काय अडलें होतें !" आणि चवथें, आणि शेवटचें म्हणजे, "यावरून स्वतः संपादकांचीं मतें शेजवलकरांसारखींच आहेत, असें कोणी अनुमान केल्यास त्यांत काय चूक !"

ज्या लेखांत यच्चयावत् साहित्यिक वर्गावर हल्ला आहे, तो लेख साहित्यपत्रिकेंत उद्धृत करावयाचा नाही, तर कुठे ! 'साहित्यपत्रिका' हें साहित्यपरिषदेचें मुखपत्र; सर्व साहित्यिकांचें प्रातिनिधिक नियतकालिक. सर्व प्रकारची साहित्यविषयक चर्चा, मग ती प्रिय असो वा अप्रिय असो, त्यांतून व्हावी हें केव्हाहि आवश्यक. तेव्हा या दृष्टीने सर्व साहित्यिक वर्गावर हल्ला करणारा हा लेख पत्रिकेंत अंतर्भूत करण्यांत, माझ्या मतें, मीं अत्यंत अुचित अशीच गोष्ट केली आहे; परंतु 'बुरूजावरून ऐकणाऱ्या'ला तसें वाटत नाही, याला माझा नाअिलाज आहे. कदाचित् त्याच्या दृष्टीने 'अुद्यम' किंवा 'कुंडलीविज्ञान' या मासिकांतून तो लेख उद्धृत होणें अधिक समुचित ठरलें असतें. शिवाय मोठ्या नाअिलाजाने असें म्हणावें लागतें की, 'बुरूजावरून ऐकणाऱ्या' बुरखेवाल्याला श्री. शेजवलकर यांच्या लेखाचें मर्मच कळूं शकलें नाही. वास्तविक पाहतां श्री. शेजवलकर हे कांही सूचित व्यक्ति व संस्था यांना अुदाहरण मात्र करून, विशिष्ट युगप्रवृत्तीच्या व वार्गिक विचारसरणीच्या अनिष्टतेची आपल्या दृष्टीने छाननी करीत आहेत. पण या विचाऱ्या बुरखेवाल्याची नजर मात्र त्या व्यक्ति आणि संस्था यांवरच तेवढी खिळून आहे. आनुषंगिक तत्त्वचर्चेचा त्याला कांहीच बोध होत नाही; परंतु 'बुरूजावरून ऐकणाऱ्या'च्या या लिखाणांतील अेकंदर मजकुरावरून, त्याला अितका शास्त्रीय विचार पेलण्याची कुवत नाही, हें स्पष्ट दिसत असल्यामुळे, तो मुद्दा सोडून देणेंच बरें. साधी आणि सरळ गोष्ट ही की, जो सर्वांवरच टीका करतो, तो व्यक्तिशः कोणावरच टीका करीत नाही. श्री. शेजवलकर यांचे जे मतभेद आहेत, ते मूलभूत स्वरूपाचे आहेत. श्री. शेजवलकर हे ज्याप्रमाणे साहित्यिकांवर टीका करतात त्याचप्रमाणे जडवादी साम्यवाद्यांवरहि करतात. त्यांना अेक स्वतंत्र पक्ष आहे. कदाचित् त्यांत ते अगदी अेकटेच असतील. परंतु निश्चितपणें त्यांना कांहीतरी म्हणावयाचें आहे व तें त्यांनी अत्यंत सुश्लिष्ट, अर्थवाही,

भव्य व सावेश पण सभ्य अशा भाषासरणींत म्हटलें आहे. तें कोणाला आवडेल किंवा आवडणार नाहीं; पटेल किंवा पटणार नाहीं; परंतु साहित्यपत्रिकेचा संपादक या नात्याने, आपल्या हातीं असलेल्या नियतकालिकांतून तें आपल्या साहित्यिक वाचकांच्या नजरेपुढे आणणें, हें माझें कर्तव्यच होतें, असें मी मानतों. साहित्याची आणि साहित्यिकांची स्तुति आणि बडेजावी तेवढीच साहित्यपत्रिकेंत छापावयाची आणि तद्विरुद्ध असें मत कोठे प्रकट झालें तर त्याची गळचेपी करावयाची, हा 'सह्याद्री'तील 'बुरुजावरून अैकणारा'प्रणीत दंडक मला संमत नसल्यामुळे, स्वतःच्या वर्गाच्या स्तुतीपेक्षा त्याच्यावरील टीका, आक्षेप, त्याचें दोषनिदर्शन, हेंच अधिक अुपयुक्त व दृष्टि अंतर्मुख करावयाला अधिक अुपकारक, म्हणून श्री. शेजवलकरांचा तो लेख मुद्दामच त्यांच्या अनुमतीने मीं अुद्धृत केला होता.

परंतु तसें मीं प्रामाणिकपणें म्हटलें हें मात्र या 'बुरुजावरून अैकणारा'ला आवडलें नाही. लेखकाची मुलहिजा ती काय ! त्याची अनुमति कशाबद्दल ! त्याचे लेख आपण त्याला कांही अेक मोबदला न देतां छापतों, हाहि आपण त्याच्यावर अुपकार न करतों; त्याबद्दल त्याने आपले आभार मानावेत; आपण त्याच्याबद्दल कसलें कृतज्ञ राहावयाचें ! अशी या 'बुरुजावरून अैकणारा'ची विचारसरणी दिसते. वशिल्याच्या जोरावर आपलें लिखाण मासिकांतून घुसळूं देअूं शकणाऱ्यांची मनोरचना अशी असणें, स्वाभाविक आहे; पण संपादक या नात्याने पत्रिकेच्या लेखकांबाबत मी तशी वृत्ति ठेवूं शकत नाहीं याबद्दल 'बुरुजावरील बुरखेवाल्या'चा माझ्यावर कितीहि राग झाला तरी माझा नाअिलाज आहे. श्री. शेजवलकर यांनी अन्य संदर्भात लिहिलेल्या लिखाणांतील कांही भाग, मला अुद्धृत करण्यासारखा वाटला, आणि म्हणून तो अुद्धृत करण्यासाठी मीं त्यांची अनुमति घेतली; या गोष्टीचा अुल्लेख ही अेक साधी व्यवहाराची आणि शिष्टसंप्रदायाची बाब आहे. त्याबद्दल 'बुरुजावरून अैकणारा'ला विषाद कां वाटावा हें समजणें कठीण आहे. 'त्याशिवाय काय अडलें होतें !' असा प्रश्न तो करतो. चांगल्या लेखांशिवाय व लेखकांशिवाय नियतकालिकांच्या संपादकाचें काय व कसें अडतें, याचें अुत्तर 'सह्याद्री'चे संपादकच त्याला माझ्यापेक्षा अधिक अधिकारवाणीने देअूं शकतील. श्री. शेजवलकर यांच्या लेखांतील कडवटपणासाठी त्याला बहिष्कृत करणें, हें लाडिक पूर्वज-गौरव आणि खुशामती आत्मगौरव यांची आवड असणारांनाच काय तें शक्य आहे. श्री. शेजवलकर यांच्या त्या लेखांत कांही सन्मान्य व्यक्तींबद्दल बरेवाअीट सूचक संदर्भ आले, म्हणून त्या व्यक्तींबद्दल वाचकवर्गात अेकदम आदर-अनादर, प्रीति-अप्रीति, अुत्पन्न होअील, अितकें त्या त्या व्यक्तींचें साहित्यांतील व समाजांतील स्थान डळमळीत आहे, अशी या 'बुरुजावरून अैकणारा'ची बावळी समजूत दिसते. परंतु मला तसें मुळीच वाटत नाही. श्री. शेजवलकरांच्या स्वतःच्या नांवाखाली लिहिलेल्या त्या लेखांतून, फार तर त्यांना त्या व्यक्तींबद्दल काय वाटतें, हें ध्वनित होअील. त्यांच्या दृष्टिकोणाने, कोणाचें काय मूल्यमापन होतें, याचें तें निदर्शक होअील. त्यांचें तें वैयक्तिक मतप्रदर्शन होअील. परंतु अशा प्रकारचा दर्जा सांभाळून लिहिलेल्या दृष्टिकोणाला आणि मूल्यमापनाला, केवळ तें आपल्याला आवडत नाही म्हणून, पुढे येण्याला अवसर न देणें, किंबहुना थोडें बाजूला जाअूनहिं त्याला आपल्यांत अंतर्भूत करण्याचा प्रयत्न न करणें, हें संकुचित दृष्टीचें आणि कंपूशाहीचें द्योतक आहे; आणि 'बुरुजावरून अैकणाऱ्या'चा हा लेख म्हणजे श्री. शेजवलकर यांच्या आक्षेपाचें मूर्तिमंत प्रात्यक्षिक आहे.

'बुरुजावरून अैकणारा' पुढे लिहितो की, "शेजवलकरांचा हा लेख पत्रिकेंत आला, तो नव्या संपादकीय कारकीर्दीला अशुभ शकुन झाला अशी मला भीति वाटते." या भीतिवाचक

अुद्गारांतील गर्भित धमकी, अगदी वर वर पाहाणारालाहि सहज कळून येणारी आहे. पुण्यांतील साहित्यकारण कसें चालतें, ही गोष्ट आता अितकी जगजाहीर आहे, की या अुद्गारांतील ध्वनि काय आहे, यावर भाष्य करण्याचीहि जरूर नाही. पण अशा रीतीने कोणाहि समर्थासमर्थ कंपूच्या छुप्या हुकूमशाहीपुढे सहजासहजी मान झुकवणारा साहित्यपत्रिकेचा सध्याचा संपादक नाही, हें 'बुरुजावरून अैकणारा'ला कदाचित् माहीत नसेल. मतस्वातंत्र्यावर दडपण आलें, अधिकारावर नियंत्रण पडलें, तरी मानाच्या, अधिकाराच्या, प्राप्तीच्या जागेला मुंगळ्याप्रमाणे चिकटून राहावयाचेंच, अशी त्याची मनोवृत्ति नाही, अेवढीच खूणगांठ 'बुरूजावरून अैकणाऱ्या'ने आपल्या मनांत बांधून ठेवावी. शकुनापशकुनाची क्षिति आपल्या लायकीपेक्षा अधिक योग्यतेचीं स्थानें सुशोभित करणाऱ्या मिंध्या वशिलेबहादूर पोटभरूना; कोणी खुष होवो वा नाखुष होवो, आपलें प्राप्त कर्तव्य जबाबदारीने, परिश्रमाने पार पाडण्याचा प्रयत्न करणाऱ्या स्वतंत्र वृत्तीच्या निःस्पृह कार्यकर्त्यांना नव्हे.

शेवटीं या 'बुरुजावरून अैकणाऱ्या'ने मोठ्या अक्कलहुशारीने असा प्रश्न टाकला आहे की, "यावरून स्वतः संपादकांचीं मतें शेजवलकरांसारखींच आहेत असें मानल्यास त्यांत काय चूक!" अर्थात् यांत चूक अेवढीच की तसें मानल्यास त्याबरोबरच संपादकाचीं मतें श्री. ना.गो. चापेकर, श्री. नी. शं. नवरे, श्री. ना. ग. जोशी, श्री. गो. म. जोशी, श्री. श्री. म. माटे, श्री. त्र्यं. गो. ढवळे, श्री. चिं. ग. काशीकर, श्री. अ. ज. करंदीकर, श्री. गो. कृ. मोडक, श्री. श्री. बा. रानडे आणि श्री. श. य. गुणे यांच्याहिसारखींच आहेत असेंहि मानावें लागेल. आपणांशीं सहमत असणाऱ्या तेवढ्याच लेखकांचे लेख आपल्या नियतकालिकांत छापावयाचे, असें धोरण कुणाहि संपादकाने ठेवल्यास, खास अनवस्था प्रसंग निर्माण झाल्याशिवाय राहणार नाही. नांवानिशी लिहिलेल्या लेखाबाबत संपादकाचा संबंध त्यांतील मताशीं नसून, फक्त त्याच्या दर्जाबद्दलच्या निर्णयापुरता असतो, ही अेखाद्या शाळकरी पोराला माहित असलेली गोष्ट आहे. शिवाय साहित्यपत्रिकेच्या सध्याच्या संपादकाचीं मतें काय आहेत, ही गोष्ट अशी अप्रत्यक्ष अनुमानाने तर्कण्याची जरुरी नाही. आज अुणींपुरीं बारा वर्षे, तीं त्याच्या नांवाने वेगवेगळ्या प्रमुख नियतकालिकांतून वाचकवर्गांपुढे येत आहेत. संपादकाला ज्या वेळीं आपलीं वैयक्तिक मतें साहित्यपत्रिकेंत मांडावयाचीं असतील, तेव्हा तो अेक लेखक या नात्याने तीं आपल्या नांवाने मांडील. पण तोंपर्यंत संपादकाचीं वैयक्तिक मतें आणि त्याचें पत्रिकेचें संपादनकार्य, या दोन अगदी वेगवेगळ्या गोष्टी राहतील व संपादक या नात्याने, स्वतःच्या मताची कदर न करतां, त्याला जें वाचकांपुढे येणें योग्य, अिष्ट व आवश्यक आहे असें वाटेल तें त्यांच्यापुढे आणणें हें त्याचें कर्तव्य आहे. तेव्हा या बाबतींत कोणत्याहि प्रकारचा शब्दच्छल न करतां, कांही गोष्टी स्पष्ट सांगून टाकणें, आवश्यक आहे. श्री. शेजवलकर यांच्या लेखांत कांही आदरणीय व्यक्तींबद्दल आक्षेप घेणारीं मतें प्रकट झालीं म्हणून त्या व्यक्तींबद्दल व त्यांच्या योग्यतेबद्दल माझींहि तशींच मतें आहेत, असें गृहीत धरणें जसें तर्कदुष्ट, तसेंच 'बुरुजावरून अैकणाऱ्या'ने श्री. शेजवलकर यांच्याबद्दल आपलीं कांही मतें आपल्या लेखांत प्रकट केलीं, म्हणून मींहि ती मान्य करावीं अशी अपेक्षा करणें हेंहि चूकच! श्री. शेजवलकर व त्यांचे लेख यांच्याबद्दलचीं माझीं मतें, मीं पहिल्या अंकांतील त्यांच्याबद्दलच्या मजकुरांत व्यक्त केलीं आहेत व तीं आजहि जशींच्या तशींच कायम आहेत. माझ्या 'गुरुकुलक्लिष्ट' या विशेषणापुढे प्रश्नचिन्ह टाकून 'बुरुजावरून अैकणाऱ्या'ने विनोदाचा प्रयत्न केलेला दिसतो. मुरारि कवीच्या "जानीते नितरामसौ गुरुकुलक्लिष्टोमुरारिः कविः" या

स्वतःबद्दलच्या पद्यपंक्तींतील तें अेक विशेषण आहे. मुरारि हा पंडित कवि होता. यामुळे केवळ लालित्य, स्फूर्ति, प्रतिभा यांचा बडेजाव करणाऱ्या अपण्डित कवींबद्दल त्याला फार तिरस्कार वाटे. विषयाचें तलस्पर्शी अवगाहन तो विशेष महत्त्वाचें मानी. त्याने म्हटलें आहे की, "रामसैन्यांतील वानरांनी समुद्र अुल्लंघिला मात्र असेल; परंतु त्याची खोली काय आहे, हें पाताळाचा ठाव घेणाऱ्या पीवरतनु मन्थाचलालाच काय तें माहीत." ("अब्धिर्लंघित एव वानर-भटैः किन्त्वस्य गंभीरतां आपातालनिमग्नपीवरतनुर्जानाति मन्थाचलः।") श्री. शेजवलकर यांच्या लेखांतील अेकंदर दृष्टिकोण लक्ष्यांत घेतां तें विशेषण योजिण्याची हेतुपूर्वकता सहज ध्यानांत येण्यासारखी होती; पण 'बुरुजावरून अैकणाऱ्यां'च्या वरवरच्या नजरेला ती कशी दिसावी! असो.

या अप्रिय विषयाचें हें संकीर्तन बरेंच लांबलें; तेव्हा तें अिथेच थांबवून आता या अंकाच्या अंतरंगाकडे वळतों. प्रस्तुत अंक संमेलनपूर्व अंक असल्यामुळे, त्यांत संमेलनाशीं संबंध असलेल्या लेखांचाच प्रामुख्याने अंतर्भाव करण्यांत आला आहे. आगामी संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्रा. ना. सी. फडके यांच्या संदेशावरून, त्यांच्या अध्यक्षीय भाषणांतील प्रमुख सूत्राची कल्पना करतां येअील. ज्या रत्नागिरी शहरांत येतें साहित्यसंमेलन भरणार तेथील लोकांना आपलेपणाच्या नात्याने विशेष अभिमानास्पद वाटाव्यात अशा ज्या कांही व्यक्ति महाराष्ट्रांत होअून गेल्या त्यांमध्ये कै. राजारामशास्त्री भागवत यांची प्रामुख्याने गणना करावी लागेल. दोन पिढ्यांमागलि या कर्त्या सुधारकाग्रणीचें विस्तृत चरित्र किंवा त्याच्या कार्याचें शास्त्रीय मूल्यमापन, अद्याप अुपलब्ध नाही. यामुळे सध्याच्या फारच थोड्या साहित्यिकांना, नांवापलीकडे, त्यांची माहिती असण्याचा संभव आहे. कु. दुर्गा भागवत, अेम्.अे., यांनी शास्त्रीबोवांच्या चरित्रावर व कार्यावर अत्यंत परिश्रमपूर्वक, अेक अुत्कृष्ट प्रबंध तयार केला असून, या अंकांतील शास्त्रीबोवांवरील त्यांचा लेख म्हणजे त्या प्रबंधांतील अेक भाग होय. हा लेख छापण्याची परवानगी दिल्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. श्री. शेजवलकर यांच्या लेखाप्रमाणेच, विशिष्ट विचारांच्या, मनोवृत्तींच्या कांही व्यक्तींना जरी तो कुठे कुठे बोचला, तरी अेकंदरींत चाळीस वर्षांपूर्वींच्या अेका कर्त्या तत्त्वान्वेषी सुधारकाचें हें परिचयात्मक स्वभावलेखन, निर्मत्सर व पक्षातीत साहित्यिकांना, अुद्बोधक व अुपयुक्त वाटेल, अशी आशा आहे.

साहित्यपरिषदेच्या व संमेलनाच्या कार्याच्या दृष्टीनें, प्रा. पोतदार व श्री. सरदार यांचे लेख विचारांना चालना देणारे वाटतील असा भरवसा वाटतो.

परिभाषामंडळातर्फे 'बम्बअीसे बोल रहे हैं' हा लेख या अंकांत आला आहे. प्रा. आपटे व श्री. ढवळे यांनी परिश्रमपूर्वक तयार केलेल्या या लेखांतील, सहजपणें, विषय मांडतां मांडतां, सोपे आणि शास्त्रशुद्ध पारिभाषिक शब्द वापरण्याची पद्धति, वाचकांना मनोरंजक वाटल्यावांचून राहणार नाही.

यांशिवाय श्री. ना. गो. चापेकर, श्री. चिं. य. काळे, प्रा. श्री. बा. रानडे, श्री. गुण्ये, श्री. गो. कृ. मोडक, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. आठले, श्री. नवरे अित्यादींचे लेख व डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांचा कालिदासोक्तीचा सुरस अनुवाद, यांनी या अंकाला शोभा आणण्यास विशेष मदत झाली आहे. या सर्वांचा, लेखनसाहाय्याबद्दल, संपादक अत्यंत ऋणी असून अंकाच्या सजावटीचें सर्व श्रेय या लेखकवर्गालाच आहे, अेवढेंच नमूद करून हें संपादकीय संपवितों.

के. नारायण काळे

---

अनुक्रमणिका

# परिषद्वार्ता

[चिटणीसांकडून]

## कार्यकारी मंडळ—

१८ फेब्रुवारी व ११ अेप्रिल या तारखांस कार्यकारी मंडळाच्या सभा झाल्या. खालील दुखवट्याचे ठराव करण्यांत आले:—

(१) "गेल्या पिढींतील अेक विद्वान आणि चतुरस्र लेखक श्री. महादेव राजाराम बोडस हे ४ जानेवारी रोजीं वयाच्या ७३ व्या वर्षी कालवश झाले हें नमूद करतांना म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास हळहळ वाटत आहे. केसरी, मराठा, चित्रमयजगत् वगैरे नियतकालिकांतील लेख आणि 'शंकराचार्यांचें चरित्र' अित्यादि ग्रंथ, यांच्याद्वारा त्यांनी मराठी वाङ्मयाची अुत्कृष्ट सेवा केली होती. त्यांच्या निधनामुळे त्यांच्या आप्तेष्टमंडळीस होणाऱ्या दुःखांत म. सा. परिषदेचें कार्यकारी मंडळ अंशभागी आहे."

(२) "श्री. गोविंद पांडुरंग पावशे हे १९३९च्या डिसेंबर २८ तारखेस दिवंगत झाले हें वृत्त वाचून म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास दुःख होत आहे. व्याकरणशास्त्राची त्यांना विशेष आवड होती आणि मराठी शुद्धलेखनाबद्दल त्यांनी पुष्कळच विचार केलेला होता. केसरी, विश्ववाणी, ज्ञानप्रकाश अित्यादि नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले त्यांचे अेतद्विषयक लेख मोठे निस्पृह, मार्मिक आणि विद्वत्तादर्शक होते. त्यांच्या निधनाने म.सा.परिषदेच्या कार्यकारी मंडळास हळहळ वाटत आहे."

(३) "सांगलीचे सुप्रसिद्ध वकील, थिऑसफीचे अभ्यासू भक्त, प्रथितयश वक्ते, मार्मिक विद्याव्यासंगी आणि 'स्वाध्याय ज्ञानेश्वरी' या ग्रंथाचे कर्ते श्री. केशव रामचंद्र छापखाने यांना आपल्या निवासस्थानीं ता. १३ फेब्रुवारीला देवाज्ञा झाल्याने मराठी वाङ्मयाची आणि समाजाची मोठी हानि झाली आहे. त्यांच्या निधनामुळे त्यांच्या कुटुंबीयांना होणाऱ्या दुःखांत म. सा. परिषदेचें कार्यकारी मंडळ समभागी आहे."

(४) "डॉ. वामन लक्ष्मण नूलकर हे साहित्यपरिषदेचे आस्थेवाअीक सभासद आणि वाङ्मयभक्त अकालीं मृत्युवश झाल्याचें अैकून म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास हळहळ वाटत आहे."

(५) "मुंबअी येथील प्रार्थनासमाजाच्या 'सुबोध पत्रिका' या मुखपत्राचे संपादक आणि प्रार्थनासमाजाचे अेकनिष्ठ सेवक श्री. द्वारकानाथ गोविंद वैद्य यांना गुरुवार ता. २९ फेब्रुवारी रोजीं देवाज्ञा झाली हें अैकून म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास दुःख होत आहे. श्री. वैद्य यांनी 'प्रार्थनासमाजाचा अितिहास', 'भांडारकरांचीं व्याख्यानें', 'सर नारायण चंदावरकर यांचें चरित्र', 'संसार आणि जीवन' हें आत्मवृत्तपर पुस्तक अित्यादि ग्रंथांच्या द्वारा महाराष्ट्रीय वाङ्मयाची आणि समाजाची बहुमोल सेवा केली होती. त्यांच्या निधनाने त्यांच्या कुटुंबीयांना होणाऱ्या दुःखांत म. सा. परिषदेचें कार्यकारी मंडळ अंशभाक् आहे."

(६) "मुंबअीचे अेक प्रसिद्ध सॉलिसिटर आणि विद्वान साहित्यिक श्री. भालचंद्र सीताराम सुकथनकर हे शनिवार ता. ६ अेप्रिल रोजीं कालवश झाले. 'गीतारहस्या'चें आणि मराठींतील कांही कवींच्या कृतींचें अिंग्रजींत भाषान्तर करून व स्वतःच 'अिन्दुविलास' नांवाचा स्वतंत्र कवितासंग्रह प्रसिद्ध करून त्यांनी मराठी वाङ्मयाची बहुमोल सेवा केली होती. त्याचप्रमाणे श्री. भातखंडे यांच्या संगीत शास्त्रावरील ग्रंथांचें प्रकाशन करूनहि संगीतशास्त्राची त्यांनी अुत्कृष्ट सेवा केली होती. त्यांच्या निधनाने म.सा.परिषदेच्या कार्यकारी मंडळास अत्यंत खेद होत आहे."

सादर केलेला वार्षिक हिशेब व अंदाजपत्रक यांस सभेने मान्यता दिली.

शाखासभा— सांगली, मिरज, बुधगांव, कुरुंदवाड, वाडी, व जमखंडी या दक्षिणी मराठी संस्थानांची 'दक्षिणी संस्थान साहित्यसभा' या नांवाने स्थापन झालेल्या परिषदेच्या शाखासभेच्या घटनेस सभेने मान्यता दिली. या शाखासभेकडून पुढील संमेलनासाठी रीतसर आलेलें आमंत्रण रत्नागिरीच्या संमेलनाधिकाऱ्यांस पाठवावें असें ठरलें.

संमेलन— महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें २४ वें अधिवेशन रत्नागिरी येथे ४,५ व ६ मे या तारखांस भरण्याचें निश्चित झालें आहे. अध्यक्षस्थानीं प्रो. नारायण सीताराम फडके व स्वागताध्यक्षपदासाठीं श्री. भा. वि. वरेरकर यांची योजना झाली आहे. अधिवेशनास आरंभ ता. ४ शनिवारीं सकाळीं ८॥ वाजतां होणार असून श्रीमंत महाराणीसाहेब, सावंतवाडी, या अधिवेशनाचें अुद्घाटन करणार आहेत. प्रतिनिधींची वर्गणी रु. ३ ठेविली असून वसतिगृह व भोजनखर्च यांबद्दलचा आकार रु. ३ ठेविला आहे. सोलापूर, पुणें व नगर येथील बऱ्याच मंडळींनी संमेलनास येण्याबद्दलची आपली अिच्छा व्यक्त केली आहे. त्याचप्रमाणे मुंबअीहून पुष्कळसे प्रतिनिधि येतील अशी अपेक्षा आहे. बडोदें, मध्य व अुत्तर हिंदुस्थान येथील मंडळींच्या सोयीसाठी सूचना आल्याने संमेलनाच्या तारखा मुद्दाम मे महिन्यांत ठेवण्यांत आल्या आहेत हें तेथील मंडळींनी लक्ष्यांत ठेवून संमेलनास अगत्यपूर्वक येण्याचें करावें अशी विनंती आहे. परिषदेच्या सभासदांनी आपली जबाबदारी ओळखून संमेलनास येण्याचा शक्य तों प्रयत्न करावा.

अितर— ता. १७ मार्च या दिवशीं परिषदेच्या कार्यालयांत अेक्झि. अिंजिनिअर रावसा. न. स. जोशी यांनी परिश्रमपूर्वक तयार केलेली ध्वनिश्रित तारलिपीची माहिती सांगून जमलेल्या मंडळीस त्याबद्दलचें प्रात्यक्षिक दाखविलें. ही तारलिपी कोणत्याहि भाषेंत विशेष सोअीची होअील याचा मंडळीस प्रत्यय आला.

## नवीन सभासद

१ श्री. मुरलीधर डी. गंधे, जळगांव
२ ,, विश्वनाथ गोपाळ शेट्ये, रत्नागिरी
३ प्रो. वि. ना. ढवळे, सांगली

पुणें

४ प्रो. श्रीपाद लक्ष्मण आजरेकर,
५ खा. ब. प्रो. शेख अब्दुल कादिर सर्फराज
६ रा. सा. मनोहर सदाशिव जोशी

सोलापूर

७ श्री. रावजी नेमचंद शहा
८ ,, धोंडो व्यंकटेश कोतकुंडे
९ ,, अनंत काशीनाथ जोशी
१० डॉ. वि. ना. गोखले

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## गट २३ शाखासभेची घटना

१. नांव— या शाखासभेचें नांव 'दक्षिणी संस्थान साहित्यसभा' (म. सा. परिषदेची शाखासभा) असें राहील.

२. व्याप्ति— सांगली, मिरज, बुधगांव, कुरुंदवाड, वाडी व जमखंडी हीं दक्षिणी मराठी संस्थानें.

३. कार्यालय— शाखासभेचें कार्यालय सांगली येथे राहील.

४. कार्यकारी मंडळ—

(अ) कार्यकारी मंडळांत अध्यक्ष व कोशाध्यक्ष, व सहा साधारण सभासद असे अेकूण सात सभासद असावेत व हे साधारण सभेने निवडावेत.

(आ) कार्यकारी मंडळाच्या सहा साधारण सभासदांपैकी अेकास कार्यकारी मंडळाने चिटणीस निवडावें.

(अि) कार्यकारी मंडळापैकी अध्यक्ष व कोशाध्यक्ष या संयुक्त जागेशिवाय अेखादी जागा राजिनामा किंवा अितर कारणाने रिकामी झाल्यास ती जागा नवीन निवडणुकीपर्यंत कार्यकारी मंडळाने नवीन सभासद स्वीकृत करून भरावी.

(अी) कार्यकारी मंडळास जरूरीप्रमाणे अधिकांत अधिक दोन सभासद स्वीकृत करून घेतां येतील.

(अु) कार्यकारी मंडळाची निवडणूक दर तीन वर्षांनी डिसेंबर महिन्यांत शाखासभेच्या परिषदेच्या सभासदांकडून गुप्त मतदानपद्धतीने व्हावी. कोणाहि बाकीदार सभासदास मत देतां येणार नाही.

(अू) चालू कार्य व जमाखर्च यांवर कार्यकारी मंडळाचा प्रत्यक्ष किंवा पोटमंडळाच्या द्वारें पूर्ण अधिकार राहील. यासंबंधी अवश्य वाटणारे पोटनियम कार्यकारी मंडळाने करावे व ते पुढील साधारण सभेपुढे माहितीसाठी ठेवावे.

(अे) कार्यकारी मंडळाची सभा दर तिमाहींत निदान अेकदा व्हावी. सभेची सूचना निदान पांच दिवस आगाअू देण्यांत यावी. सभेस चार सभासदांची गणसंख्या मानली जाअील. मंडळाच्या तीन सभासदांनी विशिष्ट कामासाठी लेखी मागणी केल्यास तशी सभा चिटणीसांनी भरविली पाहिजे.

५. साधारण सभा—

(अ) परिषदेच्या वर्षगणनेप्रमाणे (जानेवारी ते डिसेंबर) वर्ष संपल्यावर तीन महिन्यांच्या आंत शाखेची वार्षिक साधारण सभा भरविण्यांत येअील.

(आ) वार्षिक साधारण सभेंत शाखासभेचा वार्षिक अहवाल, तपासलेले हिशेब व पुढील अंदाजपत्रक मंजुरीकरिता मांडावें.

(अि) साधारण सभेची सूचना सभेच्या दिवसापूर्वी निदान सात दिवस आधी चिटणीसांनी पाठवावी. कोणत्याहि साधारण सभेस १० ही गणसंख्या मानली जाअील.

(अी) वार्षिक सभेशिवाय अवश्य तेव्हा कार्यकारी मंडळाने विशेष साधारण सभा बोलवावी. शाखासभेच्या परिषदेच्या दहा सभासदांनी विशिष्ट कारण दर्शवून सभेची लेखी मागणी केल्यास तशी सभा चिटणीसांनी पंधरा दिवसांच्या आंत बोलाविली पाहिजे.

———

अनुक्रमणिका

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चाफेकर यांनीं छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.